# सराई

लेखक

र. वा. दिघे

बी.ए., एल्एल्. बी.




पहिली आवृत्ति इ. स. १९४३

दुसरी आवृत्ति इ. स. १९५१

किंमत ५ रुपये

श्री. र. वा. दिघे यांचें वाङ्मय

## उल्हासमाला

| | | | |
|---|---|---|---|
| १ | पाणकळा ( दुसरी आवृत्ति ) | किंमत | ४–८–० |
| २ | सराई ( ,, ,, ) | ,, | ५–०–० |
| ३ | रम्य रात्री | ,, | १–४–० |
| ४ | वसंतराव व चाळीस चोर | ,, | १–८–० |
| ५ | गानलुब्धा मृगनयना | ,, | ५–०–० |
| ६ | रानजाई | ,, | ३–०–० |
| ७ | माझा सबुद | ,, | ३–०–० |
| ८. | गातात व नाचतात<br>धरतीचीं लेकरें<br>( लोकगीतें व नृत्यगीतें ) | ,, | २–०–० |



श्री लेखन वाचन भांडार,
लक्ष्मी रोड, पुणें २.

मुद्रक : वि. ग. माटे, 'विश्वकर्मा' मुद्रणालय, १९६।६९, सदाशिव, टिळक रोड, पुणें २.

प्रकाशक:–ग. ल. ठोकळ, श्री लेखन वाचन भांडार, लक्ष्मीरोड, पुणें २.

माझे मातामह

कै. ती. बळवंत सीताराम टिपणीस

यांचे चरणीं माझी

' सराई '

अर्पण केली आहे.

र. वा. दिघे

# अनुक्रमणिका



# प्रकरण १ लें

# सराई

" शिरलिन् र, शिरलिन् रं, शिरलिन् र, राजपाटीत कातोड्याची पोर शिरलीन्. "

रानसई गावात खलाटीतून दुपारी गोंग आली. बाप्पाजीचा गडी अधू गणू गोठ्यात भुईला चोप देऊन शेणखळा करीत होता. तो शेणा-भरल्या हातानी बाहेर आला व गळ्याच्या शिरा फूगवून आपला एकुलता एक इचका डोळा मिचकावीत तणतणूं लागला. त्या आवाजानें दुपारचे ओटीवर लवंडलेले बाप्पाजी जागे झाले. त्यानीं उठून चूळ भरली, तोंडावरून हात फिरवला व अंगावरचे उपरणे डोकीला गुंडाळलें. नतर डोकीपेक्षा उंच असा एक जाडा सोडगा हातात घेऊन ते उघड्या अंगाने शेतावर जाण्यास निघाले.

बाप्पाजीचा एकुलता एक मुलगा मनोहर आधल्याच दिवशीं बी.ए.ची परीक्षा देऊन पुण्याहून आला होता. तो माडीवर वाचीत पडला होता. त्यानें ही ओरड ऐकली व तो खाली धांवत आला. त्याला अधूच्या ओरडण्याचे कौतुक वाटले. तो पण बाप्पाजीबरोबर जाण्यास तयार झाला.

" मनोहर, काटी असू दे बरोबर. " मनोहरची आई राजसबाई माजघरातून ओटीवर आल्या व त्यानीं मनोहरला सूचना दिली.

मनोहर काठी शोधू लागला.

" मनोहर, तू कशाला येतोस आमच्याबरोबर? उन्हाच्या तापींत किडी-काटकं फार निघतात. " लहान मुलाप्रमाणे बाप्पाजींनी त्याला समजावले.

" खरंच दादा, लई गचपड डोकी-डोकीयेव्हढं गवत वाढलय् खलाटीला. " अंधूची पण मनोहरने येऊ नये अशी इच्छा दिसली.

मनोहर कपाळाला आठ्या घालून पडवीत उभा राहिला. बाप्पाजींनी त्याला लहानपणापासून तळहातावरच्या फोडाप्रमाणे सभाळले होतें. इतका तो त्यांचा लाडका होता. त्याचे मराठी-इग्रजी व कॉलेजचे शिक्षण पुण्यास झालें होते. सुट्टींत तो घरी आला की बाप्पाजीनी त्याला कधीं शेतीच्या रगाड्यात जाऊ देऊ नये.

“ बाप्पाजी, मी काय आता कुकुबाळ राहिलो आहे ! पुण्यास मी जगलांतून हिंडतो तेव्हां मला कोण सांभाळतो ? ” तारुण्याचे रगीने भरलेला मनोहर रागावून बोलला.

“ अरे तसं नाही मनोहर. पण ही शेतीची कामं तुम्हांला कशाला पाहिजेत ! जन्मभर आम्हीं काबाडकष्ट केले तेव्हढे पुरे आहेत. अंधू, आपण गाणीच्या घशींतून पायऱ्यांत उतरूं म्हणजे नेमकीं कातोड्याचीं पोरं सापडतील आपल्याला. या खेपेला मी त्याची बिलकूल गय करणार नाही. ”

बाप्पाजींनी कातोड्याच्या पोरांवरील आपल्या चढाईची रूपरेषा अंधूला सांगितली.

बाप्पाजी व अंधू राजपाटीच्या वाटेला लागले. त्यांना थोडे पुढे जाऊ दिल्यावर मनोहर त्याचे मागोमाग निघाला व अंतर ठेवून त्यांचे पाठोपाठ चालूं लागला.

पावसाळा संपला होता. श्रावणांतला ऊनपाऊस सपला होता. भादव्यातील तापी बद झाल्या होत्या. अश्विनाचे सोनेरी ऊन तिरपें होऊन हिरव्या खलाटीवर पडूं लागले. चौफेर पावसाने हिरवळलेले डोगर निळे आकाश डोक्यावर घेऊन उभे होते. मधून काळ नदी खळखळ करून वाहत होती. मधून मधून एखाददुसरा पाढरा ढग डोंगरामागून डोकावत होता. निळ्या आकाशाखालीं दऱ्याखोऱ्यांतून शेतकऱ्याची सोनेरी सराई वाऱ्याने सळसळत होती. भाताच्या घोसदार पिवळ्या जर्द लोंब्या हळव्या शेतांतून एकमेकाना लागून राहिल्या होत्या. त्या शेतातून पिवळारंजन गालिचा हातरला आहे, असे दिसत होते. हळवार भाताचे आकडे वळून ते कापण्यास तयार झालें होतें, तर फुलावर आलेले गर्वे भात दूध घेत होते. गर्वी शेतं हिरवी दिसत होतीं.

सोनेरी भातावर सोनेरी ऊन पडले होतें. वाऱ्याच्या झुळकींत खाचरांतील भाताचीं लोंबरें, बांधावरचीं अर्धी पाढरी, अर्धी लाल कुर्डूची फुले डुलक्या घेत होतीं. वाऱ्याने वांकलेल्या गवताचे तुरे वाफ चालल्याप्रमाणे दिसत होते. गवताच्या लाटा ससांची खिल्लारे पळावींत अशा टेकड्यांवरून, माळावरून उठत होत्या. रानांत सागांचीं पानें खुजबुजत होती. त्या दरींतील नितात शांततेंत फक्त झाडांच्या सावटीतून होले कड्यावरून रानपारवे घुमत होते

व कुपणीतून बुलबुल आणि काळे पक्षी आवाज करीत होते. असंख्य फुलपाखरें भाताच्या फुलांनीं दरवळणाऱ्या सुवासिक वातावरणात, सराईच्या आनदाने कोलमडत कोलमडत उडत होतीं. समोरच्या डोंगरावर भर दुपारचा एक मोठा तारा लखाखत होता. तो तारा नसून पाण्याचा पाघळ होता व त्यावर ऊन पडल्यामुळे त्याचे पाणी चमकत होतें.

सराई, सराई, सराई ! जिच्याकरितां शेतकऱ्यांनीं बारा महिने कष्ट केले ती ही सराई. जिच्याकरितां घरांतील पोरीबाळीनी रानोमाळ हिंडून शेणाचा राब मिळवला, बाप्या गड्यांनी उरापोटावर टहाळ कापला, औतकी केली, जमीन सारखी ओढून मुशी पाडल्या, खांडी भरून बांध घातले, म्हशे ठेवले, धुळपेरे केले, बेंबट पिळून नागर हांकला, चिखलात हातपाय कुजून नखें उडेसतोवर लावणी-बेणणी केली, शेतात गवताची काडी कुठं दिसूं दिली नाही, आगोटीपासून पावसाच्या धूम धारेंत भिजल्या अंगाने भातशेतीची मशागत केली, ती ही सराई. हिला डोंगरांनीं वेढली, रानांनी अडवली, नदीनें भांगली. कमलावर जशी कमलासना श्रीशारदा तशी खलाटींतील भातावर सराई शारदीय प्रसन्नतेनें हसत होती. उन्हाने जाभळलेले शेतकरी व त्यांच्या बायका ही सराई खळ्यावर रचून ठेवीत होते. इतक्यांत काळ्या कड्याच्या माथ्यावर आलेला एक पाढरा ढग काळा होऊ लागला व त्याचे मागून डोंगरमाथ्यांचे आडोशाने आणखी ढग डोकावूं लागले. तेव्हा 'पानी आला, पानी आला' म्हणून धांवपळ करीत कापलेल्या भाताचे भारे गर्दीने वाहून नेऊन उडव्या रचणाऱ्या शेतकऱ्यांची तिरपिट उडाली.

हिरव्या पान-पाचोळ्यांतून सोने काढणारा किमयागार पश्चिमेकडील डोंगरावर कलूं लागला. जिकडे तिकडे वनस्पतीचा समुद्भव झाला होता. राने, झाड्या, माळ, धशी, पट्ट्या, कडामेरा गवताने, पानांनीं नाहीं तर वेलींनीं गजबजल्या होत्या. कोठेहि तसूभर जागा वनस्पतीने मोकळी ठेविली नव्हती. ही हिरवी वनस्पति कांहीं ठिकाणीं पिवळी तर कांहीं ठिकाणीं लाल पडली होती. झाडांचीं पाने झडण्याच्या बेतात होती. गवताचें बीं गळत होते. शेतकरी भात काढीत होते. या दरींत अन्नब्रह्माच्या निर्मितीकरितां विश्वकर्मा जणूं एक मोठा यज्ञ करीत आहे असे दिसत होते.

अन्नाद्भवन्ति भूतानि, पर्जन्यादन्नसंभवः ।
यज्ञाद्भवति पर्ज्यन्यो यज्ञः कर्मसमुद्भवः ।।

विश्वकर्म्याने स्वाहा म्हटले. पर्जन्यवात सुरू झाला. धो धो पाणी वाहूं लागले. त्याने पुनः स्वाहा म्हटले. डोंगराच्या धशी कोसळल्या. माती धुपली. मळई बनली. वनस्पती पोसली. पानें, फुले, फळे, बीं निर्माण झाली. अन्नाचा प्रभव झाला. प्रकृतीतून अनत रूपे निघाली. त्याच विराट पुरुषाने पुन्हां स्वाहा म्हटले. पाने गळूं लागली. गवत वाळूं लागले. शेतकरी भात कापूं लागले. मातीतून निघालेले अन्नपरब्रह्म पुन्हा मातीत जाऊं लागले. अन्नाचा प्रलय सुरू झाला आहे, असें कळल्याबरोबर जीवन ब्रियाच्या टाळिवीतून, भाताच्या कुसातून व नागली-वरीच्या मोहरींतून लपून बसू लागले. गीतेत वर्णन केलेल्या महायज्ञाचा साक्षात्कार या दरीत पूर्णपणे आला. अन्नब्रह्माचा प्रलय सुरू झाला आहे, ही बातमी पशुपक्ष्यांना लागली. ते त्यावर तुटून पडले. रानगवे, साभर खाली दरीत उतरले. डुकराच्या सारी भातात लोळण घेऊन त्याची नासाडी करू लागल्या. वरघाटातील दुष्काळी भागांतून पाखरे व भिकार खाली लोटले. खलाटींत पाखराची बुलबुल सुरू झाली. कारण हिरव्या-निळ्या-जांभळ्या डोंगराच्या मखरात सराई राजकन्येप्रमाणे बसली होती.

कॉलेज, अभ्यास आणि शहरची राहणी याना विटलेला मनोहर त्या खुल्या खलाटीकडे वावंदळणाऱ्या आनंदाने पाहूं लागला. त्याला वाटले, या सराईने पिकलेल्या शेतोड्यातून, गवती माळावरून, हिरव्या रानांतून, निळ्या डोंगरावरून खूपखूप भटकावे, मनमुराद हिंडावे. जगात जर कुठे खरा आनद असेल तर तो सह्याद्रीच्या या दऱ्याखोऱ्यांतून, सह्याद्रीच्या या नितात रमणीय वनश्रींतून, रामदासांच्या या आनंदभुवनांतून बोकाळण्यांत. त्याला वाटले या सराईच्या सहलींनीं काय बहार येईल ! आपला अभ्यासाचा सारा शीणभाग जाईल.

गाणीचा धस चढण्याचे आधी बाप्पाजी कमरेवर हात ठेवून खलाटीचें निरीक्षण करूं लागले.

"छुद् ! कांहीं भात पिकलं नाहीं या शेताला !"

"कोणाच्या, बाप्पा ?" अंधूने विचारले.

" दीपाजीच्या. "

" भात पिकंल कसं ? चिखुलच केला नाय त्यानं. चिखुलाबिगार भात नाय. "

" तसाच आहे तो रडतोंडीचा घाट. त्याच्याकडून शेत काढलं म्हणजे ओरडतो. आपणहि पिकवीत नाहीं आणि दुसऱ्याला पिकवू देत नाहीं. "

बाप्पाजी दीपाजीला ' रडतोंडीचा घाट ' म्हणत. कारण ' पाऊस जास्त पडला, कमी पडला, चिखल कमी झाला, जास्त झाला, पेरे लवकर झाले, उशीरा झाले, आवण उरले, आवण जास्त झाले, कोणी गुरें भातात घातलीं, कुणीं बांध फोडला, कुणी पाणी फिरवले, कुणी गवत चारले ' अशी त्याची बारमास रड असे. मेघराजाला तर त्याने जन्मात कधीं चांगले म्हटले नाहीं. त्याची पावसावरची फिर्याद वहिवाटींच्या खटल्याप्रमाणे दरसाल आगोटीला सुरू होई. एवढे करूनहि त्याला भात पिकत नसे. म्हणून बाप्पाजी त्याला ' रडतोंडीचा घाट ' म्हणत.

बाप्पाजी गाणीची धस चढून वर गेले. त्यांचे पाठोपाठ मनोहर पण वर चढला. तेव्हां सहा फूट दोन इंच उंचीचे बाप्पाजी, त्याची सात फूट उंचीची काठी आणि अधू याचा मनोहरला गवतात कुठे मागमूस दिसेना. मात्र पायऱ्याच्या खोड्यात घाईच्या हालचाली झालेल्या त्याला दिसल्या. तेव्हां मनोहरने ओळखले बाप्पाजी त्या वाटेने गेले आहेत. गव्हाऱ्यांनीं बाप्पाजींच्या राखीव खपात चारणीस घातलेली जनावरे रानाच्या आडोशाला नेलीं व बकऱ्या डोंगरावर चढवल्या. शेतात मासे मारणारे कातकरी बांधाला टेकून भातात दडून बसले व विड्या ओढूं लागले. राजपार्टीत शिरलेल्या कातकऱ्याच्या पोरांच्या काळ्या टकल्यानीं भातात डुब्या मारल्या. बाप्पाजींच्या नजरेंतून यापैकीं एकहि गोष्ट सुटली नाहीं !

कातोड्यांची पोरे दुधावर आलेल्या ओल्या भाताचीं लोंबरें चावून खाण्याकरिता शेतात शिरली होती. बाप्पाजीना पाहिल्याबरोबर तीं शेतात दबलीं !

" पकड, पकड हरामखोरांना. चाबकानं फोडल्याशिवाय अद्दल नाही घडायची त्यांना. " बाप्पाजी गरजू लागले. कातोड्यांचीं पोरे केकाटून धांवू लागली ! त्यांना कोंडण्याकरिता एका बाजूनें बाप्पाजी धांवले व दुसऱ्या बाजूने अंधू पळाला.

अंधू आधींच सुदर ! त्यांत तो भुतासारखा पळूं लागला. मग त्याची शोभा काय वर्णावी ! रंगाने तो काळा कुळकुळीत होता. इतका कीं, त्याला जाभूळ खायला देऊन त्याच्या एका डोळ्यांत कोणी काजळ घातलें असतें तर अधूला दृष्ट लागूं नये म्हणून त्या इसमाला अंधूच्या गालावर चुन्याचे गालबोट ओढावे लागले असते. अंधूचा एक डोळा देवीने गेला होता. देवीचे वण त्याचे तोडावर टाकी लावल्याप्रमाणे दिसत. अंधूला आपल्या सोयीप्रमाणे निरनिराळे दृष्टिकोन लावून प्रसंगानुसार कमी-अधिक, अंधुक-ठळक असें दिसे. म्हणून तो ' अंधू ' या नावाने रानसईत प्रसिद्ध होता. अंधूला पळतांना पाहून मनोहरला हसूं लोटले.

कातोड्यांचीं चपळ पोरें शेतामधल्या ओहळातून व लव्हाळींतून लपत-छपत पलीकडच्या गारमाळावर निघायला गेलीं. त्यांचा पांगलेला जमाव वाऱ्यावर सोडलेल्या कागदाच्या चिठ्यांप्रमाणे पळतांना दिसत होता. सर्वात मोठीं व चपळ मुले आघाडीला पळालीं. त्यांचे मागून डाबरीं-डुबरी-बेबटीं माळ करून, जीव घेऊन पळत होतीं. त्याचे पळण्याचे वाटेवरील शेतांतून भात कापणारे शेतकरी आरडाओरडा करून त्याना हुसकावीत होते.

बांधावरून पळतांना बाप्पाजींचा पाय भसकन खेकड्याच्या गुरुळांत गेला. मनोहर मागोमाग पळत होता. त्याने त्यांना हात देऊन सांवरले. नाही तर म्हातारा खालच्या शेतात पडला असता. बाप्पाजींनीं मागें वळून पाहिले तर सुंदर मनोहरची देदीप्यमान मूर्ति अस्तन्या सावरून मागे उभी आहे. उन्हाच्या तापीने त्याचा मूळचा आरक्तगौर रंग मुसमुसला होता. काबाड-कष्टाने तो बाप्पाजीसारखा राकट दिसत नव्हता. पण इतर मर्दानी गुणांत तो बाप्पाजींपेक्षा थोडा सरसच ठरला असता. तो बाप्पाजींइतकाच उंच, रुंद व हाडापेरांनीं मजबूत होता. शिवाय कॉलेजमध्ये निरनिराळे खेळ खेळून व व्यायाम घेऊन त्याने आपलें शरीर कमावले होते. त्याचे मित्राना व अध्यापकांना वाटावें कीं, मनोहर देशपांडे अभ्यासाऐवजीं खेळण्याकरितांच कॉलेजात आला आहे. इतका त्याचा वेळ खेळाचे मैदानावर व तालमीत जाई. त्याचे पिळदार स्नायू व भरीव शरीर पाहून बाप्पाजी प्रसन्न झाले व ' आतां यापुढें मनोहरला शेतीची माहिती करून देणे जरूर आहे. कारण आपला वृद्धापकाळ झाला आहे. परीक्षा पास झाल्यावर जरी त्याला

मोठी नोकरी लागली तरी आपल्या पश्चात् केव्हां तरी त्याला रानसईला येऊन जाऊन शेती पाहावी लागणाच. ' असे विचार त्यांच्या मनांत येऊन गेले.

" अधू, फिर मागे. कातोड्याचीं पोरं सापडतात तुझ्या बापाला ! " बाप्पाजी मोठ्याने हंसले. नंतर डोळे आकुंचित करून ते क्षीण स्वरात म्हणाले. " जाऊ दे, त्याना नुसती दहशत बसली की पुरे. सगळीकडं सराई पिकली आहे. उंदीर, पांखरं, सावकार, कातोडी या सगळ्यांची सराई पिकली आहे. मग याच पोरांनी काय पाप केलं आहे ! ह्या सगळ्यांनीं नेल्यावर जें उरेल ते आपलं." बाप्पाजींनी एक दीर्घ निःश्वास टाकला.

इतक्यांत त्याना शेतात मासे मारणाऱ्या कातोड्यांची आठवण झाली. क्षणापूर्वी हंसणारे बाप्पाजी, दयेने निःश्वास टाकणारे बाप्पाजी, आतां रागाने लाल झाले.

" अंधू, अकुशा दिसतो वाटेते. बोलाव त्या हरामखोराला," राजपाटी बाप्पाजींचा कलिजा होता. तिचे पाणी कातोड्यांनी फोडलें म्हणून बाप्पाजींचा राग अनावर झाला.

बाप्पाजीचा हुकूम ऐकल्याबरोबर कातकरी आरोपितांप्रमाणे जमाव करून स्वतः होऊन बाप्पाजींकडे आले. त्यांत अंकुशा नव्हता. त्याचेऐवजी कातकऱ्यांचा म्हातारा नायक कोया पुढे आला. तो त्यांचा पुढारी होता.

" हरामखोरानो, माझ्या हद्दीत राहता, माझ्या नावावर चोऱ्या पचवता आणि माझ्याशीं बैमानी! कधीं कामावर बोलावले तर चुकून यायचे नाहीत. शेताचे बांध फोडून मासे मारायला मात्र तयार ! चला, निघा शेताच्या बाहेर. आन् कोया तूं तर त्यांचा नायक. तुझे केस पिकून गळले. डोक्याला टक्कल पडलं. तरी तुझे हे धदे ! " बाप्पाजींचा सिंहनाद झाला.

कोयाने आपल्या वाळलेल्या तुंब्यासारख्या टकल्यावरून मिस्किलपणाने हात फिरवला व एखाद्या लहान मुलाच्या निर्व्याजतेनें तो हसूं लागला. कारण कातोड्यांना माहीत होतें की, बाप्पाजीच्या शिव्या म्हणजे फुले. बाप्पाजी शिव्या देईल, पाठीवर मारील, पण पोटावर मारणार नाहीं.

" बाप्पा, तूं उगीच बस. आमी इथं किवट लावून तुझं पाणी बांधून देऊ. मग राजपाटीत किती भात पिकतं ते पघ. " कोया बाप्पाजीला

एकेरीने सबोधी. कारण तो आप्पाजींपेक्षां वयानें कितो तरी मोठा होता. शिवाय कातोड्याच्या भाषेत बहुवचन लुप्त असतें.

" मनोहर, तं उद्यां सकाळीं इकडून चक्कर मार. उद्यांला किवट तयार नाहीं झाल तर कातोड्यान्या पाठी सडकीन. तूं आतां सगळ्या खलाटीतून हिंडून ये. आता आमची घोडी थकली. तुम्हीच सगळ पाहत जा. ही तुमची प्रजा. बघा, नीट लक्षात ठेवा. "

सर्व कातोडी हंसले. आप्पाजींची पाठ फिरल्याबरोबर सर्वजण आपल्या पाणी उपसण्याच्या उद्योगाला लागले. कोया व अंधू बाधावर विडी ओढण्यास बसले. एका कातोड्याने आपल्या बुचड्यांत लटकावलेले आपट्याचे पान अंधूला दिले.

" तुम्ही केसात पानं ठेवता म्हणून तीं नरम होतात. पण आमची ही युगत हाय." अंधूने ते पान थोडा वेळ तोंडात धरले व नतर गुडघ्याच्या खोबणीत माडीखालीं दाबून ठेवले.

" दादा तुम्ही वरतां ? " कोयाने मनोहरपुढे पान धरले.

" ते तसल कायबी चालत नाय आमच्या दादाना. रस्त्यानं गेले तर अस इकरं का इकरं पायचे नाहींत. " अंधूने कोयाला कचकावलें.

इतक्यांत एका बांधावरून धूर निघताना मनोहरने पाहिला. धूर गवतातून निघे आणि बद पडे. मनोहरला वाटले, गवतात कोणी विडी टाकल्यामुळे गवत पेटत आहे. वेळेवर विझवले नाही तर वणवा लागून रानांत शिरेल व खळ्यावरच्या उडव्याहि पेटतील. म्हणून तो घाईने तिकडे गेला. 'मनुदादाला कायबी कळत नाहीं ' अशी मुद्रा करून कोया त्याच्याकडे पाहत राहिला.

एक कातोडी बाधातील उदराच्या बिळांत गवत घालून पेटवीत होता. त्याचा धूर कांहीं अंतरावरच्या दुसऱ्या बिळांतून निघे. मग तो तेथपर्यंत बाध खोचऱ्याने खणत जाई. अशा तऱ्हेने त्याने शेताना सबंध बांध खणून काढला होता.

" अरे, तुम्ही लोक आमच्या बांधाची नुकसानी का करतां ? " मनोहरने त्या कातोड्याला हटकलें.

" दादा, यात तुमची नुकसानी नाही. बाप्पाजीनीं मला सागितलं आहे खणायला." कातोड्याने मनोहरला थाप मारली. " बांधांतल नुसतं उंदरांनी नेलेल भातच काडलं तर तुमची नुकसानी होईल. पण उदीर काडले तर त्यांत तुमचा फायदा आहे. तूं बिस हाथं. मी तुला गम्मत दाखवतों." कातोड्याने बांधावर घोंगडी टाकली. तविर मनोहर बसला.

पांच-दहा मिनिटांत कातोड्याला उदरांचे कोठार सापडले. त्या बिळाचे पोकळीत उंदरानीं मणभर भात निघेल इतक्या लोंब्या शेतांतून एक एक अशा तोडून नेऊन सुदर रीतीने साठवल्या होत्या. मनोहर त्या उंदरांच्या सराईकडे पाहत राहिला. बिळांत उंदरांनी एक खोपा केला होता. त्यांत त्यांची वीण होती. भाताशिवाय दोन खाणे उदीर व त्याची पांच-सात पोरें कातोड्याला सांपडलीं. उदराचीं पोरे नुसतीं लाललाल मासाचे गोळे होते. त्याचे अंगावर लवसुद्धा आली नव्हती. त्यामुळे तीं लाल दिसत होतीं. डोळे न उघडता ती चू चू करीत होतीं. त्याना पाहून कातोड्याने तोडाला पाणी सुटले.

लोंबींत लोंबी गोवून उदरांनीं लोंब्यांचा डोलारा केला होता. मध्यभागी झाडाच्या सालीचे ततू, पिसे, शेवरीचा कापूस असे मऊ पदार्थांचे पिलांकरितां शय्यागृह बनवले होते. मनोहरला त्या गुबगुबीत खोप्यात उदीर होऊन झोपीं जावेसे वाटले.

" दादा, याला म्हणतात उदराची सराई. येव्हढासा जीव, पण भाताचा केव्हढा बेपार करतो. समना गमनाच तरी हाय का असा कोठार ?" कातोड्याने भात गोळा करताना हंसून मनोहरला सागितले.

" आज तुला लाट मिळाला." कांहीं तरी बोलावे म्हणून मनोहर बोलला.

" झुजरुक कोल्ह्याच तोड पाहिल व्हतं ना ?"

" तुम्ही खातां कारे उदीर ?" मनोहरने प्रश्न केला. कातोडी न बोलतां गालातल्या गालात हंसला.

त्यानतर घोंगडीत भात व उंदीर भरून तो कातोडी आनदाने गात गात कातोडवाडीकडे निघून गेला.

---

## प्रकरण २ रें

# मातलेला फॉरेस्टर

रानसईला चिकार रान होतें. त्यांतील कांहीं भाग सरकारी व कांहीं भाग बाप्पाजीचा मालकी इनाम होता. सरकारी हद्दीला तुकाराम नांवाचा एक फॉरेस्टर जगलाच्या रक्षणाच्या कामावर होता. तुकाराम रगाने काळा-रोम, मध्यम बाध्याचा, आडवा गडी होता. त्याच्याइतका ताकददार इसम त्या भागात नाहीं, असा त्याचा लौकिक होता. रात्रदिवस दारू पिणे व जंगलातून हिंडणे हा त्याचा धदा. कड्याकड्यांवरून तो जंगलांत शिरलेल्या लोकांना वाघासारख्या आरोळ्या मारून दम देई. लोक त्याला थरकाप भीत. बायकांना तर त्याची दहशत फार. खेडेगांवातील तरण्याताठ्या पोरींवर तो नजर ठेवून असे. रानात त्याने एकटीदुकटी बाई गांठून तिची चेष्टा करावी, पैशाचे आमिष दाखवावे, ती वश झाली नाहीं तर क्वचित् बलात्कारहि करावा. अब्रूच्या भीतीनें पोरी घरीं कांही सांगत नसत. त्यामुळे जंगलच्या पांघरुणाखाली तुकारामाचीं दुष्कृत्यें निर्धास्त चालत. आणि आपण कांही केले तरी रानसईचे भेकड लोक पुढे जाणार नाहींत, हे तुकारामाला माहीत असे.

रानसई व आजूबाजूच्या वाड्या यातील गरीब प्रजा जंगलांतील लाकूड, हिरडा-बेहडा, शिकेकाई वगैरे माल विकून आपले पोट चालवीत. सरकारी जंगलातून असला माल नेणें हा कायद्याप्रमाणें गुन्हा आहे. या लोकांना तुकाराम अचूक पकडी व त्यांचेकडून पैसे उकळी. त्याच्या कच्छपीं असलेल्या लोकांना तो फुकट सोडी. यामुळे लोक त्याचे शरमिंधे असत. जंगलच्या चोरीमुळे त्याला दारू, अंडी, कोंबडीं व रानची शिकार यांची कधींच वाण पडत नसे. आधींच त्याची प्रकृति धडधाकट. त्यात हा असला खुराक व डोंगरकीचा अनैच्छिक व्यायाम. यामुळें त्याची मूळची भक्कम प्रकृति आणखी बळकट झाली.

बाप्पाजींच्या कानावर या गोष्टी जात, पण त्यानीं तुकारामाला शासन करण्याचा कधी प्रयत्न केला नाहीं. कारण वर सांगितल्याप्रमाणें

कोणी आपली बेअब्रू झाली असे कबूल करीत नसत. रानात एखादी गोष्ट घडली तर ती खरी किंवा खोटी हे पुराव्याशिवाय कोण पारखणार? शिवाय असल्या भानगडी लोक आपसात मिटवून टाकीत. एखाद्या बाईला तुकारामाने रानात धरली अशी गोंग यावी. चौकशीअती राखीव जगलात बाई फाटी तोडण्यास गेली असता तुकारामाने तिचा कोयता हिसकावून घेतला, येवढेच निष्पन्न व्हावे. उलट तीच तुकारामाशी कोयता हिसकताना झटत होती असे बाहेर पडे. कारण अब्रूकरितां बायका खोटे बोलत. त्यामुळे असल्या भानगडीत कोणी पडत नसे. शिवाय तुकाराम बाप्पाजींशी लीनपणाने वागे व कधी आपली पायरी सोडीत नसे. उलट त्यानेच बाप्पाजींजवळ येऊन कांगाव करावा की, 'तुमच्या मालकीतून लोक चोरून लांकडे नेतात. तुम्ही त्याकडे दुर्लक्ष करतां. मीं चोरांना पकडून देतो. तुम्ही खटले भरा.' पण बाप्पाजी लोकांना नुसत्या शिव्या देत व गप्प बसत. जगल राखून त्यांना थोडासा पैसा मिळवितां आला असता, ही गोष्ट खरी होती. परतु दयाळू बाप्पाजी लोकाना कधी मना करीत नसत. उलट त्याची स्वतःच्या जंगलातून लाकडे नेण्याला लोकांना फूसच असे. कारण सगळे इनाम त्यांचे एकट्याचे होते. मग लोकानी लाकडांकारिता जायचे कुठें?

उंदराचे खोप्यातील भात कातोड्याने नेल्यावर मनोहर फिरत फिरत निघाला तो काळ्या कड्याच्या वाटेला लागला. अद्याप सध्याकाळ व्हावयाला पुष्कळ अवकाश होता. मनोहरचे पुष्कळसे आयुष्य पुण्यात गेले असल्यामुळे व रानसईत असतांना बाप्पाजींनीं त्याला लाडाचा म्हणून कधीं मोकळीक दिली नसल्यामुळे त्याला रानांत हिंडण्याची येवढी माहिती नव्हती. तो काळ्या कड्याखालीं आला. डोंगरगावच्या कातोड्यांनी शेताच्या राखणीच्या भांडणावरून झांज्या कातोड्याचा याच काळ्या कड्याखाली खून केला होता. त्यामुळे रानसईतील लोक एका विशिष्ट नजरेने त्या जागेकडे पाहत.

एक अक्राळविक्राळ काळा कडा काळ्या किर्र झाडींत डोंगराच्या निम्या उंचीवर, डोंगराच्या बैठकीपासून पुढे झुकला होता. एक हजार फूट उंचीचा एखादा काळाकभिन्न कातोडी डोंगराला पाठ लावून डोकीवर

उच्च असलेले कपरे पकडून उभा राहिला तर त्याची छाती जशी दिसेल तसा काळा कडा दिसे. काळ्या कड्यानें डोंगराचा निम्मा बोजा न वाकता खांद्यावर घेतला होता. पावसाळ्यात काळ्या कड्यावरून एकापेक्षा एक प्रचंड धबधबे खाली कोसळत. त्यातील सगळ्यात मोठ्या धबधब्याला 'भैरव' धबधबा म्हणतात. धबधब्याच्या आतल्या अंगाला एक मोठी घबड होती. कातोडी तिचा रंगमहाल किंवा चोरीचा माल लपवण्याचे कोठार म्हणून उपयोग करीत. काळ्या कड्याखालीं व वर आजूबाजूला गर्द झाडी होती. हेदु, कोसम, ऐन, आंबे वगैरे उंच उंच झाडाची सावट आणि वेलीझुडपें, जाळ्या यांची दाटण यामुळे ते ठिकाण एखाद्या किल्ल्याप्रमाणे अभेद्य झाले होते. तेथे भर दिवसा कुणाचा खून केला तरी पत्ता लागणे शक्य नव्हते. मनोहर तेथे आला तेव्हा संध्याकाळच्या सावल्या जमू लागल्या होत्या. झाडीत किर्र शांतता होती. इतक्यात त्याला आवाज ऐकू आला.

" सोड, सोड मला. नाही तर मी ओरडेन. "

" आता कशी गावलीस ! चाळवण्या दाखवतेस नाहीं ! मला काय सयाजीचा पोरगा समजतेस होय ? "

मनोहरनें अंजनाच्या झुडपांतून पाहिले तो तुकारामनें रानसईतील दीपाजीच्या लाडीचे मनगट पकडले आहे व तो तिच्या गोंडस हातांतून कोयता हिसकावून घेण्याकरिता हिसकाहिसकी करीत आहे. लाडीची लांकडांची मोळी व तुकारामाची कुऱ्हाड त्याच्या पायाजवळच पडली होती.

तुकारामाने लाडीच्या कोयत्याचा थरू पकडला. लाडीचे वय पधरासोळा वर्षांपेक्षा जास्त नव्हते. डोंगरातील राहणी व जवानीची हवा यामुळे लाडी ताकददार व चपळ झाली होती. तुकारामाशी लगट करून ती जोराचा सामना देत होती. तुकाराम तिच्याशीं लगट करण्यांत अनुपम सुख मानीत होता.

संधिप्रकाशाने लाडीवर गहिरा रंग चढवला होता. त्या दिवशीं ती पोपटी रंगाचे एक फाटक नेसली होती. त्या आंखुड फाटकाने तिचा पुष्ट व आरक्तगौर देह जेमतेम झाकला होता. हिरव्या पुष्पकोषांत उमललेल्या गुलाबकळीप्रमाणे ती त्या वस्त्रात मावत नव्हती. त्यात तिनें कडा उतरताना लुगड्यांत पाय अडकूं नये म्हणून काचा मारला होता. त्यामुळे तिच्या मांड्या व पोटऱ्या पूर्णपणें उघड्या पडल्या. डोक्यावर वजन घेऊन

तिला रोज डोंगराचे चढउतार करावे लागत. त्या व्यायामाने तिच्या पायांचे, हातांचे, पाठीचे व कटिभागाचे स्नायू रेखीव झाले होते. तुकारामाबरोबर चाललेल्या हिसकाहिसकींत ती हिरव्या म्यानांतून काढलेल्या समशेरीप्रमाणे चमकत होती. तिचे स्नायू सौंदर्यपूर्ण दिसत होते. तिनें तुकारामाच्या दांडगाईला प्रतिकार केला की, यौवनभराने उन्नत झालेले तिचे वक्षःस्थळ आणखी पुढे येई. त्या वेळी जणूं साम्राज्यशाही मदनाने आपल्या राज्याचा विस्तार केला आहे असे वाटे! सध्याकाळचे ऊन तिची अंगकांति आणखी आरक्त-गोर करीत होते. तिचे टपोरे डोळे श्रमाने चकाकत होते. त्यांत रानाची हिरवट प्रतिबिंबित झाली होती. दाताखाली दाबलेल्या तिच्या ओठातून रक्त गळत आहे असे वाटत होते. तुकारामाच्या शक्तीपुढे तिचे बळ दुले पडले. रानात अजगराने मेंकर पकडावी अशी तुकारामाने तिला धरली.

लाडीला मनोहरने लहानपणी पाहिली होती. दीपाजी बाप्पाजींचे कूळ होते. परतु तिच्या योवनाचा सौंदर्यशाली विकास त्याने आजच पाहिला. आणि तो देखील अशा प्रसंगाने की मनोहरला रानात पाहिलेले हें चित्र जन्मात विसरणे शक्य नव्हते. वास्तविक तो प्रसग असा होता कीं, क्षणाचाहि विलंब न लावता मनोहरने लाडीच्या मदतीस जावयास पाहिजे होते. पण तो त्या सौंदर्याचे निरीक्षण करण्याकरिता जाळीच्या मागे क्षणभर थांबला. इतक्यांत शेजारच्या जाळीतून वाघीण उठावी अशी एक कातोड्याची मुलगी धावत आली व तिने तुकारामावर कोयता उगारला. त्यामुळे लाडीच्या मदतीस निघालेला मनोहर पुन्हां थबकला.

"हात तुना मुर्दा पडिस! मेल्या, हात सोड नाही तर खापलून टाकीन."

तुकारामने लाडीचा हात सोडला व कातोड्याच्या मुलीचा कोयता धरला. लाडीपेक्षा ती कितीतरी चपळ होती. तिच्या बोटांतील कोपरबरासाच्या आगळ्या हिसकाहिसकीत कोयता हालला कीं चमकत. तिच्या दंडावर त्याच धातूच्या नागवाक्या होत्या व त्यांवर पाढऱ्या मोगऱ्या होत्या. तिचे हे पाढरे शुभ्र अलंकार तिच्या काळ्या मखमली-सारख्या मऊ कातडीला उठावदार दिसत होते.

चपळ अशा त्या कातोड्याच्या पोरीला तुकारामाने बळ करून पिरगळली. लाडी त्या मुलीच्या मदतीला आली व तुकारामला धरून ओढू लागली.

कातोड्याची पोर पण तुकारामला लाथा मारू लागली. तिचा आवेश व लढाऊ वृत्ति पाहून मनोहर स्तंभित झाला. तुकाराम आपल्याला आटपत नाहीं असें पाहिल्याबरोबर ती त्याच्या आंगठ्याला काडकन् चावली. तुकारामचा आंगठा रक्तबबाळ झाला व हातांतील कोयता टाकून तो वेडें-वांकडे तोंड करून विवळत उभा राहिला. मनोहर मोठ्याने हंसू लागला. त्याबरोबर त्या सर्वांचे लक्ष मनोहरकडे गेले. मनोहर हंसत पुढें आला. त्याचबरोबर वाघिणीसारखी उडी घालून आलेली कातोड्याची पोरगी आपला कोयता उचलून नागिणीच्या चपळतेने रानात नाहींशी झाली. लाडी सलज्ज झाली. तिनें डोक्यावर पदर ओढला व एक पाय वांकवून तिरप्या नजरेनें ती मनोहरकडे पाहूं लागली. तुकारामने आपले कैफी डोळे वटारून ताणले. मनोहरच्या अनपेक्षित [illegible] त्याचा दारूचा अंमल उतरला.

" दादा, तुम्ही म्हणता फारिस्टर बायकामाणसाना झोंबतों. ही बघा काय निशाणी झाली ती. तुम्ही साक्षीदार आहात. " तुकारामने मनोहरला आपली जखम दाखवली.

अद्याप मनोहर मोठमोठ्याने हसतच होता. त्याची हसून अगदीं मुरकुंडी वळली. त्या हसण्याचे प्रतिध्वनि काळ्या कड्यावरून उठले. या प्रतिध्वनींत गोड व कोमल अशा हंसण्याची दुसरी एक लाबलचक लकेर मिसळत होती. अर्थात् ते काळ्या कड्यावर घुटमळणारे पडसाद नव्हते. कातोड्याची पोरगी रानातून हंसत हंसत चालली होती. त्या हंसण्याचे ते आवाज होते. या हसण्यामुळें तुकाराम प्रथम वेंधळून गेला. परंतु अपमानामुळें त्याच्या रागानें उचल खाल्ली.

" बदमाष कातकरीण ! माझा अंगठा फोडलास. मी एक दिवस याचा बदला घेईन. लाडे, आण तो कोयता इकडं. " घसा फुगवीत तुकाराम ओरडला.

" कशाकरितां ? " मनोहरनें विचारलें.

" पंचनामा करायचा आहे कोयत्याचा. या पोरीवर मी खटला भरणार सरकारी हद्दींत लांकडं तोडल्याबद्दल. "

" लाडीची रानांत इज्जत घेऊन उलट तिच्यावर खटला? चांगलाच न्याय आहे. फॉरेस्टर, हें रान आमच्या मालकीचे आहे."

" दादा, मी मुदलीं फारिष्टात लाकल तोडलींच नाहीत. हीं सगळी लांकडं मालकींत तोडलीं. मी खुणा दाखवते. हा फारिष्ट सदान् कदा माझ्या मागावर येतो अन् रानांत मला आडवतो."

लाडीला मनोहरमुळे धीर आला होता.

" अग लवडे, पहिली चल माझ्याबरोबर. मग बाता कर." तुकारामनें लाडीचा हात पकडला.

" तुकारामबुवा, तुम्ही खटला भरा. ती तुमच्या बरोबर येईल. पण तुम्ही तिच्या अंगाला झटू नका."

" इनामदार, तुम्ही आपल्या घरचे इनामदार. मी तुम्हाला बजावतो की, सरकारी कामाला व्यत्यय आणूं नका. गुन्हेगाराला मदत करूं नका."

" गुन्हा प्रथम तुम्ही केला आहे. तुम्ही माझ्याबरोबर पोलिसकडं चला." मनोहरनें तुकारामचे मनगट पकडले.

तुकारामने मनोहरवर कोयता उगारला. मनोहरनें चपळाईने कोयता सोडवून घेतला व लांब दूर फेकला. लाडीने कोयता उचलला व ती लांब जाऊन उभी राहिली. तुकारामला आपल्या शक्तीचा गर्व होता. आतां लाडीसमोर आपल्या शक्तीचें प्रदर्शन करण्याची त्याला आयतीच संधि चालून आली. तो मनोहरकडे वांकडे डोळे करून उपाहासात्मक हसूं लागला.

" तूम्ही माझी बरोबरी करणार? तुम्ही बगीचांतलं फूल अन् मी जंगलचा रानवट माणूस. जंगली अदमी. वाघ लेंडी टाकतो माझ्यासमोर. काट्याचं पाणी होतं माझ्या पायाखाली. हा तुकाराम फारिस्ट ताकतीला रानरेडा आहे, रानगवा आहे, हत्ती आहे, वाघ आहे. पण रागावला की कोळसिदा आहे, समजलात राव!"

तुकारामानें मनोहरची मानगूट पकडली. मनोहरला तुकारामाच्या स्पर्शाची किळस आली. त्यानें हिसडा मारून तुकारामाला होलपाटलें. तुकाराम तिरीमिरी येऊन करवंदीच्या जाळींत जाऊन पडला. तो पुन्हा त्वेषानें उठला व त्यानें मनोहरवर हल्ला केला. या खेपेस मनोहर त्याला

पकडण्याच्या भानगडीत पडला नाहीं. त्याने तुकारामाच्या डोक्यावर ठोसा चढवला. तुकाराम पुन्हा कोलमडला. मनोहरच्या हाताला पण झिगझिण्या आल्या. कारण, तुकारामाच्या डोक्याची कवटी निदान एक इंच तरी जाड होती. तुकारामाने पुन्हा हल्ला चढवला. मनोहरने चपळाईने त्याला गचांडी दिली, टांग मारून खाली पाडले व लाथा लगावल्या. परंतु तुकारामचा स्पर्श होऊ दिला नाही. अशी झटापट बराच वेळ चालली. मनोहरच्या चपळाईपुढे तुकारामचे कांही चालले नाही. तेव्हां सूडबुद्धीने तुकारामने मनोहरचा शर्ट धरून ओढला. शर्ट पार फाटला व त्यांतून मनोहरचे गोरे अंग सूर्यप्रकाशात चमकू लागले. आतां तें सौंदर्य न्याहाळण्याची लाडीची पाळी आली. मनोहरचे कसलेले शरीर, पिळदार स्नायू जेव्हां युद्धात भाग घेऊ लागले तेव्हा ते जोरदार रक्ताभिसरणाने फुगूं लागले. थोड्या वेळानें तुकाराम थकला. मनोहरने त्याला जाळीत फेकले. तेथून त्याला उठता येईना. थोडा दम खाल्ल्यावर तो उठला.

" इनामदार, मी पेलो होतो म्हणून. नाही तर दाखवलं असत. बच्चमजी, याद राख! कवा बी वचपा काढीन. मी तुकाराम फारिष्ट वाघ आहे. तुला कडाकडा चावून खाईन." तुकाराम अंग झाडून उठला व सरकारी शिक्क्याची लांब अंतरावर पडलेली कुऱ्हाड उचलून रानांतील आपल्या फॉरेस्ट चौकीकड निघून गेला. मनोहर त्याच्या शिद्द्यासारख्या आकृतीकडे पहातच राहिला.

इतक्या अवधींत सध्याकाळ होत आली.

" लाडे, उचल तुझी मोळी. आपण आता जाऊ या."

लाडी मोळी उचलून मनोहरच्या मार्गे चालू लागली. ते एक गवड उतरून खाली आले नाहीत तो कातोड्यांनी रान वेढल्याची गोंग झाली.

" कातोडी रातची पारध करणार?" मनोहरने लाडीला विचारलें.

लाडी मोळी फिरवून वळली व हंसली. नतर गवंड सोडून ती बाजूला झाली. पारध त्या गवंडाने येणार असे समजून मनोहरने पण लाडीचें अनुकरण केले व तो गवंड सोडून बाजूला सरला.

" डुक्कर आहे वाटतं!" दगडी ढासळल्याचा आवाज आला. त्यावरून मनोहरनें तर्क केला.

"हाय. मोठा डुक्कर हाय एकाड्या. पण दोन पायाचा हाय." लाडीच्या तिखट कानानी तुकारामची पारध चालली आहे हे कातोड्याच्या गोंगीतून केव्हाच ऐकले होतें. तिला कातोड्यांची भाषा येत होती.

काही तरी गमत पहावयाला मिळणार, अशा दृष्टीने लाडी हंसत हसत गवडाच्या वरच्या अगाला पाहू लागली. इतक्यात आग्याचे मोहळ मागे लागावे त्याप्रमाणे तुकाराम फॉरेस्टर वरून दडदडा धावत आला. त्याचा विद्रूप चेहरा भीतीने आणखी भयकर दिसत होता. मनोहर व लाडी याच्याकडे पाहण्यात त्याने एक क्षणसुद्धा घालवला नाही. तो खरोखर डुक्करमुसंडीने पायऱ्याच्या खोऱ्यात उतरला. तो खाली गेला इतक्यात बाजूच्या जाळया हालल्या व तिरकमस्याला भाली लावलेले कातोडी जाळीजाळींतून बाहेर पडले व ओरडत त्याचे मागावर गेले. त्या कातोड्याच्या मुलीने रानांतील हकीकत कातोडवाडीत जाऊन सागितली होती. म्हणून कातोडी तुकारामाला मारण्याकरितां त्याचे मागे रानांत शिरले होते.

मनोहर आणि लाडी खाली आले तेव्हा संध्याकाळच्या सावल्या रानाडोंगरावरून काळोख करू लागल्या. डोगरमाथ्यावरचे कारवीचे मस्त मधुपराग सुवासाच्या डोंबाप्रमाणे उठले.

सुठ आणि बाबू साठ वर्षांनी फुलते, तर कारव सात वर्षांनीं फुलते. यदा कारवीला बहर आला होता. कारव नुकतीच फुलू लागली होती. गुलाब, चंपक, बकुल, जाईजुई, चमेली, राजाची बाग दरवळून टाकतील. कवींनीं त्याची स्तुति गाइली आहे. पण गरीब बिचारी कारव देवाजीचा बगीचा दणाणून टाकीत होती. तिचे वर्णन कोण करणार ?

डुगीच्या दरडीवरचा एक गुराखी लाडीला उद्देशून एक लावणी म्हणूं लागला. त्याने एक चरण म्हणून 'जी जी' केले कीं, समोरील घशीवरचा दुसरा गुराखी दुसरा चरण गाऊन दाखवी. मनोहरसमोर आपल्या सौंदर्याचे इतके अभिनंदन होत आहे हें पाहून लाडी पण गालाच्या खळींत हंसें लपवूं लागली.

सराईतील संध्यारंगांनीं आकाश भरलें. सप्तरगाचे सप्त समुद्र काळदरीवरील निळ्या आकाशांतील विखुरलेल्या ढगांवर भरती आल्याप्रमाणे पसरले. आता कारवीच्या वासाने रान पेटलें. त्या सुवासाच्या वणव्यांतून सयाजीचा

मुलगा मुकुट आडवीकडून पावा वाजवीत गुरे घेऊन आला. तेव्हां लाडीने भराभर पाय उचलला. पाव्याच्या मजुळ आवाजाने दरी भरली. मुकुटचा पावा ऐकून मनोहरला आपल्या नादुरुस्त क्लेरिओनेटची आठवण झाली. त्याने आपली ती विलायती बांसरी मुबईहून नीट करून आणण्याचे ठरवले. मनोहर ते वाद्य वाजविण्यात प्रवीण होता.

" लाडे, तुकाराम तुला त्रास देतो. मग तू रानात कशाला जातेस ? " वाटेने मनोहरने लाडीला प्रश्न केला.

" मनुदादा, शेतीवर आमचं भागत नाय. सराईच भात भादव्या काळाला ठेवायच अन् लाकुडफाट्यावर आगोटीपर्यंत दिवस काढायचे. बाबा पडलाय. नाहीं तर तो येतो सगती ! "

मनोहर विचार करू लागला.

" लाडे," मनोहर पुन्हां लाडीला कांहीतरी विचारणार होता, इतक्यात लाडी बोलली,

" दादा, तुम्ही या वाटनं जा. मी इकडून जाते."

" लांबच्या वाटेन कां जातेस ? "

" कोणी पाहील ना ! " लाडीनें एक मुरका मारला.

मनोहरच्या हृदयात चर्र झाले. त्याला वाटले, ' छेः ही गोष्ट मनात येऊं देतां कामा नये. हा भोळा भाव आहे. ह्या बोलण्यांत कांहीं पाप आहे, असें आपण का म्हणून गृहीत धरावे ? '

मनोहर तिच्याकडे कुतूहलाने पाहूं लागला. प्रत्येक खेपेला तिचे सौंदर्य त्याला जिव्हाळी लावी. ती दोघे गावाजवळील पादणीवर आली. तेव्हा कुंपणाच्या पलीकडून चाललेले केसूतात्या गर्भित अर्थानें खोकले.

" ह हः हं हः ! काय नाय्, काय नाय्. " केसूतात्यानी आवाज काढले.

" लाडे, मी पण येतो तुझ्याबरोबर दीपाजीला बघायला. "

लाडीला काय बोलावें ते सुचेना. मोळी फिरवून ती चकित नेत्रांनीं मनोहरकडे पाहूं लागली. तिच्या डोक्यावरच्या तिरप्या झालेल्या मोळीचे टोंक धारईवरच्या टपोऱ्या चांदणीकडे रोखलें गेले, तेव्हां मनोहरला दोन चांदण्या दिसल्या.

" येऊ ना ! " मनोहरनें विचारलें.

" या. " दम टाकून लाडीने उत्तर दिलें.

मग ती दोघें अळीमिळीने गावात शिरली. गावात त्यांना कळले कीं, कातोड्यांनीं मोठ्या घरावर गर्दी केली आहे. म्हणून मनोहर लाडी-बरोबर न जाता आपल्या घराकडे वळला. तुकाराम रानातून गांवात पळत आला तो मोठ्या घरांत आश्रयाला शिरला होता. तुकारामने बाप्पाजीचा आश्रय घेण्यांत मोठा शहाणपणा केला, नाही तर कातोड्यांनीं त्याचा खून केला असता.

कामठ्याला भाली लावलेल्या कातोड्यांनी मोठे घर वेढले होतें. कातोडी, कातोडणी व त्यांचीं मुलं-बाळे तुकारामला आईमाईवरून शिव्या देत होती. ' तू बाहेर तर नीघ ' म्हणून ती दम देत होती.

" बाप्पा, तू त्याला घराच्या बाहेर काढ म्हंज दावतो आमी त्याला. " कोया ओरडला.

" बाप्पाजी, आमी तुझ्या पायरीला पाय नाय लावणार.मुर्दा करू फारिष्टाचा. आमच्या बायका रानात धरतो. आमी काय नाबर आहोत ! तुक्या, तूं बाहीर नीघ की भालीनी कोथळा फोडतो तुझा डुकरावाणी. " अंकुशा नांवाचा कोयाचा तरणाताठा भाचा ओरडला.

इतक्यात शेतावर फेरफटका मारावयास गेलेले बाप्पाजी अगणांत झाले. अगण कातोड्यानीं काळेभोर झाले होते.

" काय दगा माडलाय रे ! " बाप्पाजीनीं दरडावून विचारले.

" आमच्या सोरीची रानात मस्करी करून तुकाराम तुझ्या घरात दडलाय. अंधूने त्याला माळ्यावर लपवलाय. त्याला तेवढा बाहेर काढून दे. " कातोडी बोलले.

" तुम्हांला त्याचा खून करून देऊ ? जा, घरीं जा. " बाप्पाजींनी हुकूम सोडला.

" त्याला घेतल्याबिगार नाय जाणार ! " सर्व कातोडी निश्चयानें ओरडले. त्यानीं बाप्पाजीसभोवती मोठा गिल्ला मांडला.

आजूबाजूला जमलेले गावकरी देखील बाप्पाजींच्या जिवाला धोका आहे हे पाहून घाबरले. पण बाप्पाजी सर्वांच्यावर उंच व धीरगंभीर उभे राहिले.

" तुम्ही जाता कीं देऊ एकेकाच्या थोबाडीत! कोया, थेरड्या, तू पण थेर करायला लागलास का? माझ्या आश्रयाला तुकाराम आला आहे. त्याच्या एका केसाला धक्का लागणार नाहीं. चला, व्हा चालते, की देऊ कंबरेत लाथ?"

कुरबुरत, चडफडत एका एका कातोड्याची सावली उठली व कातोडवाडीच्या रस्त्याला लागली. लाडीवरून येवढी भानगड वाढली आहे असें पाहून बाप्पाजींना टाळण्याकरिता मनोहर घराच्या बाहेर पडला व दीपाजीच्या घरीं गेला.

---

## प्रकरण ३ रें

# शेतकऱ्याची झोपडी

दीपाजीची झोपडी नदीकाठच्या दरडीवर होती. तेथे पलीकडच्या बाजूस एक टेप आला होता. घरावर केंबुळच होती. परतु कूड, अगण व तुळशी-वृंदावन तांबडमातीने स्वच्छ सारवले होतें. दीपाजीचे घरांत दिवा लागला नव्हता. मनोहर झोपडीजवळ आला तेव्हा कारवीच्या मधुर सुवासांतून झेडूचा तिखट वास आला. कुपणाचे कडेनें मखमालीचे गोंडे लागून राहिले होते. ताऱ्यांच्या उजेडात झेडूचे गेद गर्दी करून उभे राहिलेले त्याला दिसले. दीपाजीचीं तीनचार लहान मुले अगणातील अधारात छापापाणी खेळत होतीं.

मनोहर वेसकटींतून आत शिरला तेव्हा मागील बाजूला लाडीने मोळी टाकल्याचा आवाज आला. झोपडीच्या पुढील बाजूने मनोहर व मागील दाराने लाडी हीं एकाच वेळी आंत आलीं. लाडी वाटेत कातोड्यांची चौकशी करीत उभी राहिली होती. म्हणून घरी पोंचायला तिला जरा उशीर लागला. अद्याप रानांतली गोष्ट घरीं कळली नव्हती.

"लाडे, जा. वाण्याच्या इथ जा अन् पैशाचा चा अन् पैशाचा साकऱ्या आण ! तुझ्या बाबाच्या घशाला कोरड पडली हाय." लाडीच्या आईने ओरडून लाडीला सांगितले.

लाडीची आई चुलीच्या उजेडात पीठ मळत होती. तिने चुलींतील जळते कोलीत उचलले व त्या उजेडात भाताचे पाणी आटले किंवा नाहीं ते पाहिलें. भात रटरट करीत होता. कांजीच्या वासाने घर भरले होतें.

"माझ्याजवळ पैसे नाहींत बय."

"माझ्याजवळ हायती. मघाशी कोंबडवाउल आला होता. दोन पैशाला मी एक अडं विकलं तुझ."

लाडी आईकडे जाण्याकरितां माजघरांत आली.

"कोण आहे?" लाडीने अधारांत उभ्या असलेल्या मनोहरला कंपित आवाजांत विचारले.

" मी मनोहर. " मनोहरने उत्तर केले.

" आई, दिवा लाव. बाप्पाजीचे मनुदादा आलेत. " लाडीने ओठाणातील दाराला खिळा मारून अडकावलेले घासलेट तेलाचे टमरेल काढले व ती चुलींतील कोलिताने टमरेल पेटवूं लागली.

" लाडे, तेल नाय. पळ पळ वाण्याकडं. पैशाची चाची बुकी, साखऱ्या अन् पैशाच तेल आण. " हळू आवाजांत लाडीची बय कुजबुजली. लाडी मागील दाराने पसार झाली. लाडीच्या बयनें अंधारांत मनोहरपुढे पिढे माडले.

" मनुदादा, बसा इथ. मी दिवा लावते. "

मनोहरला आपल्याकडे आलेला पाहून बयला आश्चर्य वाटले. कारण दीपाजी बाप्पाजींचे नावडते कूळ होते. सकटपरंपरेने दीपाजी डबघाईला आला होता. बाप्पाजींची दरसाल दीपाजीवर बाकी राही आणि दरसाल त्याचे पीक कमी येई. त्यातून दीपाजीच्या अनेक भानगडी असत अनेक कुलंगड्यात तो स्वतःला नेहमीं गुरफटून घेई. कोणाला लग्नाला पैसे दे, कुणाचे जतीमतीनें खाते लिहून दे, कुणाला जामीन रहा, अशा त्याच्या अनेक भानगडी चालत. या भानगडींतून महीसलामत बाहेर पडताना त्याची पुरेवाट होई.

बाप्पाजींना त्याने पैशाच्या खूप खड्ड्यांत आणले होते. त्याचे स्वत.चे असें एकच लहानसे शेत होते. ते पण तो धड लावीत नसे. त्यांतून एक मोठा ओहोळ गेला होता. ओहोळामुळे दरसाल खाडी पडत, भात वाहून जाई आणि दीपाजीची नुकसानी होई. पुढे थकलेल्या पैशाच्या पोटीं बाप्पाजींनीं ते शेत दीपाजीपासून विकत घेतलें. हजारो रुपये खर्च करून बाप्पाजींनीं त्या शेताच्या या दरडीपासून त्या दरडीपर्यंत ताल घालून ओहोळाच्या दुथडी शेतांत घेतल्या व सुरुग लावून, चर खणून ओहोळ बाजूनें काढून लावला. पाचसहा बिघ्याची एक मोठी पाटी तयार झाली. बाप्पाजींनी त्या पाटीचे नाव राजपाटी ठेवले.

काही दिवस ते शेत दीपाजीकडेच वहिवाटीला होतें. पण दीपाजी जेव्हां मक्ता थकवू लागला तेव्हां बाप्पाजींनीं त्याचेकडून शेत काढले.

राजपाटी म्हणजे बाप्पाजींची जीव की प्यार. सदान्कदा ते राजपाटी-बद्दल गोष्टी बोलत. सबंध दिवसांत ते राजपाटीबद्दल एकदा देखील

बोलले नाहीत असा दिवस जायचा नाहीं. त्यांच्या बोलण्यांत या नाही त्या निमित्ताने राजपाटीचा एकदा तरी उल्लेख होई. ' माझी राजपाटी ' म्हणून ते आपल्या नव्या शेताला संबोधीत. राजपाटी म्हणजे त्याच्या कृषिकर्म-योगाचा कळस होता. त्यांनीं आपले अस्थि, चर्म, घर्म, रक्त, द्रव्य, सर्व काही राजपाटींत घातले होते. त्यानी डोक्यावर दगडी नेल्या, मातीची घमेलीं वाहिली, पेटारी लावून माती ओढली, स्वतःच्या गाड्या लावून खळगे भरले, हत्तीच्या लोटासारखा ओढा फिरवला, तेव्हां राजपाटी पिकू लागली. त्याची रोज एक तरी चक्कर राजपाटीवर होई. राजपाटी भाताने हिरवीगार झाली कीं, ते प्रसन्न होत. तिच्या कणसाबरोबर ते डुलत. ह्या राज-पाटीचा उल्लेख करतांना दीपाजी ' माझी रजपाटी ' म्हणून करी. त्यामुळे बाप्पाजीच्या डोक्याची शीर उठे. याच कारणामुळें दीपाजी बाप्पाजींचा नावडता होता. बाप्पाजी दीपाजीला कधीं दया दाखवीत नसत.

मनोहर अंधारात बसला. घरांत दीपाजीचा बिछाना कुठे आहे हें साग-ण्याची जरूरी नव्हती. कारण तो सारखा कण्हत होता. लाडी परत येई-पर्यंत मनोहरला त्याचे नुसते कण्हणे ऐकत बसण्याखेरीज दुसरा मार्ग नव्हता. लाडीचा बारका भाऊ जान्या गव्हारी होता. जनावराना दिवसा माशा चावतात, म्हणून गुरे गडद पडल्यावर परत फिरत होती. कारवटांत घुसलेल्या गुरांच्या अंगाला कारवीचा सुगंधी मध लागला होता. गुरे गांवां-तून जाऊ लागलीं की घमघमाट सुटे. जानु गुरे घेऊन वेसकटींत आला, तेव्हा सुवासाचा एक भपकारा आला. एक बैल, एक दुभती नऊ-टाकी गाय, एक कालवड व दोन बारकीं वासरे एवढेच दीपाजीचे गोधन होते.

जानूच्या पाठोपाठ लाडी दिवा घेऊन आली. शेजारच्या घरीं तिने दिवा लावला होता. कारण बहुधा दीपाजीच्या घरी काड्याची पेटी नसावी. दिव्याला हाताचा आडोसा देऊन लाडी जपून दिवा घेऊन आपल्या घरीं आली. तिने दिवा ओटाणाच्या दारात लावला. दिव्याचा धूर नव्याच्या पुनवेला दारावर बांधलेल्या लोंब्याच्या तोरणाकडे जाऊं लागला.

दिव्याच्या उजेडांत मनोहरला काय दिसलें? स्वच्छ दारिद्र्य. कुडाला पाजवून आणलेले विळे, कोयते व कुऱ्हाडी लटकावल्या होत्या. शिक्या-वरून दोनचार तांबडे भोपळे, कोहळे व काकड्या ठेवल्या होत्या. मागील

बाजूला कोबड्याचा झापा होता. कोपऱ्यात नाचणीची बारीकशी कणग होती. माळ्यावर दोनचार भाताचे डबे. ते भात देखील नव्याचे होते. कुडामध्ये लाडीनें लिंपलेला एक फुटक्या आरशाचा तुकडा होता. यान आरशांत लाडीचे सौंदर्य रोज प्रतिबिंबित होत असे. शेतकऱ्याचे दैन्य पाहून मनोहर विरघळला. अनुकंपा आणि सहानुभूति यांनीं त्याचे हृदय भरून आले. याच दारिद्र्यात ही सुकुमार कलिका फुलली, ही सौंदर्यमूर्ति मुसावली, ही प्रेमज्योति प्रकाशली ! राजाला जशी दिवाळी माहीत नसते तशी दरिद्र्यालाहि माहीत नसते. गर्भश्रीमंताच्या जशी श्रीमती गावी नसते तशी जन्मदरिद्र्याच्या दारिद्र्य गावी नसते. मनोहरच्या पूर्णपणे लक्षात आलें कीं, लाडी, दीपाजी, बय यांचे जीवन बेदरकारपणे कळिकाळाशीं झुंज खेळत आहे. त्याना दारिद्र्याची कल्पना नाहीं, त्याचा खेद नाही. जीवनाच्या आनंदाला त्याचे दारिद्र्य आड येणें शक्य नाहीं.

" कुठ आहे दीपाजी ? " मनोहरने विचारले.

" इकड आतल्या खोलीत. " लाडीनें दिवा काढून मनोहरला वाट दाखवली.

" मनुदादा आल्यात बाबा. बाप्पाजींचे मनुदादा. " लाडी ओरडली.

" माझी राजपाटी कशी आली आवदा ? " दीपाजीने विचारले. ताप त्याचे अंगांत मावत नव्हता. तापाने त्याचे डोळे लाल झाले होते. मधून-मधून तो बावचळत होता.

" छान भात आहे." मनोहरने त्याचे समाधान करण्याचा प्रयत्न केला.

" भात पोटरीत आल अन् मी पडलों. राजपाटीचं लोंबट पाहिल्याशिवाय कधी राहिलों नाय. आवदा काय राजपाटी नद्रस पडत नाय. काय माझी राजपाटी सोन्याचा तुकडा हाय. पण मी खुषीन दिला तुझ्या बापाला. मला कराज झाला. आता तें कस फिटणार ? मी विचार केला, राजपाटी कुठली आमच्या अभाग्याच्या नशिबात ! मग मी बाप्पाजीला म्हटल, तो समना खाऊन जाईल त्यापरीस तू खा. मी अजून कोणाची दिडकी बुडवली नाय. बाप्पाजीला पण मी दोष देत नाय. बाप्पाजीनं पण उणीअधिक दिडकी माझ्याजवळून घेतली नाय. माझ्या कर्माला मी दोष देतों. पण बाप्पाजींनी माझ्याकडून पाटी काढली. बरं काढली तर काढली. पण मला चांगल तरी

शेत द्यावं. तर माझ्या गळ्यात खरपट बाधलं. मीं मक्ता कसा घालायचा अन् कराज कसं फेडायचं ? मला चांगलं शेतपोत द्यायाला सांगा त्यांना. एक बैल पण द्या म्हणावं कर्जाऊ. एका शेपटावर माझी शेती. एक बैल अन् चांगल शेत मिळाल म्हणजे आवंदा नाय पण म्होरल्या सराईला बाप्पाजींच कराज फेडतो. आवदा गाडी पण करायचा विचार आहे. अव, शेतीवर भागतं काय कुणब्याचं ! जोडधंद्याबिगार शेती नाय. " तापाच्या भरांत दीपाजी बडबडू लागला.

" दीपाजी, तुम्ही बरें व्हा. मग मी बाप्पाजींबरोबर शेताची गोष्ट काढतों. तुम्हाला मलेरिआ–हींवताप लागलाय. पोराला बरोबर द्या म्हणजे कोयनेल पाठवतों. रोज घेत जा म्हणजे बरं वाटेल तुम्हांला ! "

" नाही बाबा, नड आहे ही शेताची. सरावणाच्या सरत्या सोमवाराला कवळ्याची भाजी काढायाला गेलों शेतावर, तिथ झपाटलो. देव खेळवला पाहिजे. भगतान गुण सागितला हाय. "

इतक्यात भगत आलाच. बयनें पाय बाधून तुरेवाला कोंबडा आणला. तेव्हां मनोहर घरीं जाण्यास उठला.

" माझ्या पुता, मोठ्या आईकडून लिंबाचं लोणचं मला पाठीव. कश्शाची चव लागत नाय. "

" ठीक आहे. " मनोहरने आश्वासन दिले.

मनोहर जानूला बरोबर घेऊन बाहेर पडतो तो लाडी गाईची धार काढून दुधाची तपेली घेऊन घरात चालली होती ती त्याला वाटेंत भेटली.

" दादा, चहा ठेवला आहे. चहा घेऊन जानू. " लाडीने मनोहरला आग्रह केला. त्या वेळीं तिचे डोळे उत्कटतेने भिरभिरत होते. मनोहरच्या आगमनामुळें लाडी हुलारली होती. घाईने तिचा दम छाटला होता. अधुक उजेडांत तिच्या गालांवर चढलेली लाली व श्रमामुळें उपळलेले घर्मबिंदू मनोहरला स्पष्ट दिसत होते. अननुभूत अशा अतर्गत आनदामुळे तिच्या खुल्या चहऱ्यावरे एक हास्य विकासलें व तिची शुभ्र दंतपक्ति चमकली.

मनोहर लाडीचा अपमान होईल म्हणून चहाकरितां थांबला. लाडीचा चहा कसाहि होवो, मनोहरला तो आज प्रिय होता. त्याच्या हृदयांत आनदी-

आनंद झाला होता. त्याने पुष्कळ सयम करून पाहिला, पण लाडीचें आकर्षण त्याचे डोक्यांतून निघेना. एक गोड साहस त्याला खिजवून जीवनाची परीक्षा देण्यास बोलवीत होते. त्याने विचार केला कीं, जीवनाच्या या खेळात सामील न होता गंमत पाहण्यास काय हरकत आहे? मनोहरनें सबध पितळी भरून चहा ढोसला व तो बाहेर पडला. त्या वेळीं वर आकाशात अनत नक्षत्रे चमकत होतीं. मनोहर झोपड्यांच्या रांगातून व खेडेगावच्या अधारातून ' मोठ्या घरीं ' आला.

तुकाराम फॉरेस्टर माजघरांत ताब्या-पितळी घेऊन रगडून जेवीत होता. एकावर एक असे तो मोठे घास घेत होता. बाप्पाजीनीं त्याला कातोड्यांच्या भीतीने बसवून ठेवले होतें, व जेवावयास वाढले होतें.

घरीं आल्यावर मनोहरने कोयनेलच्या गोळ्या जानूजवळ दिल्या व सुभद्रेला त्याला लिंबाचे लोणचे द्यावयास सागितले.

" कोण आजारी आहे? " बाप्पाजीनीं विचारले.

" दीपाजी. "

" ह, सराई आली. हातातोंडाशी घास आला. आता तो आजारी पडायचाच. लोकांचा शुभ दिवस तो याचा घातवार. पावसाळ्याचे चारी महिने मोठा शेतीचा उजेड पाडला, तर सराईला आतां दिवे लावणार! रडतोंडीचा घाट—कर्मदरिद्री आहे झाल. मनोहर मी त्याला मदत करून थकलों. मग तू—पण कशाला धर्माआड कुत्रें. दे त्याला काय पाहिजे तें. तिला कोंड्यांस पण द्यायला सांग अन् लाडीला सांग, उद्यां कढी घेऊन जा त्याच्याकरितां. "

# प्रकरण ४ थें

# मोठें घर

लाडीच्या झोपडीतून जेव्हा मनोहर परत आला तेव्हा त्याचे ' मोठें घर, काळोखांत त्याला आणखी मोठें दिसलें. या घराशीं त्याच्या बाळपणींच्या किती तरी आठवणी निगडित झाल्या होत्या. पुण्यांत शाळेत किंवा कॉलेजमध्यें असतांना किती तरी वेळां हे घर अन् त्याचे परसू स्वप्नांत येऊन तो झोंपेंत रडला असेल. बाप्पाजी अन् राजसबाई वारलीं आहेत व तो जगांत एकटा आहे, अशीं त्याला स्वप्नें पडत. मग तो कैक दिवस खिन्न होऊन हिंडे. त्याचे सहविद्यार्थी त्याला घरकोंबडा म्हणून चिडवीत. तेंच हे त्यांचें घर.

रानसईत देशपांड्यांचीं तीनचार घरें होती. पण तीं विभक्त होतीं. बाप्पाजींचें घर सर्वांत मोठे म्हणून त्याला ' मोठें घर ' म्हणत. बाप्पाजींना ' मोठे बाबा ' व राजसबाईंना ' मोठ्या आई ' म्हणण्याचा प्रघात होता.

बाप्पाजी उंचडाले, धिप्पाड व भरीव होते. त्यांची छाती काळ्या कड्याप्रमाणें रुंद होती. त्यांचें कर्तव्यपरायण अंतःकरण त्या डोंगराप्रमाणेंच कठोर होते. डोंगरातून जसे जिवंत झरे निघतात तशी त्यांच्या हृदयांत दया होती. ते लोकांना औषधे फुकट देत. कुणाला आवण कमी पडले तर तें आपलें आवण त्याला देत. कुणाचा बैल थकला तर त्याला ते आपला बैल देत. त्यांचे इथे भिकाऱ्याला सुपानें भिक्षा मिळे. मालकाचें कोठार वाढावे म्हणून उलट भिकारीच मूठभर धान्य परत सुपात टाकीत. मोठ्या घरीं वाटसरूंना लोटा लोटा ताक मिळे. जनावरांना किवणे पडलीं तर स्वतः बाप्पाजी त्यांची सेवा करीत. एकदां भैरव धबधब्याच्या कोंडींत रात्रीचीं गुरें वाहिलीं, ती त्यांनीं कंदील लावून पुरांत उडी टाकून काढली. एकदां एक गाय धशीला पडली. बाप्पाजींची इतकी ताकद होती कीं, एका बाजूला गांवकरी तर एका बाजूला एकटे ते स्वतः, असे मिळून त्यांनीं गाय खालीं आणली.

बाप्पाजींचा आहार देखील त्यांचे शरीराप्रमाणे मजबूत होता. गणेशचतुर्थीच्या दिवशीं ते गणपतीची भक्ति म्हणून एकवीस मोदक खात.

त्याना वाटींत आमटी वाढलेली आवडत नसे. कारण त्यांचीं जाडीं पांच बोटे वाटींत मावत नसत. त्याचे इथें वाडगे रूढ होते. मुंबईस ते कोणाचे इथे पाहुणे जात नसत. कारण त्याच्याकरिता यजमानाला शेजारच्या घरून स्वयपाकाला भांडी आणावीं लागत. खाणावळीत जाण्याचा प्रसग आलाच, तर खाणावळवाल्याची तक्रार राहू नये म्हणून आधीच ते आपल्या जेवणाचा दुप्पट दर ठरवून टाकीत.

प्रथम ते शकराची उपासना करीत. पण पुढे ते विठ्ठलभक्त झाले. त्याचा इतिहास गमतीदार आहे. बाप्पाजी शंकरभक्त, तर मोठ्या आई विष्णुभक्त. त्या विठ्ठलाची उपासना करीत. गोविंद म्हटल्याशिवाय त्या घास घेत नसत. बाप्पाजी शिवलीलामृताचा एक तरी अध्याय वाचल्याशिवाय अन्नग्रहण करीत नसत. त्याचा महाशिवरात्रीचा उपास म्हणजे पंचक्रोशींत जाहीर असे. ‘ महादेव म्हणजे सर्व देवात मोठा; तुझा विष्णु त्याचा दास ’ म्हणून ते मोठ्या आईना चिडवीत. प्रसगी त्याचीं देवाच्या श्रेष्ठत्वावरून भाडणे पण होत. पण विठ्ठलभक्तानीं रागावतां कामा नये; दया, क्षमा दाखवली पाहिजे. त्यातल्या त्यांत पतिदेव हा सर्व देवांत श्रेष्ठ, तेव्हां त्यांच्या तोंडी न लागणे हाच सतीचा धर्म समजून, मोठ्या आई प्रत्येक वेळीं माघार घेत. तरी पण त्या विठ्ठलाशीं एकनिष्ठ होत्या. त्या चुकून सुद्धा शकराच्या देवळांत गेल्या नाहींत.

एकदा सर्व देशपाडे-मडळ नाशिक-त्रिंबकेश्वरच्या यात्रेला गेले. बाप्पाजींनीं त्रिबकाचे देऊळ तेच विठ्ठलाचे आहे, अशी थाप मारून मोठ्या आईना देवळांत फसवून नेले. मोठ्या आईनीं भक्तिभावानें शकराला ‘विठ्ठला, विठ्ठला’ करून नमस्कार केला. त्या म्हणाल्या, “विठ्ठला, काय तुझे ध्यान! काय तुझे रूप ! तुला पाहून माझा चौऱ्यांशी लक्ष योनींचा शीण रे गेला.”

नंतर आश्चर्यचकित बाप्पाजींकडे पाहून त्या म्हणाल्या,

“ रुक्मिणीचं देऊळ कुठ आहे ? ”

बाप्पाजी व देवळातील पुजारी वगैरे आश्चर्यचकित झाले. लोकाना वाटलें ही बाई वेडी आहे.

“ रुक्मिणीचं देऊळ ! पण तुझा विठोबा कुठ आहे ? हे तर शंकराच देऊळ आहे. ” दिङ्मूढ बाप्पाजी उद्गारले.

" कांहीं तरीच बोलता. बघा बघा, ते सावळ परब्रह्म कसं दिसत आहे तें! किरीट-कुंडलें कशी लखलखत आहेत! वैजयंती माळ कशी रुळली आहे! देवा, तुझ्या सुकुमार पावलावर डोकं कसं ठेवू?"

सद्गदित झालेल्या बाप्पाजींचा अहंकार रसातळाला गेला. त्यानी देवळांत लोटांगण घातले. परमेश्वर इथून तिथून एक आहे. आपल्या अहंकारामुळें त्याचीं रूपे अनेक दिसतात. आपल्या महादेवाला देखील विठ्ठलाचे रूप घेऊन भक्ताला . . . . . दर्शन देणें भाग पडले. त्या दिवसापासून ते विठ्ठलाची भक्ति करू लागले. परंतु त्यांचा शीघ्रकोपी, पण क्षणात शांत होणारा भोळा शांकर स्वभाव मात्र बदलला नाहीं.

बाप्पाजींचें इमानाचे व शेतीचे उत्पन्न जरी मोठें होतें, तरी त्याचा खर्चहि अफाट होता. गावांत हरदास पुराणिक किंवा गवई आला तर त्याची वर्दी बाप्पाजीकडे असे. शेजारचे किल्ले-गड पाहण्यास मंडळी आली, तरी त्यांची पथारी इनामदारांच्या वाड्यात सुटे. मुंबई-पुणे, घाटकोकण याचे मध्यावर रानसई असल्यामुळें, त्यांच्याकडे पाहुण्याची वर्दळ भयंकर असे. कांहीं पाहुणे हंगामी, तर कांहीं स्थायिक असत. कांहीं दोन दिवसाचे, तर कांहीं वरिस-सहा महिन्याचे. कांहीं कायम राहण्यास आलेले, तर कांहीं पिढीजाद. कांहीना बाप्पाजी आग्रहाने रहा म्हणत, तर कांही रानसईच्या हवापाण्याचीं स्तुतिस्तोत्रे गात आपसांत एकमेकाना आग्रह करून रानसईचा मुक्काम वाढवीत. त्यांच्या इथून जाणाऱ्या पाहुण्यापेक्षा येणाऱ्या पाहुण्याची सख्या जास्त असे.

त्याचप्रमाणें दरसाल लग्न-मुंजीच्या मोसमात त्यांच्या इथें परगांवचीं त्यांचा संबंध नमलेलीं कार्ये उचलून येत. त्याप्रीत्यर्थ व आजूबाजूला पंचक्रोशींत देण्याकरिता बाप्पानीं भांडीं, सतरंज्या, हंड्या, झुंबरें, मोठ्या समया, गालीचे, अत्तरदाण्या, गुलाबदाण्या, चांदीचीं भांडीं असे सच ठेवलेले असत. अर्थात् दरसाल हे सामान कमी कमी होई मानापानावरून व्याह्या-व्याह्याचीं भांडणे झालीं कीं, त्याना मिळालेले सामान आपल्या व्याह्यानें दिलेले आहे, असे समजून व्याह्यांवर सूड घेण्याकरितां लगिनघरचे वऱ्हाडी बाप्पाजींचे सामान बिनदिक्कत लांबवीत. पण बाप्पाजींनीं त्याना बोटभर चिठ्ठी पाठवून सामानाबद्दल विचारूं नये. वऱ्हाड परत

फिरतांना मंडळी जानोसघर लुटीत; बाप्पाजींवर उधारीपाधारी करून ठेवीत; व मनातून परत न देण्याचे बोलीनें पैसे उसने मागून घेत. लग्नसमारंभाला किंवा उत्सव-समाराधनेला कोणी कांहीं मागावयास ‘ मोठ्या घरीं ’ आले कीं, बाप्पाजींच्या अंगावर मूठभर मांस चढे व ते आलेल्या लोकांना लुट्टलुट्ट सामान काढून देत.

सगळ्या जिल्ह्यात आपला सारा मोठा असावा, आपण मोठे खातेदार व्हावें अशी त्याची ईर्षा होती. त्याकरिता त्यांनीं वाटेल त्या दरानें कर्जे काढून हव्यातशा वायफट किंमती देऊन जमिनी विकत घेतल्या. त्यांतील कांहा सौदे शब्दाकरिता करावे लागले. ते अखेरीस अंगाशीं आले. कारण बाप्पाजींचा हातावर हात म्हणजे टाळी आणि टाळी म्हणजे वजन. हजार रुपयांचा सौदा आणि पैशाची कोथिंबीर विकत घेणें बाप्पाजी एकत्र समजत. ‘ बाप्पाजी वचनाचा सच्चा, शब्दाचा धड ’ असा त्याचा मारवाड्यात देखील लौकिक होता. प्राण गेला तरी बाप्पाजी आपला शब्द फिरवीत नसत. त्यात त्याची दयापूर्ण वागणूक. त्यामुळे जमिनींत पुरा वसूल होत नसे. व्याज मात्र झोप न घेता वाढत राही.

बाप्पाजींचें येणें खरें नव्हते; देणें मात्र नेहमीं खरें. त्यानीं मुदतीबाहेर गेलेलीं देणीं सावकाराना द्यावींत. त्यांचे चुलते उडाव होते. बाप्पाजींच्या अज्ञानदशेत त्यानीं तेरा हजार रुपये कर्ज करून ठेवलें आणि मग ते मेले. पण बाप्पाजींनीं वयात आल्यावर मारवाड्याना स्वतः हुकुमनामा करून दिला. खुद्द मुनसफसाहेब त्यांचे अंगावर ओरडले कीं, “ मूर्ख माणसा, हें कर्ज तुझ्यावर बधनकारक नाहीं. तू कशाला आपल्या अंगावर ओढून घेतोस ! कर्जाच्या वेळीं तुम्ही विभक्त होता. शिवाय तुम्ही अज्ञान पण होता. तुम्हाला साफ कानावर हात ठेवता येईल.” “ कर्ज माझ्या जरी नाहीं तरी माझ्या चुलत्याच्या कुटुंबाकरितां काढलें आहे. चुलता आणि बाप निराळा नाहीं. मी त्याला नर्कात ठेवणार नाहीं. ” बाणेदार बाप्पाजींनीं मुनसफाला ठणठणीत उत्तर दिलें. तेव्हां मुनसफानें म्हणतात ओशाळून जीभ बाहेर काढली !

तें कर्ज बाप्पाजी जन्मभर सव्याज फेडीत राहिले, पण ते थकले नाहींत. त्यांची एकच उमेद होती. मनोहर पास झाला कीं, पैशाला तोटा नाहीं. मग कर्जाचा काय हिसाब ! मनोहर हुशार होता. तरी पण पुण्यास गेल्यावर

तो नापासच होत गेला. त्यानें क्रमिक पुस्तकांऐवजीं इतर पुस्तकें वाचावींत. अशा तऱ्हेने शाळेत व कॉलेजमध्ये असतांना त्याने लायब्रऱ्याच्या लायब्रऱ्या पालथ्या घातल्या. त्यामुळे तो बहुश्रुत झाला. त्याचे ज्ञान वाढले. परतु परीक्षा पास होण्यास जो घाचणीचा अभ्यास लागतो तो त्याला कधीं साधला नाहीं मॅट्रिकच्या परिक्षेत तो पहिल्या खेपेला पास झाला, परंतु कॉलेजमध्ये तो दोन वेळा नापास झाला. येवढे झाले तरी बाप्पाजींनीं त्याला शब्दानें दुखवले नाहीं कीं, नाउमेद केलं नाहीं. उलट त्यानीं त्याला 'पुढल्या वर्षी पास होशील' असा धीर दिला. या सर्व गोष्टीमुळे बाप्पाजींच्या कर्जाचा डोंगर, विंध्य पर्वतासारखा वाढत राहिला.

बाप्पाजींच्या कर्जाचा डोंगर विंध्याद्रीइतका वाढला. समनाचे कर्जाबद्दल तगाद्यावर तगादे येऊ लागले. बाप्पाजींचे समोरच्या घरांत राहणाऱ्या केसूतात्याचा राजपाटीवर डोळा होता. सर्व रानसईत राजपाटी म्हणजे फणसाचा गरा समजला जाई. आरव्ह्या खलाटीची मळई राजपाटीत बसे व तिच्यात नमुनेदार भात पिके. तात्या समनाच्या मार्फत राजपाटी आपल्या नांवावर करून घेण्याचा डाव रचीत होते. बाप्पाजींनीं राजपाटी एखाद्या महाराला फुकट दिली असती, पण तात्यानीं दसपट किंमत देऊ केली असती तरी त्याना ती विकली नसती. कारण तात्यांचे वडील देशपाड्याच्या घरी, त्यांचा एकत्रांत बारदाना होता, तेव्हा दिवाणजी होते. त्या वेळीं देशपाड्याच्या उत्पन्नातून घसके मारून त्यानीं इस्टेट कमावली व बाप्पाजींच्या समोर सुंदर सागवान वापरून टोलेजग घर बांधलें. तरी त्याला 'मोठ्या घरा'ची सर आली नाहीं. कारण बाप्पाजींच्या घराचीं बहालें इतकीं मोठीं होतीं कीं, त्यांवर मनुष्यानें निजावे. तसेंच तसल्या लगी, खांब, कडीपाट दहा जगलें शोधून आता मिळणे शक्य नव्हतें. जुन्या काळीं तसें सगवान जगलांत विपुल होतें. मात्र तात्यांच्या घराची निगा मोठ्या घरापेक्षां खूप होती. दरसाल त्याला तेलपाणी मिळे. कातोड्याचीं चोरीचीं भातें घेऊन तात्या भराभर श्रीमंत होऊ लागले. त्यांत मनोहरच्या आधीं त्याचा थोरला मुलगा बी.ए. झाला, हा एक त्यांना मोठा गर्व झाला. शिवाय सपत्तीबरोबर घरीं संतति ! इखऱ्याचे कांट्यांप्रमाणें त्यांचे एकाचे एकवीस होत होते. आतां पैशांच्या जोरावर तात्या तर बाप्पाजींची बरोबरी करू लागले. प्रत्येक गोष्टींत तात्या बाप्पा

जींशीं स्पर्धा करीत. चढाओढीने ते शेती विकत घेत; गांवकींत सगळ्यांत मोठे शिष्ट किंवा पंच होण्याचा प्रयत्न करीत. परंतु गाव कधीं बाप्पाजींच्या शब्दाबाहेर गेला नाहीं. सर्व खटलीं ' मोठ्या 'घर 'च्या ओटीवर तुटत. या एकाच गोष्टीमुळे तात्या बाप्पाजींवर फार चिडत. त्याचे व बाप्पाजींचे नेहमीं खटके उडत. ते सदासर्वदा बाप्पाजींच्या न्यूनावर टपलेले असत व बाप्पाजींना नेहमीं खड्ड्यात घालण्याचा प्रयत्न करीत.

मनोहर वेसकटींतून आत आला तेव्हा त्याची बहीण सुभद्रा तुळशी अंगणात लय लावून कणा काढीत बसली होती. मनोहर मागच्या ओटाने घरांत शिरला तो बाप्पाजी व राजसबाई याच्या गोष्टी चालल्या होत्या.

" मनूला कळवूं नका हो काहीं. त्याचे खाण्यापिण्याचे अन् मजा करण्याचे हे दिवस त्याला कशाला हवी आहे काळजी ! "

" अगं, आहे काय त्यांत ! एकच परीक्षा विन्या पुढं आहेन्. यदा माझा मनू बी. ए. होईल. आहे का त्याच्या तोंडाकडे पाहण्याची कोणाची हिंमत ? नाहीं तर विनोबाचं माकडमुस्क पहा. करायची काय त्याची एम्. ए. ! माझा मनू बी. ए. नाहीं झाला तरी चालेल. "

" पण हल्लीं लोकांना विद्येशिवाय दुसर कशाच मोल नाहीं. शेपूट असलं म्हणजे झाल. मनूला देखील आतापर्यंत दहा मुली सांगून आल्या असत्या. "

" काय वेडी आहेस ! विन्या पास झाला आहे म्हणून कां त्याला मुली सांगून येतात ? अम आपल्याकडं यायला लोक भितात ! तोलास तोल लागतो ना ! तुळशीच लग्न झाल की, रावबहादूर सुभद्रेला पहावयास येणार. एकदां सुभद्रेच लग्न झाल कीं, माझ्या डोक्यावरच ओझं जाईल. तोंपर्यंत मनू पास होतो. मग त्याचं लग्न करायला काय वेळ लागणार ? "

" छे: सुभद्रेचं अन् मनूचं दोन्हीं लग्नं एकाच कार्यांत उरकायचीं. दुप्पट दुप्पट खर्च कोण करतो ? "

" तुझं काय जातं ! माझे गांवकरी, माझे ठाकूरकातोडी दोनदां लाडू खातील येवढंच ना ? त्यांना मी नाहीं फसवणार ! "

" पण खर्चांची सोय ? "

" कर्ज काढीन. "

" मारवाडी नाही द्यायचा आता. "

" त्याचा बाप देईल. तो काय फुकट देतो साला. चागला रुपया टक्का व्याज घेतो. "

" ते सगळ ठीक, पण हांथरूण पाहून पाय पसरावेत. कर्ज फेडण्याची काय व्यवस्था ? " खर्चिक राजसबाई खर्चिक बाप्पाजींना वेदांत सागू लागल्या.

" कर्जाचा काय हिसाब ! सराई पिकली आहे. थोडा भाव मिळाला कीं झालं. अन् आतां माझा मनू बी. ए. होतो आहे. " बाप्पाजी गरजले.

बाप्पाजींची कर्ज फेडण्याची प्रतिज्ञा ऐकून मनूचा खालीं पडलेला जीव हुरळला.. पण तो परीक्षा पास होणार ही बाप्पाजींची आशा ऐकून पुन्हां विरघळला. कारण आपले पेपर कसे गेले होते एवढ तरी ज्ञान त्याला खास होतं !

---

## प्रकरण ५ वें

# दरींतील प्रणय

तुकारामाने लाडीला काळ्या कऱ्याखालीं अडवले त्याचेच दुसरे दिवशीं बाप्पाजींच्या इथं दुपारचा चहा झाला आणि बाप्पाजींनी मनोहरला कातकऱ्यानी राजपाटीला किवटे बांधले किंवा नाहीं ते पाहण्यास सांगितलें.

" मनोहर, राजपाटीकडून सहज चक्कर मार. भात अगदीं हातातोंडाशी आलं आहे. तुझ फिरणच्या फिरण होईल आणि आपली नजर राहील. तेव्हढाच दबदबा होतो लोकाना. "

" पोराला असलीं कसली कामं सांगता ? माझा मनू परीक्षेच्या जागरणान सुकून गेला आहे अगदीं. हो ! बी.ए.ची परीक्षा म्हणजे सामान्य काम आहे का ? भयंकर दिव्य आहे ते. समोरच उदाहरण पहा ना क्षय लागलाय् म्हणतात अभ्यास करून ! आम्हाला ती असली परीक्षा नको अन काहीं नको. मनोहर, तू आपला स्वस्थान हवा तितका लांब फिरायला जा. पण गवतात जाऊ नकोस. याच काही ऐकूं नकोस."

" हो तर ! मग त्याला शेतीची माहिती कळणार केव्हा ?" बाप्पाजींनीं आतां आपली मतें बदललीं होती.

मनोहरने काठी उचलली व तो आईबापाच्या भांडणातुन निसटला. तो राजपाटीच्या रस्त्याला लागला. कातकरी वचनाला जागल होते. त्यानीं सकाळींच राजपाटीला किवटे बांधून ठेवले होतें. मनोहर तसाच पुढें चालू लागला.

राजपाटीच्या ओढ्यावर मनोहरचा बाळमित्र अंकुशा कातकरी मासे मारीत होता. आदल्या दिवशीं काळ्या कऱ्याखाली तुकारामला चावलेली ती कातकऱ्याची सुंदर मुलगी अंकुशाला मदत करीत होती. शेजारी डोहणांत एक म्हैस कर्दमस्नानाचा आरोग्यावर काय परिणाम होतो ते पाहत होती व तिच्यावर बसून एक बगळी साधि मिळाली कीं, मासा गट्ट करीत होती.

मनोहर दरडीवर उभा राहून त्याची गमत पाहू लागला. अकुशा व ती पोरगी या दोघानी मिळून ओढ्याला दगड, चिखल व सागाची पाने लावून धरण बांधले. नतर त्यानीं अविश्रात मेहनत करुन धरणातील पाणी उपसून काढले. आता ती मुलगी एक फाटक नेसली व तिने आपले नवे कोरे लुगडे मासे झोळण्याकरिता सोडले. अकुशा व ती मिळून चिखलाच्या राबडीत ते लुगडं बुडवून मासे झोळूं लागलीं. ते लुगडे आधल्याच दिवशीं मारवाड्याकडून विकत घेतले होते. त्याचे पैसे पण फिटले नाहींत. तें लुगडं फाटेल, खराब होईल, या गोष्टीकडे त्या दोघाचेहि लक्ष नव्हते. लुगड्यात सापडलेले मळे किंवा डाकूचे मासे ताडताड उड्या मारीत. त्याना पकडताना अकुशा व त्याची छोकरी आनदाने हसत होतीं. आपल्या दुकानातील लुगड्याची अशी स्थिति झाली हे पाहून, समईच्या मिणमिण उजेडात कवडी कवडी मोजणारा समना मारवाडी हाय खाऊन बसला असता परंतु चोरीचा तास निसर्गाच्या सहवासात राहून शिकारीचा ब्रह्मानंद उपभोगणाऱ्या स्वातंत्र्यप्रिय कातोड्याना त्याचा काय हिसाब!

दिवसभर उघड्या अगाने उन्हात काम केल्यामुळे त्याचीं अंग चकाकत होतीं. त्याच्याइतका सूर्यप्रकाश त्या दिवशीं सबंध रानसईत कोणी लुटला नसेल. सूर्यप्रकाशाने त्याचीं अंग स्नान व श्रमसौदर्याने लवचिक व लुसलुशीत झाली होती. सबंध दिवस तीं उपाशी होतीं. झोळलेला चांदीचा माल पाहून त्याना सपाटून भूक लागली होती. अशा श्रमानतर रात्रीं त्याना जेवण किती गोड लागले असेल याची गादीवर बसून पेढे-बर्फी खाणाऱ्याना काय कल्पना!

ओढ्याच्या काठावर रानसईच्या कातोड्याचा नाईक कोया कातोडी याची बायको मासे जमविण्याकरितां टोपली घेऊन विडी ओढीत बसली होती. कोयाची उमर शभर वर्षाच्या वर आहे, असा रानसईचा लोकांचा विश्वास होता कोयाची दरसाल बायको मरे तरी, किंवा पळून तरी जाई. मग कोया काही दिवस रानसईतून नाहींसा होई व कुठून तरी एक म्हातारी घेऊन येई. अर्थात नवीन आणलेल्या बायकोचें नाव कोयी पडे. दरसाल नवे पचाग घ्यावे तसे कोया नवी बायको करी. ही म्हातारी कोयाने गेल्या सालीं आणली होती.

कोयी रुईच्या पानांवर माशाचे वांटे घालीत होती. माशांची वाटणी इतकी काटेतोल होती कीं, एकाद्या गणितज्ञाला देखील त्यांत चूक सांपडली नसती. कोयीनें हे मासे रानसईत नेऊन विकल्यावर जेमतेम रुपायाआठ आण्याचे भात आलें असतें. त्यापैकीं निम्में भात कोयाच्या दारूकरितां काळणाच्या घरीं जाणार ! कोयीने दारू दिली नसती, तर कोयानें तिला ठोकून काढले असतें. काळणाचें भात दिल्यावर मग राहिलेले भात कुटून त्याचे तादूळ व्हावयाचे. त्यानतर त्याचा भात शिजायचा अन् मग त्यावर राखून ठेवलेल्या शेलक्या माशाची काजी. घरांतील पोरांनीं गलोलीनें पाखरे मारून आणलीं असल्यास त्याची थोडी भर या जेवणांत होईल तेवढीच. त्याच्यापुढें रात्रीं कोया झिंगून लोकांना शिव्या देत घरीं येईल, तेव्हा जेवण. मग रात्रभर नाच, गाणीं व ढोल. उद्यांची काळजी उद्यांला. कातोड्याला नाहीं. तीन माणसानीं दिवसभर खपून ही कमाई. शिवाय दोन-अडीच रुपयांचें लुगडें खराब झालें, तें निराळेंच !

या कातकऱ्याना रुपया रोज देऊन मजुरीवर घेतले असतें तर त्यानी याच्या चौथा हिस्सा मेहनत केली नसती. पण स्वतंत्र वृत्तीचे कातकरी मच्छीमारी, शिकार व जीवनाच्या खेळांत कसे रंगून जातात हें पाहून मनोहरला आश्चर्य वाटलें. अर्धपोटी राहून देखील अंकुशाच्या शरीरावर मांस मावत नव्हते. कारण खाल्लेल्या प्रत्येक घासाचे त्याच्या शरीरांत रक्त बनले होतें त्या मांसांतील एक गुजभर देखील मांस फाजील नव्हतें. अंकुशाचा स्नायून् स्नायू, लहान शीरन् शीर, मासे मारण्याचें काम करतांना एकाच अधिकाराखाली हालत होती. तो मच्छीमारीत तन्मय होऊन गेला होता. पण मनोहर जवळ आल्यावर ती मुलगी सलज्ज होऊन वाकल्या वाकल्या अंकुशाच्या आडोशाला मुरली. त्याबरोबर अकुशाने आपलें हसरें तोंड वर केलें व तो म्हणाला,

"रामराम दादा. आतांच येता ?"

"हो. आतांच येत आहे. पण अंकुशा ही रे कोण नानेटी ?"

"बिस, बिस, हाथं बिस. इरी ओढ म्हंजं मी समदं सांगन तुला." कोयी मनोहरला विडी ओढण्याचा आग्रह करूं लागली.

"ठेव तुझी इरी बाजूला. मनुदादा इरी ओढीत नाय. दादा' तुमांला खरं सागतों; ही नानेटी नाय. लहरी नागीण हाय; विखारी मणेर हाय बघा बघा तिचं डोळ."

नानेटी लुकलुक डोळे करून मनोहरकडे भिवईखालून कुऱ्यानें पाहू लागली. एखाद्या सावजाला हेरावें अशा तऱ्हेनें तो मनोहरचा अंदाज करीत होती. मनोहरचे भुरके केस, गौर वर्ण, लाल चुटचुटीत ओठ तो लक्षपूर्वक न्याहाळीत होती. त्यांतल्या त्यांत त्याच्या शर्टच्या सोन्याच्या बटनाचें तिला जास्त आकर्षण वाटले. चपळ शरीराच्या ताड्याने कड्याच्या टोंकावर सावरून वाघिणीनें तोलांत उभें रहावे, असा तिचा झोक होता. रानचा वारा पिऊन निर्भय झालेली नजर तिनें मनोहरवर खिळवली. ती व मनोहर याच्यामध्ये आतां भीड, लज्जा, सशय वगैरे कांहीं राहिले नाहीं. नजरनें दरी ओलाडून पलीकडच्या डोंगराकडे पहावे, तशी ती मनोहरकडे पाहत होती.

"हात्, तुना मुडदा पडीस." त्या बालिकेनें हसत हसत अकुशाला एक शिवी हासडली व लाजून लाजून तिने दोन-चार मुरके मारले.

"भिवरे, काय आखतेस! हा आपला धनी आहे."

"अकुशा, नानेटीच आहे ही. नाहीं तर तुकाराम फॉरेस्टर मेला असता. तुला सांगितल का हिन काल ती त्याला चावली म्हणून."

अकुशा गालांतल्या गालात हसला.

"दादा, ही डोंगरगावच्या कातोड्याची पोरगी. हिच माझं मन जमलं, ही खुषीन माझ्या माग आली. अन् मी काय कुणाचा अपराधी आहे? पण डोंगरगावच्या तानक्यान माझा खुनस धरलाय्. डोंगरगावचे कातोडी आमाला दमदाटी देतात कीं, झांझ्या कातोड्यासारखच करूं. ती मोठी भानगड व्हायची आहे. मी एक दिवस तुझ्याकड येणार आहे त्याकरितां."

असे म्हणून अंकुशानें आपली काठी खांद्यावर टाकली व तो जाण्यास निघाला.

"बरं दादा, राम राम!" असे बोलून तो चालूं लागला. लुगडें पिळून भिवरी पण त्याच्या मागोमाग निघाली. कोयीनें माशाची टोपली उचलली व रानसईची वाट धरली. मनोहर पण आपली वाट चालूं लागला.

अकुशा व भिवरी एकमेकाना धक्के देत, हसत-खिदळत, मस्करी करीत, दरडीवरच्या झुडपातील पाऊलवाटेने जाऊ लागलीं. त्यांच्या आकृतीच्या स्पष्टरेखा सध्याप्रकाशात सरकताना मनोहरला स्वच्छ दिसत होत्या. इतक्यात अकुशाने री री री करून गाण्याचा ताल धरला. भिवरी गाण्याची री ओढून साथ करू लागली. एकमेकांच्या गळ्यांत गळे मिसळून ती कातो ड्यांचे एक ललकारी गीत गाऊ लागलीं. त्यात जरी गणमात्रा किंवा ताल बद्धता यांचा अभाव होता तरी ते ऐकण्याला गोड होतें.

" हिरिरिरी रिरिरिरी, भिरिरिरी रिरिरिरी रिरिरिरी रिरिरिरी
कातकरी ॥

घुमवित दरि दरी, कडे पठारी, करी शिकारी दिनरातभरी ॥ धृ०॥
आलि आलि पारध, झाल डुकर गारद, झाल भेकर गारद रे ॥
आला आवाज, उठला सावाज, उठला साभर, सावध रे ॥
रोज रोज सकाळीं, पोट खोल भकाळी, सरल्या रे माळी ॥
जाळि जाळि शोधुनि मारू न्यारीला, सायाळी ना कोयाळी ॥
झाला हाका रे, गवड रोखा रे, मख्या तुला धोका रे ॥
रिस बिबळ्या कीं निघे डहाण्या कोळशिंग्याचा मोका रे ॥
व्हळि व्हळि व्हळि व्हळि हिरी शेवाळी हिरी लव्हाळी हिऱ्या जळीं॥
मळी लावुनी त्या जाळि झोळी खवळीची तू मासोळी ॥
कुडच्या पशा भाताला विकुनी भिवरीला घे काचोळी ॥

हें कडवें अंकुशाने एकटेंच म्हटले, त्याबरोबर भिवरीनें त्याच्या पाठींत दोन्हीं हाताचा दणका देऊन त्याला लोटलें. दोघेंजण मोठमोठ्यानें हसू लागलीं. मग पुन्हा तीं दोघें गाऊ लागलीं. ललकाऱ्या मारणाऱ्या त्याच्या आकृत्या झाडींत नाहींशा झाल्या.

मनोहर सर्व खलाटी नजरेंत यावी म्हणून एका दाडाने वर चढला. समोर आंब्याच्या राहटींत त्याची रानसई बसली होती. खलाटींतील खाचरांतून भाताची कापणी सुरू होती. गुराखी ललकारीत होते. शेतकरी व त्यांचीं माणसें कापतांना व भारे वाहतांना बाधाबाधानें एकमेकाशीं गप्पा मारीत होतीं.

दीपाजीच्या शेतात लांब अंतरावर दीपाजीची लाडी आणि सयाजीचा मुकुट भात कापून त्याची कडपे वाळण्याकरितां बांधावर नेऊन ठेवीत होते. लाडीचा विळा, तिचे मावळत तोंड असल्यामुळे, हातात चमकत होता. मुकुट तिच्याकडे पाहून हसे व काहीं तरी विनोद करी. लाडी पण हसण्याची लल्कारी मारी. त्याने सगळी खलाटी दुमदुमून जाई. परंतु मधून मधून मुकुटचा डोळा चुकवून ती मनोहरकडे कटाक्ष टाकी. विळ्याने व हाताने छातीसमोर भाताचे कडप धरून ती बांधाकडे जाई तेव्हा विस्फारित नेत्रांनीं ती मनोहरच्या बाजूला मान मुरकवी.

इतक्यात अधू, [illegible] मरतीवर आलेल्या काज्याची पाकट काढीत आला. दोन गुराख्याचीं पोरें त्याला मदत करीत होतीं. पण काज्याने त्याना गुंगारा दिला व अधूला चीड येईल अशी गोष्ट केली. ती म्हणजे काज्या सबंध राजपाटीतून भात तुडवीत पलिकडच्या बाजूला गेला व शिंगाने माती उकरीत भात खाऊ लागला. अधूची महत्त्वाकांक्षा होती कीं, एक दिवस आपण काज्याला ठोकून काढू किंवा कोंडवाड्यात तरी घालू व तात्याना दंड पाडू. पण अद्याप त्याची ती महत्त्वाकांक्षा सफल झाली नव्हती. राजपाटीला वळसा घालून अधू जीव खात पलिकडच्या बाजूला गेला. शत्रूचा कावा ओळखून काज्याने कुंपणावरून उडी मारली व तो गवतातून पसार झाला.

काज्या मोठा दांडगा गोऱ्हा नव्हता. परंतु तो अत्यंत खोडिल होता. आनुवंशिकतेच्या कायद्याप्रमाणे त्याची आई भिमी हिचे सर्व गुण त्याच्यांत आले होते. भिमी मारकुटी होती. पाय न वाजवता माणसाप्रमाणें घरात शिरून ती झाकलेले डाळ तांदूळ-पीठ खाई. आपलीं अणकुचीदार शिंगे मारून ती पोतीं व कणगे फोडी आणि भात गट्ट करी. केसूतात्यांनीं घमेलेभर खाणे पुढे ठेवलें कीं, ती मिनिटात घमेले चाटून-पुसून स्वच्छ करून ठेवी. मात्र केसूतात्यानीं कासेला हात घातला कीं, फाडदिशीं लाथ! तात्याच्या कित्येक लोट्याच्या तिने ठोक्याच्या कांसड्या करून टाकल्या होत्या. तात्यानी जीव काढला तरी भिमी त्याना दुधाचा थेंब मिळू देत नसे.

लहानपणीं काज्याला कसेहि बांधले तरी कांहीं तरी युक्ति करून काज्या सुटे व तात्याचा डोळा चुकवून भिमीला पिऊन जाई. तो कुंपणी उडून

जाई व रोज काही तरी कलागत घरीं आणी. कुणाचें पट्ट न म्हणवून घेणारे तात्या काज्यावरून कुणाच्या नाहीं कुणाच्या तरी रोज शिव्या खात.

मनोहरला टांडाला पाहून अधू धस चढून वर आला व त्याचे शेजारीं घोंगडी-काठी टाकून बसला. त्यानें आपल्या तोस्तानातून आपट्याचें पान, चकमकगार, कफ, तंबाखू वगैरे प्रतिभासाधने बाहेर काढली व लाडीकडे पाहत तो काव्य गुणगुणू लागला :

" केतकीचे बनीं गव्हळि नागिण ।
गवती माळाला उठलि वाघिण ॥
काळ्या कड्यावरि सुकिर चांदणी ।
बोले मजुळ माझी मैना राणी ॥ "

" काज्यानं तुला दमवलं अधू !" अंधूची लाडीवर खिळलेली नजर तो दूर करतो किंवा नाहीं, हें पाहण्याकरिता मनोहरने भाषण सुरू केलें.

" हाय्, त्याला खाह्ला वाघान ! एक दिवस त्याला बाबकल्याशिवाय कधीं रायचा नाय मी. गेला गेला निसता वैताग आणलाय् त्यानं. बैल तयार व्हावा म्हून मालकान आगोटीपून लोकाच्या भातात मोकार सोडलाय. दादा, आता सराईची भात खाल्लीं म्हणजे येतील ती ? कार्तिकेच्या जत्रला आपल्या छकडीपुढं निघायची हाय छकडी. पन मी हाय अधू नावाचा. केस्याला म्हणावं ये तूं जत्रला म्हंजं दावतों तुला. "

अधू पुन्हां आपलें काव्य गुणगुणूं लागला :

" केतकीचे बनींऽऽऽ गव्हाळि नागिण..........
.. . . . ................................. "

" ही तुझी मैनाराणी अन् नागीण अन् वाघीण कोण आहे ? दीपाजीची लाडी ? " मनोहरनें लाडीकडे पाहत अंधूची चेष्टा केली.

अधूनें लाडीकडे पाहून एक निःश्वास टाकला.

" दादा, तें तर रतान हाय ! तें काय आपल्यासारख्या गरीबाला लाधतं ? हीं शिरिमंताचीं कामं. आतां हें रतान सयाजीच्या मुकुटाच्या गळ्यांत पडतं, कीं तुकाराम फारिस्टाच्या गळ्यांत पडतं ह्यो काय मला सागता येत नाय. फारिस्टानं तर लाडीकरता तोढं, पुतल्याच्या माला अन् चिताग अन् काय काय दागिनं केल्याती ! अन् पांचशें रुपये देज दीपाजीला कबूल केलाय !"

" पण लाडी तर मुकुटवर खूष दिसते. "

" तें रानचं पाखरूं अल्लाड हाय. नुसतं बापाच लाडं. "

" मग ती मुकुटबरोबर कशी वागडते ? "

" त्यात काय ! रोज एके ठिकाणीं काम करतात ती. तशा थट्टामस्करी चालायची. त्यांत काय पाप नाय. "

" पण तें लाडीचं राहूं दे. तुझ्या लग्नाचं काय झाल ? "

" आता कुठल लगिन नशिबांत ! म्होतुर झाला म्हूजी मिळवला. दादा, ऐल आली म्हून सागतों. बाप्पाजींचं कराज कारलं. पहिल लगीन केलं. पांच वरिस बाप्पाजींची नोकरी घातली करजांत. पदर नाय आला त बायको पहिल्या तापसराईत गमावली. मग बाप्पाजीचा पुन्हां कराज कारला. डरलों नाय. दुसरा म्होतुर केला. बाप्पाजींची पुन्हां पाच वरिस नोकरी घातली. झालं बाबा. वाखा आला अन् ती पन गमावली. पन डरलों नाय. बाप्पाजींचा पुन्हा कराज कारलं. पुन्हां म्होतुर केला. पन् तिनं मला फसावलान्. पलुनश्यानी गेली. गेली तं गेली न् दागिनं बी नेलं. पांच सा लोकाना तिनं असा फसवला. "

अंधूने पुन्हां एकदा लाडीकडे चोरून पाहिलें. लाडीच्या डोक्यावर भारा देताना मुकुट लगट करून लाडीची थट्टा-मस्करी करीत होता. लाडी लकेऱ्या मारून खिदळूं लागली. तिचे हास्य फत्तर फोडून उसळून बाहेर पडणाऱ्या पाण्याच्या कारंज्याप्रमाणे होतें. त्यात तिच्या मस्तवाल यौवनाचा मद भरून राहिला होता.

" चार वर्स मी तसा राहिलों. पन आवंदा सोरनार नाय !" अंधूने खडकावर काठी आपटली. " आवंदाची सराई सोला आनं पिकली. एक दिवस मी बाप्पाजींजवळ गोष्ट करनार. "

अधू दसऱ्याच्या सान्याचा धूर काढू लागला.

" कोण ? कोण आहे रे ती ? " मनोहरचे कुतूहल वाढले.

" अझून बोभाट केला नाय. पन मनूदादा, तुमच्या पायाच्या पुन्याइन करीन. "

" अरे साग तर खरं ! ती शेलाराची भिकी ? "

" अंहः ! " 

" कदमाची भागी, नाहीं तर सखी ढाकोळीण ! खास. "

" नाय दादा, तुमच्या नाय ते मानुस लक्षांत ! आपल्या गांवचं नाय, पाव्हनी हाय. "

" ती पलीकडच्या खोपटांतील राही ? "

अंधूच्या तोंडावर चिरम्याचं एक जाळें पसरलें. त्या जाळ्याने एक खुमासदार हास्य झेलले होतें. एका सुमधुर भावानं त्याचे अंतःकरण भरून आलें व त्याचा एक डोळा आशेने चकाकला. मानवतेच्या सहृदयतेने त्याचा विद्रूप चेहरा क्षणभर सुंदर झाला.

" दादा, काहींचं बाहीच बोलता तुम्ही. "

" अंधू, मी ओळखलं. ती राही. " मनोहर जोरजोरानें हसूं लागला.

राही स्वरूपात अंधूपेक्षा सरस ठरली असती. ती खुजी होती. तिचे पाय आखुड होते, तर हात लांब होते. ती गुढघ्यांत वाकून चाले. तिच्या कपाळावर वळकट्या पडल्या होत्या. तिची जिवणी आकर्ण होती. तिचे वर निघालेलें उरोडें, रुंद हनुवटी, लांब तोंड व काळा रंग यामुळे ती मनुष्य कीं मनुष्याची पूर्वज, त्याचा निर्णय लावणं कठीण होई. वयानें ती अंधूपेक्षांहि मोटी असावी. हीच स्वरूपनखा अंधूची मैना राणी, नागीण अन् शुक्राची चांदणी काय ? याच मदनाच्या कुऱ्हाडीने अंधूला घायाळ केलें होतें काय ? मनोहर मोठमोठ्यानें हंसू लागला. त्याने अंधू शरमला. तें पाहून मनोहरनें हसें आवरलें. मनुष्याच्या मनाची खोली किती आहे, त्याच्यात कोणकोणते विचार, भावना आहेत, यांचा मानसशास्त्रज्ञांना देखील अद्याप अंत लागला नाहीं, वगैरे विचारांनीं त्याचें डोकें भरून गेलें. अंधूप्रमाणें तो देखील होनाजी बाळाच्या लावणीचा एक चरण गुणगुणूं लागला—

" प्रीत पतंगाची खरी झड घालून देतो जिव दीपकाचे वरी ।"

प्रेमाच्या राज्यांत सौंदर्याचा प्रश्न कुठं येतो ? तूं मजनूला लैलेच्या डोळ्यांनीं आणि लैलेला मजनूच्या डोळ्यांनीं पहा, म्हणजे तुला हें कोडें पडणार नाहीं.

" रात व्हईल. चला आतां. " अंधूनें आपली घोंगडी व काठी उचलली.

अंधू व मनोहर गुरचरणीच्या माळावर आले. अंधू जनावरांकडे गेला. गजा हरकुडा पांधर्णानें गुरें घेऊन चालला होता. त्याचे डोक्यावर वासराकरिता घेतलेल्या मोरगाचा भारा होता. त्यानें कुपणाला घातलेले बेचकें फिरवले व त्यांतून गुरे घातलीं. त्याबरोबर डोंगरांतून आरोळ्या येण्यास सुरवात झाली. त्या आवाजाचे प्रतिध्वनि कड्याकड्यांवरून घुमले. त्या आवाजातून मधून शेलक्या शिव्या पण ऐकूं येत होत्या. मनोहर उभा होता त्या ठिकाणीं दरीचा कोन झाला होता. त्यामुळें मनोहरला आरोळ्यांचा आवाज स्पष्ट ऐकूं आला. गजा हरकुडा पण प्रतिकारपूर्वक ध्वनिक्षेपण करूं लागला. मनोहरने डोंगराच्या उतरणी बारकाईनें चाळून पाहिल्या. तेव्हां त्याला पवळ्या, ढवळ्या, चितळ्या रंगाच्या गुरांचे कळपांत उंच काठी घेऊन बज्या थरकुडा गुरें चारतांना दिसला. बज्यानें लावलेले बेचकें गज्याने उपटलें म्हणून बज्या बेबीचे देठापासून ओरडून शिव्या देत होता. रामायण काळीं युद्धाचे पूर्वी नळ, नील, सुग्रीव किंवा जांबुवंत यांनीं डोंगरावरून एकमेकांना आव्हान दिलें असेल तसा तो ओरडत होता.

" खाल्ल, खाल्लं, खाल्ल. शाप खाल्ल माझ शेत. माझं शेत खाववील त्याचीं गुरं पोट फुगून मरतील. "

" माझीं गुरं पांधणीन चाललींत. चोथ्याला तरी तोंड लावलंय त्यांनीं! हरामखोरा, चोराच्या उलट्या बोंबा! माझी गुर भाताला म्हणून तोंड लावायाचीं नाहींत. मी माजलेल्लीं भातं चारवलींत त्यांच्याकडून तव्हां त्याचीं तोंडं आलीं आहेत. तीं गुर भातं खातील?"

" मग बांध काय तुझ्या बापाचा?"

" अर, माझ्या नाहीं पण तुझ्या बापाचा हाय. पन्नास वरसांची माझी वहिवाट आहे. तुझं खरं असल तर तूं हरकतीचा खटला भर अन् खरं करून घे. बघ, कोरट काय न्याय करतं ते."

भाताचीं लोंबट नाचूं लागली कीं, कोर्टांत जाऊन वकीलांमार्फत लढाई करण्याकरितां गज्या-बज्या नाचूं लागत. गज्या गुरं घेऊन जाऊं लागला. बज्याला हें सहन झालें नाहीं. तेव्हां तो तुटलेल्या कड्यासारखा खालीं आला व गज्याला आडवा झाला.

" फिरव गुरं मागं!"

" नाहीं फिरवीत. "

मनोहर मधे पडला व त्याने भाडण मिटवलें. इतक्यांत दुसरी गोंग उठली. तो सयाजीचा आवाज होता. कातोड्याच्या बकऱ्या भातात शिरुन गपागप लोंब्या खात होत्या. राखणीच्या पोराला शिव्या देत ' हर्रर ' करीत सयाजी शेतात शिरला.

सयाजी बकऱ्याच्या मागें लागला. सयाजी इकडे गेला कीं, बकऱ्या बे बे करीत तिकडे जात. सयाजी तिकडे गेला कीं बकऱ्या बें बे करीत इकडे येत. जिकडे तिकडे बें बेचा हलकल्लोळ उठला. बकऱ्यानीं सयाजीला दमवले. बकऱ्याचीं करडें बकऱ्या लांब गेल्या कीं, मोठ्याने आक्रोश करीत व धावत जाऊन तेवढ्या घाईत बकऱ्याना पिऊ लागत. बकऱ्या पळता पळता भाताचीं लोंबटे मटकावीत.

इतक्यात " हल्या, हल्या, ला ला ! " अशी दुसरी आरोळी झाली. झुर पाटील एका हल्याला हाकीत तेथें आले.

" काय तरास-तरास आणलाय बारकु पाटलानं. अवं मोकार सोडतो टोणगा. "

मनोहर ही गमत पाहत उभा राहिला. मग सगळे शेतकरी मनोहर उभा होता तेथे येऊन बसले. " मनुदादा, आगोटच्च पाणी पडल्यापुन बज्यागज्याच सराईपोतर भाडण. " सयाजी मनोहरला सागू लागला.

" आन् तूं काय कमी करतोस ? इतकं वय झाल, तरी रातच्च बाध फोडून पाणी फिरवतोस माझं. शेतात पाण्याचा टाक ठेवीत नाहींस. पाण्याबिगर भात-शेती पिकायची कशी ! आमची मदार या चार शेणपुड्यांवर. सराईसुगी अन् बसली उगी. सराईला भात पिकल नाय तर वरिसभर खाणार काय ? तुझ्यासारखा का माझा बारदाना हाय!" गज्या बोलला.

" माझा बारदाना म्हणे. किती किती भात जमतरं माझ ? सारी शंभर खड्या पळंजी."

या बोलण्याने गज्या व बज्या हंसू लागले.

" मनुदादा, " सयाजी पुढं सांगूं लागला. " हे एवढे गजबजतात ना आतां, पण राजपाटीचं बकरं पडूं द्या, कीं पडले एकमेकाच्या गळ्यांत. घांस नाहीं उचलणार एकमेकाबिगार. "

मनोहर पण हंसूं लागला.

" मनुदादा, जरा इथ उभ रहा अन् नेत्रान बघा. "

सयाजीने सगळ्याना तिथे उभे केले. थोड्या वेळात डोक्यात कुरडूची फुले भरलेली लाडी रस्त्याने येऊ लागली. तिच्या एका हातात भाताची लोंबरे होतीं. तिने लुगड्याचा पचंग मारला होता व विळ्याचे पाते पाठीमागे लुगड्याच्या कडोसरीला खोवले होते. दिवसभर कापणीचे ऊन खाल्ल्यामुळे ती कोकम पिकल्याप्रमाणे लाल झाली होती. तिचे डोळ्यात तेज मावत नव्हते. तिच्या अगात चपळाई ठरत नव्हती. दरीतून बेगुमान फिरणाऱ्या स्वतंत्र शारदेप्रमाणे ती दिसत होती. मनोहरला पाहिल्याबरोबर तिनें एक तीव्र कटाक्ष टाकला व लचकून खांद्यावर आलेला पदर डोईवर घेतला. सयाजी अन् गज्या-बज्या बरोबर नसते तर मनोहर बांधाच्या गवतातून तोलात सरणाऱ्या तिच्या रेखीव आकृतीकडे किती तरी वेळ पाहत राहिला असता.

लाडीच्या मागोमाग मुकुट येत होता. पण सयाजीला पाहिल्याबरोबर तो कशाडाच्या गवतात मुरला व दुसऱ्या वाटेने नाहींसा झाला.

" पाहिलत ? गुलाम झालाय नुसता. फुकाट राबतो लोकाचे घरीं. स्वतःचे घरी काडी उचलीत नाहीं. "

" अरे, पण गुलाम तिचा झालाय. दीप्याचा नाय झाला. तुझ उमेदवारपण आठव. तुझं काय जात त्यात ? " बाज्याने सयाजीची उजळणी केली.

" तुमचा तो मैतर. काय सागा त्याला ! बिनमोलाची मजुरी करतो दीप्याची. मला लाजेहून लाज झाली आहे. " मनोहरला उद्देशून सयाजी बोलला. गुराची वाट पाहत शेतकरी माळाला बसून राहिले. मनोहर मात्र वाट चालू लागला.

मनोहर फार पुढे गेला नाहीं तो मुकुट वाटेत त्याला भेटला. तो वाटेच्या लवणांत मनोहरची वाट पाहत उभा होता.

" दादा कव्हा आलात ? गारमाळावर बाबाशीं बोलताना म्या तुम्हांला पाहिलं. " मुकुटने मनोहरला दृढालिंगन दिले.

मुकुट आणि मनोहर बालमित्र होते. मुकुटने मनोहरला दाडावर पाहिले होते. परंतु लाडी बरोबर असल्यामुळे त्याने ओळख दिली नव्हती. मुकुटने मनोहरचे दंड दाबून धरून त्याला गदगदा हालवण्याचा प्रयत्न केला. पण

मनोहर रतीभर हालला नाही. नतर त्याने दोन्ही पंजांनीं त्याची छाती दाबली, गर्दनीवर हात ठेवून ती वाकविण्याची शिकस्त केली व मनोहरची शक्ति अजमावून पाहिली.

" यंव रे तयारी ! " अर्थात् मुकुटच्या मनांत परीक्षेची तयारी नव्हती. " पटा कशा भरल्यात ? कालिजची कुस्ती मारली की नाय ? " मनोहरने मुकुटला पटा दाखविल्या. मुकुट खूष होऊन गेला व मनोहरच्या डोळ्यांत खाल पाहत हसत हंसत म्हणाला.

" दादा, तुमची निगा कुठं अन् आमची कुठं ! "

मनोहरने त्याचा हात धरला व त्याचें चांदीचे कडे मागे सारले.

" मुकुट, केवढं तुझं मनगट. तुम्ही रात्रदिवस उघडा वारा खाता, ऊन खातां. हाच तुमचा खुराक. डोंगरी राहणीत दुसरी कसली मेहनत केली नाहीं तरी तुम्ही तयार होतां. तुम्ही आम्हाला कधीं आटपायचे नाहींत."

मुकुट खूष झाला.

" मग दादा, एकदा होऊं द्या. कधीं ? उद्यां ? आपण नदीच्या वाळूंतच लढू. " त्याच्या घाऱ्या डोळ्यात ईर्षेची छटा होती. त्याने आपल्या पिंग्या मिशांवरून हात फिरवला.

" उद्या नाही. पण लढू एक दिवस." मनोहरनें उत्तर केलें.

मुकुटला तेच पाहिजे होतें. त्याने मिळालेल्या वेळात खूप मेहनत करायाची असे मनाशीं ठरवलें.

" दादा, म्हातारा काय म्हणत होता ? "

म्हातारा म्हणाला, " मुकुटने शेतींत फार लक्ष घातल आहे. "

" आं ! असं म्हणत होता म्हातारा ? "

" हो, हो, पण दुसऱ्याच्या. " मनोहर मोठ्याने ओरडला. " हलकटा, पाजी मनुष्या, घरी सुंदर बायको असताना रानात उनाडक्या करीत हिंडतोस ! " मनोहर हंसू लागला.

" दादाचं बोलणं म्हणजं अकरीतच ! "

---

## प्रकरण ६ वें

# कातोड्यांना ठोक

दुसरे दिवशी सकाळी मनोहर उठला तेव्हा काळा कडा त्याला समोर दिसला. त्याच्या लहानपणीं तो जसा दिसत होता तसाच आता दिसत होता. त्यात कांही फरक पडला नव्हता. परंतु लाडीच्या स्मरणानें तो त्याला प्रणयगिरीप्रमाणे वाटूं लागला. मनोहर ताज्या दुधाच्या चहाची चव घेत घेत काळ्या कड्याकडे पाहू लागला. इतक्यांत त्याने अगणांत गोंगाट ऐकला. म्हणून तो घाईने ओटीवर आला. ओटीचे खाबाला टेकून म्हातारा सयाजी बसला होता. सयाजी रानसईतला खाऊन पिऊन सुखी असा पैसेवाला शेतकरी होता. पाऊणशेंची त्याची उमर झाली तरी त्यानें देशपाड्याच्या पायरीला कधीं पाय लावला नाही. रोज पावशेर सागुती व एक कोंबडी त्याने खावी. पण बाप्पाजी देशपाड्याच्या येथले वाडगाभर कोड्यांग नित्यनियमानें नेल्याशिवाय त्याचे तोडाला चव येत नसे. त्याला तीन बायका होत्या. पण राजसबाईकडे येऊन त्या तिघींना स्वयपाक करता येत नाही म्हणून त्याने शिव्या द्याव्यात.

पडवींत घोंगड्या दुमटून त्यावर रानसराईचे व डोंगरगांवचे ठाकूर कातोडी आपल्याच्या पानाच्या विड्या ओढीत बसले होते.

एका बाजूला कोया कातोडी, अंकुशा व त्याचा पुता, तर दुसऱ्या बाजूला तानल्या व त्याचा पुता विरुद्ध दिशेला तोंडें फिरवून बसले होते. ठाकूर दुसऱ्या अगाला बसले होते. कातोड्यापेक्षां ठाकूर किती तरी धिप्पाड दिसत होते. त्यांच्यांतील कांही तर आजानबाहु होते. पण ते सगळे मवाळ, गरीब व कष्टाळू दिसत होते. सत्य आणि प्रामाणिकपणा त्याचे तोंडावर छापला होता. कातोडी आवळ शरीराचे व चपळ दिसत होते. त्याचे खुनशी डोळे हेरण्याकरितां गरगरा फिरत होते. ठाकरांचे डोळे थंड व निश्चल होते.

कातोड्यांचीं कांही पोरें पण बरोबर आली होतीं. विहिरीवरच्या खाचेत पाणी पिण्यास चालेल्या मधमाशा कुठे उडून जातात हें हेरण्याचें

काम तीं करीत होतीं. त्यांपैकी एका पोरानें पटकन जाऊन मधाचे पोळे आणले व तो तें चोखीत बसला. बारकी पोरें त्याचेजवळ पोळ्याचा तुकडा मागू लागली. जेव्हा रडारड सुरू झाली तेव्हां कोयाने त्याच्या डोसक्यात काठ्या मारून त्याना हुसकून लावले.

केसूतात्यानीं आपल्या कुपणाशेजारी लाकडाची मोडकी उखळी मुद्दाम उपडी घालून ठेवली होती. तीवर चढून ते बाप्पाजींच्या परड्यात भाजीपाला कसा पिकला आहे, काय कमीजास्त चालले आहे ते टेहळीत. तात्यांनी आपल्या कुंपणींतील त्या टेहळी बुरुजावरून हेरले कीं, बाप्पाजीच्या इथं कांही तरी गडबड चालली आहे.

" विनायकराव, काय गडबड चालली आहे शेजारीं ?" तात्या आपल्या एम्. ए. होऊं घातलेल्या चिरंजीवांना नेहमी आदरार्थी बहुवचनांनीं उल्लेखीत.

विनोबांनी आपल्या चष्माच्या जाड काचा फिरवल्या. त्यात झाडाची हिरवी छाया गिरगिरली. पण त्यांना कांही दिसले नाही. इतक्यात मनोहर ओटीवर आलेला तात्यानी पाहिला.

" केळीला लोंगर पडलय वाटत ?" तात्यानीं आपण ऐकण्याकरिता आलो नाहीं हे दाखविण्याकरिता कुपणीच्या झिटांमागे बोलणे सुरू केले. " पपयी पण पिकली आहे, नाही विनायकराव ? पेरू पण आलेत." विनायकराव पपई पेरूच्याऐवजी भोवरीच्या निळ्या फुलाकडे पाहत राहिले.

इतक्यात त्या कुंपणीशेजारच्या बोळाने बाप्पाजी आरडाओरडा करीत आले. त्याबरोबर तात्यांनी चिन्हाटे खाल्ल्यासारखे तोंड केले व आपला मोर्चा ओटीवर नेला. बाप्पाजी प्रत्यक्ष शिव्या देत नसत, परंतु तत्सम कांही संस्कृत शब्द वापरीत. ठाकूर–कातोड्यांना दुर्बोध अशी बाप्पाजींची ती एक दुसरी भाषा होती.

भली जाड अशी एक सागाची काठी —लहानसा वासाच म्हणा ना— त्यांच्या उजव्या हातांत होता. सागाचा वासा त्यानीं बुद्धिपुरःसर घेतला नव्हता. पण जेव्हां शेतांतील कडपे कातकऱ्यांनीं मळून नेल्याचे धवा ठाकराने येऊन त्यांना सांगितले तेव्हा हाताला जे मिळाले ते घेऊन ते रागाने बाहेर पडले.

त्यानी डोक्याला उपरण्याची टापशी बांधली होती. त्यांचे डावे हातांत भाताचीं लोंबरे होती. बाप्पाजी अगणांत आल्याबरोबर त्यांना पाहून निदान पन्नास तरी विडी विझली.

" कुठं आहेत डोंगरगावचे कातोडी ? त्यांना म्हणावं इकडं या आणि अंगणात इथं रागेन उभे रहा."

डोंगरगावच्या कातोड्यांनीं आपल्या घोंगड्या उचलल्या व ते अंगणांत रागेने जाऊन उभे राहिले. " माझ्या शेतांतलं भात कोणी मळलं ? कबूल होता कीं खाऊ पाहिजे ?" बाप्पाजीनी दरडावून विचारले.

" आमाला काय विचारतां ? तुमच्या राखणदाराला विचारा." तानक्याने गुर्मीत उत्तर केलें.

" ते तर मी विचारणार आहेच. त्याची तुला काळजी नको. माझे कातोडी अद्याप माझ्याशी बैमान झाले नाहींत. पण तुमचं काय म्हणण आहे ?"

" आमीं दाण्याला असा हात लावला नाहीं. या खलाटीत पाऊल आमीं टाकलं नाहीं. तुमचीं ठाकरं अन् हा धवा आमच्यावर आळ घेतो." डोंगरगावचे कातोडी चोरीचा इन्कार करूं लागले.

" कोया, भात सांपडल नाही तर तुला भरून द्यावं लागेल."

माझ्या कातोड्यांनी हात लावला तर माझा कान पकड. भादव्यात उपाशीं राहतों आमी, तरी लोकाच्या वस्तूला हात लावीत नाय." कोयाने उत्तर केले.

" बाप्पा, कातोडी म्हणतात भात नेलं नाहीं. मग भात नेल कोणी ? सराई पिकली ती तुमची कां कातोड्यांची ? या डोंगरगांवच्या कातोड्यांनीं नुसता धुडगूस मांडला आहे. कणस पोटरींत नाय आलीं तर यांचीं पोरं भातात शिरून दुधावरचीं कणसं चावतात अन् बाप्या गड्यांना तर रोज हिरव्या भाताचे पोहे अन् मासे यांचा रतीब लावला आहे. माशांकरतां, उंदरांकरतां अन् खेकड्याकरतां सारे बांध फोडून टाकले आहेत यांनीं. बोलायला गेलं तर दमदाटी करतात. अन तूं तर कांहीं पाहत नाहीं बाप्पा. बघ, बघ, कसे लुटलुटले आहेत ते ! मांस तरी यांच्या अगांवर मावत कां ? कातोडी कबूल होत नाहीत म्हणजं काय बिशाद् !" सयाजीनें आगींत तेल ओतलें.

त्याबरोबर बाप्पाजींनें हातातील सोटगा फेकून दिला व एक जाडसे टिकुरें उचलले.

नंतर खाली वाकून ओणव्याने डोंगरगांवच्या कातोड्यांच्या नडग्या फोडीत एकदां ते या टोकापासून त्या टोकापर्यंत गेले. " नाहीं होत कबूल? नाहीं होत कबूल? " असें ते तोंडाने म्हणत होते. तीनचार वेळां त्यानी कातोड्यांच्या पायाच्या नळ्या त्या टिकोऱ्याने सडकून काढल्या. कातोड्यांच्या नडघ्यांतून रक्ताच्या चिळकाड्या उडाल्या, परंतु कातोड्यांनी ' हू की चू ' केले नाही व ते कबूलहि झाले नाहीत. उलट मार खातांना आवळून धरलेलीं त्यांचीं शरीरें फुगू लागलीं. डोंगरगावच्या कातोड्यांना खरपूस ठोक बसत आहे, असे पाहून रानसईच्या कातोड्याना मनांतून खूप आनद होत होता. परंतु लहानपणापासून विचार छपविण्याची त्याना सवय असल्यामुळे कोणीहि तोंडावर त्या आनंदाची छटा दाखविली नाहीं. बाप्पाजी कातोड्यांना मार देऊन दमले तेव्हा त्याचे चुलतभाऊ बंधुजी समोरच्या घरातून आले व कातोड्याना मारणें हा एक व्यायामाचा जन्मसिद्ध हक्क आहे, असें समजून ते त्याच्या तोंडात मारू लागले. तिसऱ्या किवा चवथ्या कातोड्याचे थोबाड सडकताना कातोड्याचे गालाच्या हाडकावर हात आपटल्यामुळें त्यांच्या हाताला झिणझिण्या आल्या व त्यांनीं ' ग ग ' करून हात झटकला, तेव्हां बाप्पाजींनी पुन्हां टिकोरे उचलले.

ही मारपीट पाहून मनोहर सर्द झाला. कातोडी खरोखरीचे चोर असले तरी अशा अमानुष पद्धतीने त्याना मारणे बेकायदेशीर व अन्यायाचें होतें. पण मारणारा इसम स्वतः बाप्पाजीच असल्यामुळे मनोहर गप्प बसला.

" राहूं दे तुझं टिकूरं. कातोड्याचा जीव घेतोस काय?" कोया ओरडला.

" मग तूं दे भात भरून. " बाप्पाजी पण कोयाचे अगावर ओरडले.

" बाप्पा, तूं गेला होतासन शेतावर? मग तू काय चौकशी केलीस? " कोयाने उपरोधिक स्वरात विचारले. त्यानें आपल्या कबजाच्या खिशांतून भाताची पुंजी काढली व बाप्पाजींच्या तळहातावर ठेवली. त्यांत थोडासा तंबाखूचा चुरा पण होता.

" तुला काय समजतंय पोराला! बघ, तुझ्या भाताला भात लागतं की नाहीं. कातोड्याचे डोळे पाह्यला असतात, खायला नाहींत तुमच्यात्राणी.

तुझ्या आधीं जाऊन मी दहिवरावरचा माग काढला. हे कातोडी गवती माळावरनं चालत गेल. त्याच्या चालीन दहिवार नीट उडून गेलं नि वेडशिंगाच्या गुरुळापासून डोंगरगावच्या हद्दीत पार उबराच्या घबडीपोतर फराटा उठला होता. तिथ चार डब भात भरून ठेवल हाय." कोयाने पुरावा माडावा असे भाषण केले. तेव्हां बाप्पाजीने तीव्र नजरेनें डोंगरगांवच्या कातोड्यांकडे पाहिले.

"तूंच ठेवलंस तेव्हां तुला माहीत." तानक्यानें तोंड काढली.

"अरं जा सोरा. चोराचीं पावलं आमा चोरांना माहीत. या लंगड्या कातोड्याचं पाऊल उमटलं आहे शेतांत. तसच या जाड्या धाक्याची पावलं लपणार नाहींत. घ्या यांचं माप. तानक्याचा बी माग मी धरला आहे."

"अरे लंगड्या!" बाप्पाजींनी गर्जना केली.

"बाप्पा, पोटापुरतं भात नेलं ती काय चोरी आहे? इतकं तुझं भात पिकत कीं, चार खंडी उंदीर-घुशी खातात. मग आमीं काय पाप केलं आहे? उपाशी मरूं लागलों तवा नेलं थोडंस. यात काय चोरी आहे? चोरून आणलेली भाताचीं लोंबट आम्हीं पाचवीला पुजतों. चोरी कातोड्यांचा धर्म आहे."

"आणि तूं रं तानक्या?"

"धनी, आख्खा भादवा उपास काढला. नि निंगूत सराई पिकली. मग काय करूं? नाहीं तर आम्हीं समदंजण तुझ्या दारांत येऊन बसतो. घाल आमाला खायला."

तानक्याच्या बोलण्याने बाप्पाजींचें हृदय विरघळले. ते म्हणाले,

"आता तरी खरं बोला. पोटापुरतंच नेलंत ना?"

"पोटापुरतंच नेलं धनी. कुणाला विकलं असलं तर शपथ."

"मारवाड्याला नसेल. पण काळणाला?" बाप्पाजीनीं हसत विचारून विनोद उत्पन्न केला.

"काळणाच्या दुकानांत आम्ही पाऊल कशाला ठेवतो! आम्ही बा हातभट्टीची दारू खातों." असे म्हणून लंगड्यानें बाप्पाजींचे पाय धरले.

"बरं, पुन्हां असं करूं नका. तें भात तुम्हीं घ्या. चोरी करू नका. पोटाला मागून घ्या." असें म्हणून बाप्पाजी अंगणांतून ओटी चढून वर आले. त्यांनीं कपाट उघडून तंबाखूचा डबा काढला व जमलेल्या मंडळींच्या

हवालीं केला. मग पडवीच्या एका बाजूला बसून ठाकूर कातोड्यानी धुराचा कल्लोळ उठवला. काळे कातोडी विडीच्या निळ्या धुरात क्षणभर दिसेनासे झाले. विड्याविड्या ओढल्यावर डोंगरगांवचे कातोडी बाप्पांना ' बसा बाप्पा ' म्हणून निघून गेले. जाताना त्यानी धवा ठाकराकडे व इतर ठाकराकडे डोळे फाडून पाहिले व माना हलवून मुका दम दिला की, " तुम्हा ठाकरांकड एक दिवस पाहू. "

डोंगरगावचे कातोडी घोंगड्या गेऊन निघाले हा वेळपर्यंत तात्या आपल्या मागील ओटीवरून, कुपणांतील झिटांच्या फटींतून बाप्पाजींच्या अंगणांतील सर्व काही पाहत होते व ऐकत होते त्यानीं डोंगरगावच्या कातोड्याना बोलावून घेतले. " काय हे रक्ताचे पाट ! तुम्ही फिर्याद द्या. मी खर्च करीन. " तात्या त्याना चिथवू लागले. कातोडी एकमेकाचे तोंडाकडे पाहूं लागले. " तोंडांनी बोला. बाप्पाजीना भिता ? "

" त्याचं आन खाल्लय आम्ही. " एक एक कातोडी घोंगडी झटकून तात्यांची ओटी उतरूं लागला.

तात्यांनीं कातोड्याना पलीकडच्या बाजूनें बोलावलेलें अधूने पाहिले व सर्वांचा डोळा चुकवून टुणदिशीं उडी मारून तो जो नाहींसा झाला, तो तात्याच्या वेसकटीच्या झिटांआड उभा राहिला व मान खाली खालून कान पाडून ऐकू लागला. त्याच्या एका डोळ्यात दोन्ही डोळ्यांची शक्ति केंद्रित झाली होती. तसेंच त्याचे कान पण तिखट होते. थोड्या वेळाने तो बाप्पाजींना खबर सांगू लागला.

" बादी कातोड्यांना फिर्याद करा म्हणून सागतो आहे. "

" कातोड्यांची माय व्याली आहे ! त्या केशाला सांग, तू कातोड्याचे चोरीच भात घेतोस. मी त्यांना माझं भात चोरूं देतो. पण अंध्या, तुला किती वेळां मीं सांगितलं कीं आडून ऐकणं पाप आहे. बघ, पुढल्या जन्मीं पाल होशील." सर्वजण हंसले.

बाप्पाजींच्या बोलण्याने अंधू खजील होऊन निघून गेला.

" अरे हो ! सयाजी, मी विसरूनच गेलो. " बाप्पाजी माजघरात जात होते ते एकदम वळून बोलले, " आज मीं पाप केलं. तुझी चोरी केली."

" माझी चोरी केलीत? कोणाच्या शेतातली काडी दात कोरायला घेणार नाहीं तो बाप्पाजी माझी चोरी करणार?"

" अरे हो, मी तुझी चोरी केली. ह्या घे तुझ्या लोंब्या. तुझ्या शेतातून येत होतो तो माझ्या मनांत दुष्ट विचार आला अन् मी तुझ्या लोंब्या तोडल्या. म्हटलं पहावं राजपाटीपेक्षा तुझं भात चागल आहे की नाही. म्हणून नमुना घेतला. काय पण भरघोस भात आहे?" असें म्हणून बाप्पाजींनीं सयाजीच्या अगावर भाताच्या लोंब्या टाकल्या. " हीं घे बाबा तुझीं कणस! नाहीं तर चित्रगुप्ताच्या जमाखर्चात जातील."

त्याबरोबर सयाजी उसळून म्हणाला, " वा रं बाप्पाजी! वा! ह्या ह्या चार लोंबटाची काय किमत! हा हा सयाजी आहे." त्या वेळी सयाजीनें आपल्या छातीवर जोराने प्रहार केला. " कमअस्सल नाहीं मी. तळेगांवहून मी आलो तर मापटभर नाचणी नव्हती माझ्याजवळ. तुमच्या वडिलांनीं खोपटाला लांकूड दिलं, गाडीबैल करून दिलं, शेतपोत दिलं, अन् लावायला वर अर्धी खंडी भात दिल. तुमच्या अन्नावर वाढलो. मी हयात आहे तोपर्यंत नाही विसरायाचा. पोरांचं मी सागत नाहीं. म्हणे चार लोंबट बाप्पाजींनी तोडलीं! पुन्हां बोललास तर काडी लावून देईन भाताला न् गवताला न् घराला. बाप्पाजी, हे भात काय पण जीव ओवाळून टाकीन तुमच्यावरून."

बाप्पाजींच्या चेहऱ्यावर समाधानाचें एक हास्य रुदावले.

" पण सयाजी, तुझं भात राजपाटीला ऐकत नाहीं." बाप्पाजींनीं पुन्हा भाताच्या गोष्टी काढल्या.

" बाप्पाजी राजपाटी म्हंजे एक सोन्याचा तुकडा आहे. तुमचीं सगळीं कामं मोलाचीं! तुमच्यानं काय शेती होणार! आम्ही सबध कुटुब पोत्यानशी कष्ट करतों तेव्हां आम्ही मोती पिकवतों. सर्व धर्मात कुळबी धर्म श्रेष्ठ आहे. मी राजपाटी लावली तर दहा खंडीखालीं उतारा नाहीं घेणार."

" हो, धवा, उद्या दहा गडी हाटक. तवसाळीच भात नाहीं कापल तर आतां खड्डं लागेल. कालपासून खार सुटली आहे."

" पण आम्ही दुसऱ्यां धन्याच्या मजुऱ्या घेतल्या आहेत."

" त्याच्या कामावर परवा जा. माझं भात तयार झालं आहे. ते आधी कापा. मग दुसरीकडं जा. त्याला मी कांहीं नाहीं म्हणतों!"

" पण आम्ही त्या धन्याला होयबामा दिला आहे ना ! तो अम्ही कसा मोडणार ? "

" कोण दुसरा धनी ? हरामखोरानों, माझ्या जागेंत फुकट राहून माझ्याशीं बैमानी करता ! तुमची लाकडाची, फास्याची सगळी वर्दळ मी काढतों अन् मला तुम्ही ' होयबामा ' दाखवतां ? " डोळे लाल करून बाप्पाजी ओरडले.

ठाकूर सयाजीच्या तोंडाकडे पाहत राहिले.

" काय र ही ठाकराची वेडी जात ! अरं, माझ भात अजून हिरवं आहे. चार दिवसानीं कापायला होईल. तुम्ही पहिल्यान् बाप्पाजींच्या शेतांत शिरा. " सयाजीने बाप्पाजींची समजूत काढली तेव्हा ते शांत झाले. शिवाय सुभद्रेने साखरपाल्याच्या वड्याच्या बशा व चहाचे पेले आणून बाप्पाजी, मनोहर व सयाजी याचे समोर ठेवले. मग सयाजी आपल्या घराकडे जाण्याकरिता निघाला. जातां जातां तो परत फिरला. " मनुदादा, तुमच्या मैतराला काहीं तरी सागा. सारखा लाडीच्या माग आहे. एक हजार रुपये खर्च करून पायगुणाची लक्ष्मीसारखी सून आणली. अन् हा कुत्र्यासारखा तिच्या माग हिंडतो. चांगल कां हें ? "

" सयाजी, मुकुट काय गैर करतो ? "

" वाः वाः बाप्पाजी, मी तीन लग्नं केलीं. पण मिशी वर ठेवली. कुळब्याला काय ! एक लग्न केल कीं घरांत एक गडी जास्त होतो. "

सयाजी थाबला होता तो आपल्या घराकडे निघून गेला. बाप्पाजीहि आत उठून गेले. ओटी रिकामी झाली, तरी अंकुशा मागे रेंगाळला होता. ओटीवरच्या देवादिकाच्या तसबिरी न्याहाळण्याचा त्याचा उद्योग चालू होताच. मनोहरनें आपल्या पेल्यातील अर्धा पेला अंकुशाला दिला व विचारलें,

" अंकुशा, काय हेरतोस मघापासून ? "

" काय नाय बा. पण मनुदादा, एक गोष्ट विचारायची हाय. म्हणून बसलों घटकाभर. "

" काय ती गोष्ट ? "

" दादा, सहा तोडांचा देव कोणता ? मघापुन मी या तसबिरी बघतो पण यांत सहा तोडांचा देव नाही. तो पहा, दहा तोडाचा रावण, तीन तोडाचा दत्त देव, चार तोडांचा बिरमदेव. पण हा सहा तोडांचा कोण बा देव ? आपलं तर डोकं चालत नाय. आमची सबंध शास्त्री गाणी तपासली अन् पाखडी गाणीं पण तपासलीं. पण नाहीं गावत मला. "

मनोहरला पण थोडा वेळ कोडे पडलें. त्यालाहि थोडा वेळ काहीं सुचेना. इतक्यात त्याला आठवलें व तो हसून म्हणाला,

" अरे वेडया, कार्तिकस्वामी. "

" हां हां बराबर. कार्तिकस्वामी. बायकांच वावडं असत त्याला. आतां बसतो मी तानक्याच्या उरावर. "

" पण कशाला रे तुला हे पाहिजे ? "

" माझी ती सोरी भिवरी ! तिच्यापासून हों तटा आहे. डोंगरगांवचे कातोडी दर आठा दिवशीं, पंधरा दिवशीं आम्हाला कोड पाठवतात आणि म्हणतात, 'याच उत्तर पाहिजे चार दिवसांच्या आत. नाहीं तर मारामारीला तयार व्हा.' मनुदादा, तुम्ही लई बुक शिकलात. मला असं कोडं तयार करून द्या कीं, डोंगरगावच्या कातोडयांच्या बापालाबी सुटायाच नाय. "

मनोहरला अंकुशाच्या प्रश्नाचे मोठे कौतुक वाटले. त्याने पूर्वी कधीं कोडीं तयार केलीं नव्हतीं. त्याच्या अकलेच्या परीक्षेची वेळ अंकुशाने आणून ठेवली. तो विचार करू लागला. पण त्याला कांहीं सुचेना. त्याला आधल्या दिवसाची अकुशाची माशाची शिकार आठवली. तो देखावा त्याचे डोळ्यासमोर उभा राहिला. तो ओढा, ती भिवरी, कोयी, अंकुशाचें खपाटी गेलेले पोट, पण त्याची स्वातंत्र्यप्रिय वृत्ति, त्याचे कातकऱ्याच्या जंगलजीवनावरचें गाणे, ती म्हैस, ती डोबण, म्हशीवर बसलेली बगळी, तिनें गिळलेला मासा, सर्व काहीं त्याच्या मनश्चक्षूंसमोर उभे राहिले. या सर्व आठवणींची गल्लत मनांत होऊन त्याला एक कोडे सुचले. तो म्हणाला,

" अंकुशा, झालं कोड तयार. नीट ऐक—

' एक होती चौपाई ।
' तिच्यावर बसली दुपाई ।
' तिने गिळली निपाई ।
' माझ्या कोड्याचं उत्तर देईल
तो शहाणा शिपाई ! '

अंकुशा कोडें ऐकून गारच झाला. त्यानें कर कर विचार केला, पण त्याला कोडें सुटेना. मऊ होण्याकरिता केसांत ठेवलेलीं आपट्याचीं पानें काढून त्याने विडी पेटवली व विडीच्या धुराकडे पाहत तो जोराने पुन्हा विचार करूं लागला. तरी कोड्याचें उत्तर त्याचे डोंगरमाथ्यावर येईना. तेव्हा त्याने मनोहरला गाय होऊन विचारले,

" दादा, हे कोडं त्यांच्या बालाबी सुटणार नाय. पण याच उत्तर काय आम्ही सागणार त्यांनीं विचारल्यावर ? "

" अरे, डोबणांत एक होती चार पायांची म्हैस. तिच्यावर बसली दोन पायाची बगळी. तिनं गिळला बिनपायाचा मासा. "

कोड्याचें उत्तर ऐकल्यावर अंकुशाने आवेशाने उडी मारली.

" आख्खा जन्म घातला तरी कातोड्यांना याचं उत्तर गवसायचं नाय. आतां मी तानक्याची जिरवतो. त्याला निरोप धाडतों की, कोड्याचं उत्तर दे. नाहीं तर लढाईला तयार हो. " चित्त्याच्या चपळाईनें अंकुशा तेथून नाहीसा झाला. त्याच्याएवढ्या उमरीच्या त्या कातोडीगडयाची बा - मनोवृत्ति पाहून मनोहर विस्मित झाला. जीवनाचा खरा रंग, खरा आनंद याच लोकाच्या धमन्यामधून वाहतो. आपण त्याला पारखे आहोत, असे विचार त्याच्या डोक्यांतून गेले. कशाकरिता-कशाकरिता आपण हें सुख लाथाडतों ?

त्या दिवशीं रात्रीं काळदरींतील निःस्तब्ध शांततेंत मनोहर इंथरुणावर पडला, तेव्हां दूर अंतरावर रानसईच्या कातोडवाडींत ढोल घुमत होते व त्याच्या तालावर कातोडी नाच सुरू होता. घुमणाऱ्या ढोलांचे प्रतिध्वनि काळ्या कड्यावरून परत फिरत होते. तसेच दूर अंतरावरून डोंगरगांवचे कातोडी ढोलाचे बोलांतून रानसईचे कातोड्यांना उत्तर देत होते.

— —

## प्रकरण ७ वें

# रम्यता

आधीच सराईचे दिवस रम्य. त्यांत सुदर पीकरात आणि जोडीला दिवाळी जवळ येत होती. शेतकऱ्याच्या उत्साहाला पारावार राहिला नाही. घरोघरीं दिवाळीची तळणें सुरू झालीं. रानसईत बाप्पाजींचे घर सगळ्यांत मोठें. दरसाल बाप्पाजींची दिवाळी मोठी असे. परतु यदाचे प्रमाण दुप्पट होतें. दरसाल राजसबाई शेरभर वेलदोड्यांवर भागवीत. यदाच्या यादींत दोन शेर वेलदोडे होते. त्याच प्रमाणांत दुपेटा साखर, काळ्या पाठीचे पांढरे खोबरें, बदाम, बेदाणा, जायफळ, खसखस, यांच्या स्वयंपाकघरांत राशी पडल्या. तरी दुसरून राजसबाईनी नवी यादी बाप्पाजीजवळ दिलीच. बाप्पाजीनीं दिवाळीचे सामान राजसबाईच्या मनाप्रमाणे खरेदी केले व अंधूने ते डोक्यावर वाहिले. कोणी ' ब्र ' बोलले नाही. कारण यदा मनोहर बी. ए. पास होणार होता. म्हणून दिवाळी मोठ्या प्रमाणावर साजरी व्हावयाची होती. सुभद्रेच्या कणारागोळीने तुळशी-अगणांत पाय ठेवायला जागा ठेवली नव्हती. ती राजसबाईच्या हाताखालीं सारखे काम करी. करंज्यांकरिता खोबरे किसताना तिचा तीन वेळा हात किसला, म्हणून तिला चमच्याने जेवणे भाग पडले

" मनोहर, तुला वास आला ? " राजसबाई बेसन नाहीं तर रवा भाजतांना माडीवर जाऊन मनोहरला विचारीत. वास्तविक हा प्रश्न त्यांनी ओटीवरच्या पाहुण्यांना किंवा माळ्यावरच्या मांजरांना विचारावयास पाहिजे होता. कारण राजसबाईंना आपल्या तीक्ष्ण घ्राणेंद्रियाची परीक्षा देण्यास ते केव्हांहि तयार होते.

" छट्, मला बिलकुल वास आला नाहीं. " मनोहरने आईला थाप मारावी. मनोहरला वास येणार कुठून ? त्याला पडसे झाले होते.

मग राजसबाईंनीं खालीं जावें व सबध पावसाळ्यात दिवाळीकरिता साठवून ठेवलेल्या तुपाचा हंडा काढावा व तमातमाने डावच्या डाव तूप

पातेल्यात रिकामे करावें. आप्पाजींच्या घरात दही-दुधाची किंमत शून्य, तर तुपाची दोन शून्ये होतीं. आणि राजमबाईंना मना करणार कोण ? परीक्षा देऊन पुण्याहून खावखावलेला त्यांचा मनोहर यंदा भर दिवाळींत घरीं आला होता आणि यंदा तो बी. ए. होणार होता.

हिवाळ्याची थंडी नुकतीच पडूं लागली. अभ्यासाला कटाळलेला मनोहर भाता-शेतातून अन् रानागवतातून सकाळसंध्याकाळ मनमुराद हिंडूं लागला. सृष्टिशोभा पाहताना त्याला संस्कृत, इंग्रजी व मराठी कवींची काव्ये आठवत. सह्याद्रीच्या हिरव्या खोऱ्यातील निसर्गाचा सचित्र ग्रंथ चाळताना कोणाला कटाळा येईल ? गवतात त्याला सशाची वीण दिसे, तर पायाखालून मातीच्या रंगाच्या लाव्हऱ्या भुर्रर करून आवाज करीत उडत व त्याच्या विचाराची साखळी तोडींत. रानातील निरनिराळ्या पक्ष्यांची मंजुळ साद ऐकताना त्याचा जीव वेडा होई. कुठे मोर ओरडत, सकोत्री आडवीं जात, कीर-रावे-हरेळ वडाच्या झाडावर गर्दी करिताना दिसत.

दिवसा सराईचे निळे आकाश डोंगरमाथ्यावरून अखंड विरघळतांना दिसे. मनोहर आकाशाकडे, रानडोंगराकडे, जलाशयाकडे व त्यात पडलेल्या या सर्व देखाव्याच्या प्रतिबिंबाकडे तास न् तास पाहत बसे. त्या भव्य सौंदर्याने त्याची आनंदयुक्त उदासीनता वाढे. त्या वेळीं लांबवरची कुठली तरी अज्ञात हुरहुर त्याच्या जिवाला लागून राहिली आहे, असे त्याला वाटे. पाणी हे जीवाचे उत्पत्तिस्थान. तसेंच जीवाच्या उत्क्रांतींत डोंगर, आकाश, राने जिवाचे जवळचे शेजारी व खरे मित्र. तेव्हा त्याच्या दर्शनाने त्याच्या जुन्या आठवणी जाग्या होऊन आनंद वाटणे स्वाभाविक आहे, पण हा आनंद उदासीन कां असतो ? अधुनिक तत्त्वज्ञानांत किंवा शास्त्रात त्याचे उत्तर नाहीं. वेदांताप्रमाणे प्रभव आणि प्रलय दिवस-रात्रीप्रमाणे आहेत. त्यांचे आधी काय होतें म्हणून विचारले तर त्याचे काव्यमय उत्तर असे आहे की, त्या निष्पंद अवस्थेत जिकडे तिकडे परमेश्वरी उदासीनता भरून राहिली होती. सुखदुःख कर्माकर्म यांपासून अलिप्त अशा परमेश्वरी मनाची ती अवस्था आहे त्यांतूनच विश्वाची घटना-विघटना होत असत. त्यामुळे त्या घटनेचे प्रकृतिरूप असे मोठे घटक जे आकाश, समुद्र, डोंगर त्यावरून हा उदासीनता रेंगाळत राहिली आहे.

अशा तऱ्हेने उदासीनतेवर मनोहरचे मन स्थिर होई. त्या वेळीं त्याला कुठे तरी लाडीची मूर्ति दिसे, किंवा तिच्या हंसण्याची लकेर ऐकूं येई किंवा मुकुटबरोबर ती थट्टामस्करी करतांना आढळे. ते पाहून मनोहरचें मन चंचल होई.

मनोहर आपले मन खूप आवरण्याचा प्रयत्न करी. बाप्पाजी काय म्हणतील ? गावांत आपली अब्रू जाईल. आपली छीःथूः होईल. बाप्पाजींच्या नावाला, देशपांड्यांच्या लौकिकाला कलंक लागेल. सर्व कुळें आपणांस बाप्पाजींसारखा मान देतात. तो रसातळाला जाईल. असे विचार त्याला परावृत्त करीत.

लाडी मुकुटला खिजवून लाब अंतरावर तळमळत ठेवण्यांत आनंद मानी. कुरेंबाजपणाने जेव्हा ती आपल्या अभंग कौमार्याची आठवण न बोलता मुकुटला जाणवी तेव्हा मुकुटचे हृदयाचे ठोके जलद पडत. मग ती हातातून सुटलेल्या तीरासारखी लाब पळून जाई व खदखदा हसे. तिच्या हंसण्याने दरी भरून जाई. खजिल झालेल्या मुकुटला तो पराजय देखील गोड वाटे. तो रुसून बांधावर जाऊन बसे व बांबूचा पावा वाजवूं लागे. आणि मग कान फिरवीत टवकारून पाहणारी त्याची जनावरे माना खाली करून घास खाऊं लागत.

यंदा मुकुटने लाडीच्या शेतीवर आगोटीपासून सराईपर्यंत सयाजीला चोरून फुकट काम केले. तिला भारा उचलून देतांना तिच्या डोळ्यांत त्याला सराईचें चित्र दिसे. तिच्या बहरलेल्या यौवनालंकृत रसरशीत स्पर्शाने त्याला अत्यानद होई. तिच्याशीं वागतांना थट्टामस्करी करण्याची तो पूर्ण मोकळीक घेई. दीपाजी या सर्व चेष्टांकडे कानाडोळा करी, कारण लाडी त्याची लाडकी लेक होती. शिवाय यंदां तो दुखण्यानें पडला होता. तेव्हां त्याचे काम कोण करणार ? लाडी व मुकुट शेतावर काय करतात याची घरीं बसून त्याला विशेष कल्पना पण नव्हती.

लाडी-मुकुट, अंकुशा-भिवरी यांचा गवतांतील ग्रामीण प्रणय पाहून मनोहरच्या चित्तवृत्ति जाग्या होत व जीवनाचे काव्य त्याच्या नसांनसांतून उसळूं लागे. कुणी तत्वज्ञानी म्हणतात, 'जीवन ही एक मोठी लढाई आहे.' कुणी म्हणतात, 'जीवन ही एक बेफाम शर्यत आहे. भयाण जुगार

आहे. अजब तमाशा आहे.' परतु सराईच्या रम्यतेत, स्वैर फिरणाऱ्या लाडीची रसरग आकृति पाहून मनोहरचे हृदय कंपित होई व त्याला जीवन म्हणजे एक गोड स्वप्न, रसात्मक काव्य, कलात्मक चित्र वाटूं लागे. तो फिरावयास गेला की, याच चित्राच्या तद्रीत असे. चित्राबाहेर राहणाऱ्या रगानी जसा चित्रकाराचा कलात्मा गुग होतो तसा सामाजिक जीवनाच्या बाहेर राहणाऱ्या या रगांनीं तो लुब्ध झाला. लाडी पुष्कळ वेळां त्याला एकातांत भेटे. त्याच्याकडे पाहून ती कटाक्ष फेंकी. आपले धनुष्याकार ओष्ठ उघडून ती हास्य करी. क्वचित् मनोहर पण हंसून प्रत्युत्तर करी व बोले. पुष्कळ वेळा नदीच्या काठीं टेकाडावर असलेल्या लाडीच्या घरीं जाण्याची त्याला तीव्र इच्छा होई. पण तो दर खेपेस सयम करी. त्याच वेळीं त्याला कोणी तरी दिसे, कशाची तरी आठवण होई व तिकडे तो आपले लक्ष गुतवी. नाही तर तो दुसऱ्या बाजूला निघून जाई. परतु प्रणयाशीं युद्ध खेळून मनोविजय मिळवण्याची मर्दानी महत्त्वाकांक्षा त्याला मृगजळाचे मागे पिटाळी.

मनोहरची विलायती बासरी मुबईहून केव्हाच दुरुस्त होऊन आली होती. मनोहर फिरावयास जाताना बांसरी बरोबर घेऊन जाई. एखाद्या टेकाडावर, कड्यावर, नदीकिनारीं बसून किंवा सराईच्या गवतात पडून त्याने आपल्या बासरीचे उत्तान स्वर काढण्यास सुरवात केली कीं, काळ-दरी त्या प्रणयालापांत पिळवटून जाई. बांसरीमुळे मुकुटचा नादमधुर पावा बद पडला. मनोहर बांसरी वाजवू लागला कीं, तो आपला पावा लपवून त्याच्याजवळ येई व खिन्न नजरेने त्याच्याकडे पाहत उद्गार काढी :

"गरीब माझा पावा! तुमच्या विलायती हत्यारापुढं त्याचं काय चालणार?"

मग मनोहर आपली बासरी थाबवून त्याला पावा वाजविण्याचा आग्रह करी.

लाडी तर मनोहरच्या बासरींतून निघणाऱ्या अलापानीं वेडी झाली होती. रस्त्यानें जातांना, किंवा काम करण्याचें थांबवून ती चोरून ते आलाप ऐकत उभी राही. एक दिवस मनोहर राजपाटीच्या दांडाला गवतांत बासरी वाजवीत बसला. ती संध्याकाळची वेळ होती. सबध दरी

संध्याप्रकाशाने उजळली. रानाचे, भाताचे, गवताचे, हिरवे, पोपटी, पिवळे रंग, कड्याचे, डोंगराचे निळे, जांभळे, काळे रंग त्या सोनेरी किरणात निरनिराळ्या रंगाचे उठाव करीत मिसळले. त्या सोनेरी उन्हात हिरवे रान सोन्यावर केलेल्या हिरव्या मिन्याप्रमाणे चमकत होते. दरीचे वर आकाशात निखारलेल्या ढगाची खार पडली. पश्चिमेकडील एका लांबच्या निळ्या डोंगरामागे सूर्य मावळत होता. संधिप्रकाश त्या निळ्या डोंगरामागून आगीच्या डोंबाप्रमाणे भडकला. तो संधिप्रकाश निखारलेल्या ढगावर पडून रंगाच्या समुद्राला उधाण यावे व तो दरीच्या आखातात शिरावा, असा देखावा दिसू लागला. निळ्या आकाशाखाली हिरवळलेल्या डोंगराच्या कडा लहरल्या होत्या. रानसईला क्षितिज नव्हते. ते डोंगरमाथ्यावर जाऊन बसलें होतें.

संध्येच्या आगमनामुळे शांत शांत होत जाणारी खलाटी दरीच्या कोचीकोचींतून रात्रीची छाया येत होती तेथपर्यंत पसरली होती. त्या किर्र अशा खलाटीतून भातागवताचे, कुरडूच्या फुलाचे सुवास सुटले. कारवीचा मादक सुगंध त्यांना रेटूं लागला. भुंगे गवती फुलावरून वीणावादन करूं लागले. अशा रम्य वेळीं मनोहर गवतात पडून बासरी वाजविण्यात तल्लीन झाला. थोड्या वेळांत गवतांतून लाडीचे डोळे भुंग्याच्या जोडीप्रमाणे त्याला दिसले. तो ताडदिशीं उठून बसला. त्याचे अंगावर रोमांच उभे राहिले. पोह्याच्या गवताच्या गु-तांप्रमा ें त्याची कल्पनासृष्टि थरारली. त्याची बासरी कंप काढूं लागली. त्याच्या बासरीतून प्रेमाने झंकारलेले नाद निघू लागले. शेजारून सराईच्या स्वच्छ पाण्याने निवळलेला झरा खळखळ करून क्लेरिऑनेटच्या गळ्यात गळा घालून त्याला केव्हा साथ करू लागला हे त्याला कळलेसुद्धां नाहीं. इतक्यात राजपाटीच्या बांधावर त्याला बाप्पाजी दिसले, तेव्हा त्यानें लाडीला गवतांत पडण्याची खूण केली व तो स्वतःहि गवतात आडवा झाला. लाडी त्याचे शेजारी उन्नत स्तनावर उपडी पडून त्या आलेल्या संकटाकडे पाहत हसत राहिली. बाराच्या दुहेरी गवती कळ्याप्रमाणें तीं दोघे गवतात लपलीं. मनोहरने बासरीचा सूर सोडला नाहीं. लाडीकडे पाहून हंसत हंसत तो बासरी वाजवीत होता. सभोंवार कोथिराच्या आणि पोह्याच्या गवताचा समुद्र वाऱ्याने लहरत होता. गवती माळाने

कापलेल्या आकाशरेषेवर कुरडूची फुलें डुलत होती. चंडोल अर्ध्या आकाशात आलाप घेत होता. बाप्पाजी तेथें केव्हां येतील याचा नेम नव्हता. लाडी बाप्पाजींच्या हालचालीवर टेहळ ठेवून पळण्याच्या जय्यत तयारीत होती. पण बाप्पाजी तिकडे फिरकले नाहींत.

" अंधू, हा वेडा गवतांत पडून कुठं वाजवतोय् बासरी ? करकरीत तिन्ही सांजची वेळ आणि गवतांत हा बासरी कशाला वाजवतो आहे ? नाग नादप्रिय आहेत. कुठं नसतील तेथून येतील गाणं ऐकायला. अंध्या, हांक मार पाहूं त्याला. "

अंधूनें मनोहरला आरोळ्या मारल्या तेव्हां लाडीला कष्टाने टाकून तो बांसरी वाजवीत बाप्पाजींकडे आला व त्यांचेबरोबर बांसरीचे आवाज घुमवीत गावांत गेला. त्याचें हृदय प्रणयवाहिनी गानसरितेबरोबर गवतात सोडून आलेल्या लाडीकडे वाहत मागे जात होते. लाडी किती तरी वेळ ते आलाप ऐकत ऐकत पडून राहिली होती. जेव्हां रात्र झाली तेव्हां ती उठून घरीं आली. त्या वेळीं आकाशांत तारे कोथिराच्या आणि पोह्याच्या तुऱ्याप्रमाणे चमकूं लागले.

बांसरी ऐकण्याकरितां लाडी मनोहरशेजारीं येऊन बसली होती. त्याचे नतर दोनचार दिवसानीं मनोहरला लाडीच्या घरावरून जाण्याची तीव्र इच्छा झाली. तिला तुकारामने पुन्हा त्रास दिला किंवा नाहीं, हे एकदा विचारावे हा उदात्त हेतु त्याचे मनात होता व तो त्याच्या उदार मनाला अनुसरून होता. परंतु गेल्या तीन दिवसांत त्याला लाडीचें दर्शन घडलें नव्हते व तो तिला भेटण्यास अत्यंत उत्सुक होता हें खरें कारण. पण मनोहरनें मोठा निग्रह केला. इतक्यांत त्याला समोर कातोडवाडी दिसली व एकदम आठवले कीं, अंकुशाच्या सहा तोडाच्या देवाचे काय झालें हें आपणास कळलें नाहीं. मनोहरची जिज्ञासा जागी झाली व तें निमित्त करून तो कातोडवाडीच्या वाटेला लागला.

मग तो कातोडवाडींत शिरला. कातोड्याची उघडींनागडीं पोरें बाहेर खेळत होतीं. एका पोरानें टिनच्या डब्यावर ताल धरला होता. दुसरीं मुले त्या तालावर नाचत होतीं. एका लहान मुलानें खेकड्याच्या पोराला दोरीने बांधलें होतें व तो त्या खेकड्याशीं खेळत होता. कातोडवाडींत बापेगडी

हजर नव्हते. सर्व बायकामुलेंच होतीं. कातोड्यांच्या झोपडींतून थोडी गाडगीमडकीं दिसत होतीं. बाकीं सामान म्हणजे शिकारीचे. धनुष्यबाण, गळ, चिकोटी, भाले, बर्च्या मोठ्या काळजीने ठेवलेल्या होत्या. कुडांचे फटीतून कोयते, विळे, कुऱ्हाडी अडकवल्या होत्या. आढ्याला ढोल लटकला होता. सर्व झोपड्या म्हणजे कातोड्यांचे हवाई महालच. त्यांच्या जमीनीपर्यंत टेकलेल्या छपरातून कोणाला न दिसतां कातोड्यांना आजूबाजूच्या प्रदेशावर टेहळ ठेवण्याची सोय होती. मनोहर वांकून अंकुशाच्या झोपडींत शिरला. भिवरी दगडी उखळींतील भात घाईघाईने भरत होती.

" भिवरे, आम्हाला दे तुझा गरम गरम मावा." मनोहरने भिवरी-जवळ गरम पोहे मागितले.

भिवरी घाबरली. मनोहरने चोरी पकडली म्हणून ती गोंधळून हल्ल्याला तोड देण्याकरिता अग ताठ करून उभी राहिली. झोपडीला मागील बाजूने दार नव्हते. पुढल्यां बाजूने पळून जावे तर तिथे मनोहर उभा. तिचे सर्व स्नायु चपळाईनें हलके फूल होऊन तिच्या पळून जाण्याच्या हुकमाची वाट पाहत होते.

"तुझ्या शेतातला नाय. केसूतात्याच्या शेतांतलीं चार लोंबटं आणलींत.'

मनोहर हसू लागला. त्याने उखळींतील पोहे हातावर घेऊन कोंडातूस फुकून स्वच्छ केले व तोडांत टाकले. इतक्यांत ओली लंगोटी लावलेला उघडाबंब अंकुशा किनाऱ्यावरून मासे मारून झोपडींत आला. त्याचे एका हातांत माशाची टोकरी व दुसऱ्या हातांत लव्ह्याचे दाड्यात ओवलेली शिवड्यांची माळ होती. तो भिवरीच्या अंगावर ओरडला.

" भिवरे, घोंगडी हाथर. आपले धनी हायती. ह्याचे पाय तुझ्या धरणीला कशाला लागतील! मनुदादा, बुजार भेकरी हाय ही रानची. आग, ते पोहे पाखड. त्याचंच भात आणलंस तूं न् त्याना पोहे नाय देत कशी ? दादा, कातोडी आपला जाति-धरम नाय टाकायचा ! मी भिवरीला किती सांगतो. पण ती तुमच्या शेतातून भात आणतेच."

अकुशा काकडी काढण्याकरितां झोपडीमागील परसांत गेला. भिवरीनें सुपाच्या दोन हसड्यांत ते पोहे पाखडून साफ केले. कातोडणीइतकें पोहे पाखडण्यांत कोणी वाकबगार नसेल. दाणे-माती एक झाली आणि खडा-

वणात भात दिसेनासे झाले तरी कातोडणी त्यांतून पाखडून पाखडून स्वच्छ भात काढतात. अकुशाने काकडी आणली आणि विळ्याने ती चलाखीने साफ केली. भिवरीने पुढे ठेवलेले पोहे मनोहर खाऊ लागला.

“ अकुशा, आता मला कळल कातोडी सराईचे इतके लुटलुटीत का होतात ते! असले पोहे मला मिळाले तर मी पण तुझ्यासारखा दाडगा होईन. पण कायरे, तानक्यान दिलं का तुझ्या कोड्याचं उत्तर?” कोड्याची आठवण होऊन मनोहरने विचारले.

“ उत्तार? त्यांच्या बाला पण गवासलं नाही. मग दिली त्यानीं शरण-चिठी. तवापुन कोड्याची अशी गोस्ट काढीत नाहीत ” अकुशा गर्वाने बोलला.

“ दादा, तुम्ही आलाय कधीच्या काळी कातोडवाडीत, तर कातोड्याची करमणूक दाखवतो तुमाला.”

अंकुशाने माळ्याला टागलेला ढोल सोडला. भिवरीने बाहेरच्या पटागणांत आब्याच्या झाडाखाली घोगडी हंथरली. अकुशाने ढोल वाजविण्यास सुरवात केली. ढोलावर पहिली थाप नाही पडली तो आतापर्यंत अदृश्य असलेले कातकऱ्याचे बापेगडी, बायकापोरे, पोरी निरनिराळ्या वाटांनी कातोडवाडीची टेकडी चढून वर येऊ लागले. आधीच अकुशा-भोंवतीं बारक्या पोरांनीं नाचाचा फेर धरला होता. त्यात घुसून घुसून जो तो आपापली जागा लष्करी कवायतीप्रमाणे घेऊ लागला. ढोल घुमू लागला. ढोलाच्या निरनिराळ्या बोलावर तऱ्हेतऱ्हेचे नाच सुरू झाले. कातकऱ्यांचीं अंगें विजेप्रमाणे लवत होतीं. गिरक्या, जोडीच्या गिरक्या, पायांचें कमळ, गुलबाशीची साखळी अशा तऱ्हेचे तालबद्ध नाच होते ते. नाचाला रंग चढला. भिवरी शंकराला भुलवणाऱ्या भिल्लिणीप्रमाणें नाचत होती. मनोहरला नाचात सामील होण्याची तीव्र इच्छा झाली. पण त्याने ती आवरली. ज्या नाचात शारीरिक मेहनत, कसरत किंवा कोलाट्या जास्त असत त्या नाचांत स्त्रिया भाग घेत नव्हत्या. असा एक नाच चालला होता तेव्हां भिवरी मनोहरजवळ हळूच येऊन बसली व तिने मनोहरला काळ्या कड्याच्या बाजूला डोळा फिरवून खुणावले. हातांत कोयता घेऊन लाडी फाटी आणण्याकरितां रानाच्या वाटेने चालली होती. तुकाराम

फॉरेस्टर पायऱ्याच्या खोंड्यांतून तिला न कळत दबत तिच्या मागून चालला होता. अंकुशाने ही गोष्ट केव्हांच हेरली होती. पण त्याला भिवरीइतकी समयसूचकता नव्हती.

मनोहर लाडीमागे जाण्यास उतावीळ झाला हे पाहून अंकुशाने नाच बंद केला व मनोहर रानाकडे चालता झाला. मनोहरच्या हातात काहींच नव्हते. तुकारामाच्या खांद्यावर फॉरेस्टाची सरकारी कुऱ्हाड होती. मनोहर कातोडवाडी सोडून जंगलाच्या घेऱ्यांत शिरला नाहीं तो कातकऱ्याचा एक पोरगा हातांत भाला घेऊन धावत धावत आला व भिवरीने हा दिला आहे असे सांगून भाला मनोहरजवळ देऊन तो परत दौड करीत कातोड-वाडीत गेला. त्या वेळीं लाडी काळा कडा वेधत होती. मनोहरचा गळा चांगला होता. तो स्फूर्त होऊन गाऊ लागला. सहजगत्या तांब्यांची कविता त्याचे गळ्यांत घुमूं लागली. तिचा अर्थ त्या प्रसंगाला अनुलक्षून निघतो, असे त्याच्या मागून लक्षात आले. मग लाडीलाच उद्देशून त्याने उच्च स्वराने गाणें सुरू केलें.

" प्रीति ना वसे कधींही उच्च त्या गडावरी
उतर उतर ये खालिं सुंदरी. "

तुकारामानें मागे वळून आपले लाल डोळे मनोहरवर रोखले. दारूचा अंमल त्याच्यावर पूर्ण झाला होता. क्रोधानें त्याच्या गळ्याच्या व कपाळाच्या शिरा फुगल्या. कुऱ्हाड खालीं टेकून तीवर रेलून तो मनोहर कधीं जवळ येतो याची वाट पाहूं लागला. मनोहरच्या हातांत काय आहे याचा उमज पडण्यास त्याला थोडा वेळ लागला. त्याच्या हातांत भाला आहे असे त्याच्या डोक्यांत जेव्हां शिरले तेव्हां त्याने काळ्या कड्याची वाट सोडली.

मनोहर पुढे गाऊ लागला.

" उच्च ते वरी महाल, खोल या दऱ्या विशाल. "

" अ अ ऽ ऽ खाट् । अ अऽऽ खाट् ॥ " अशी गोड गळ्याची तान काळ्या कड्यावरून घुमू लागली. मनोहरने ताडले, लाडी कोयत्याच्या घावाच्या तालावर आपल्याला साथ देऊन वेडावीत आहे. मनोहर आपली शिकस्त करून लाडीपेक्षां उच्च गळा काढून गाऊं लागला. मनोहरची तान संपली कीं लाडी त्याहिपेक्षां उच्च स्वराने गळा फिरवून हट्टी कोकिळे-

प्रमाणें गोड आलाप घेई व त्याला वेडवण दाखवी. असे बराच वेळ चाललें. लाडी हरली नाहीं. पण त्याला लाडी कुठं दिसेना. त्याने आपले गाणे थाबवले व तो फॉरेस्टाच्या बुरजावर चढून पाहूं लागला. लाडीची रागदारी काळ्या कड्यावरून भैरव धबधब्याच्या घबडीतून व डोंगराच्या घळींतून घुमली. पण त्याला लाडीचा मागमूस कुठे दिसला नाहीं.

" लाडे, लाडे, लाडे ! " मनोहर, तिला डोंगरी साद घालू लागला. मनोहरच्या आवाजाच्या ध्वनिलहरी डोंगराच्या व आकाशाच्या पोकळींत अस्पष्ट होत गेल्या.

" कुहू " लाडीने उत्तर दिले. ते गोड गोड कुहू कड्याकड्यावर कप पावून मनोहरच्या हृदयात घुमले.

" लाडे, लाडे, लाडे ! " मनोहरनें पुन्हां हाक मारली.

" उहु कुहु कुक. " लाडीने उत्तर दिले व मनोहरला आपण समोर असून दिसत नाहीं म्हणून ती एक मोठी लकेर घेऊन हसूं लागली. तेव्हां कारवटाच्या खालच्या बाजूला पांढरीच्या जगलात एका हातांत कोयता घेऊन व दुसऱ्या हातात झाडाची फांदी धरून झाडावर चढलेली लाडी त्याला दिसली. प्राणवायूच्या पूर्ण श्वसनामुळें विस्तीर्ण झालेल्या तिच्या छातींतून व गोड गळ्यांतून हसण्याची लकेर खड न पडतां किती तरी वेळ चालली. मनोहर तिच्या रोखाने उतरू लागला. तेव्हा ती हसणें थाबवून डोंगरी उत्साहानें चकाकणाऱ्या आपल्या काळ्याभोर डोळ्यांची टक लावून मनोहरकडे पाहूं लागली. फाटी तोडतांना तिचे एक दोन कुरळ कपाळा-वर आले होते. श्रमानें तिच्या तोंडावर घर्मबिंदू मोत्यांच्या डवराप्रमाणे चमकले. प्रसन्नतेनें तिचे मुखकमल उमललें. मनोहर वेगानें खालीं उतरूं लागला. कारवीच्या उन्मादकारक पुष्पकोषांतून त्याला आपला मार्ग काढावा लागला. कारवीचे मधुपराग त्याच्या कोटाला चिकटले. लाडी फाटी तोडीत होती तिथे मनोहर आला. लाडी तिथें नव्हती. कारवीच्या जंगलांतून मुरडत नाहींशा होणाऱ्या रानभेकरीप्रमाणे ती नाहींशी झाली. मनोहर बावरलेल्या नजरेने तिला इकडे तिकडे शोधूं लागला. तेव्हां पिकलेल्या दोन सुवासिक हिरड्याचीं फळे त्याच्या अगावर पडलीं.

वानरे असतील म्हणून त्याने वर पाहिले. कडा वेधणारी लाडी लाब लकेरीच्या हंसण्याच्या ताना घेत कडा चढत होती. मनोहर तिचे मागोमाग तो बिकट कडा चढण्याचा प्रयत्न करू लागला. परतु हात टेकून देखील त्याला वर चढणे मुष्कील झाले. खाली खोल दरी 'आ' पसरून बसली होती. वर काळा कडा डोक्यावर पडतो की काय असा लोंबला होता. भयाण उचीमुळे मनोहरचे डोळे गरगरा फिरले. लाडी मात्र सुट्या हाताने उड्या मारीत, कपारातून व कंगोऱ्यावरून श्रुतिमधुर आलाप घेत बेगुमान चालली. तिच्या आवाजात भयकर टीप होती. त्या हिरव्या दरींत काळ्या कड्यावरून सगीताचा झोत पडू लागला. खालून पाहिलें की काळ्या कड्यावर काळे कडे, तांबड्या दरडीवर तांबड्या दरडी, हिरव्या रानावर हिरवीं रानें महालासारखीं निळ्या आकाशापर्यंत लागून राहिलीं होतीं. तो पर्वत मयासुराच्या राजवाड्यासारखा दिसत होता व अनत प्रतिध्वनींमुळे असख्य गायिका त्या राजवाड्यांत हजेरी देत आहेत असें वाटले. लाडी खालीलप्रमाणे उच्च स्वरात गाऊं लागली :

" कर जोडुनि विनवितसे दशमुखातका ॥
बदरिफळे घ्या हि प्रार्थि शबरिकन्यका " ॥
घेउन करि वदत राम, "काय ही अशी ! ॥
पक्षिगणे चचुपुटे टोचिलीं जशीं ॥ "

" आम्ल कैक क्षार अशी भासली मला ॥
म्हणुनि शुद्ध दंति चाखिलीं मिं आपुल्या ॥ "
बघुन भाव सदय राम तोषला मनीं ॥
पाहुनिया शबरीची भक्तिभिल्लिणी ॥

गाणे म्हणत ती धबधब्याच्या धोधाणीजवळ आली. त्या वेळीं मनोहर कड्याच्या माथ्यावर आला. सागाचा एक प्रचंड वृक्ष धोधाणीचे पात्रावर धबधब्याच्या गायमुखांत आडवा पडला होता. खालीं खोल कडेलोट, वर कड्याची नीट भित, अंग चोरण्यास कुठे जागा नाहीं. लाडी मोकळ्या हाताने झाडाच्या सोटावरून परीच्या पावलाने सरळ चालत गेली. मनोहरला हे साहस करणें अशक्य होते. कुंठित होऊन तो तेथेच थबकला. दरीच्या

पलीकडे गेल्यावर लाडीने मागे वळून पाहिलें व मनोहरच्या फजितीमुळे तिने हंसण्याची एक लकेर मारली व मानेला हिसडा मारून तिच्याकडे येण्यास खुणावले. वन्य उन्मादानें ती धीट झाली होती. तिची दरींत दिसून येणारी लज्जायुक्त मर्यादा डोंगरी स्वातन्त्र्यामुळे उल्हासकारक व खेळकर झाली. तिने खूप खिजवले, पण मनोहर जागचा हालला नाहीं. मग ती रानात लांकडें तोडण्यास शिरली. मनोहर तेथेंच लपून तिची परत येण्याची वाट पाहूं लागला. त्याला वाटले लाडी त्या बाजूने परत येईल. पण थोडया वेळाने लाडी त्याला समोरच्या कड्यावरून सात पायऱ्यांनी उतरतांना दिसली. त्या वाटेचे नाव ' कवंत कडा. ' नांवावरून त्याच्या अवघडपणाची कल्पना येईल.

लाडीच्या डोक्यावर लाकडांची मोळी होती व कडयाच्या अगाला अंग न लावता किंवा कड्यांच्या बाहेर तोल जाऊ न देतां निसणीसारख्या अवघड पायऱ्यांवरून उजाळलेल्या संधिप्रकाशांत अस्मान-ताऱ्याप्रमाणें ती खालीं उतरत होती. तिला मांड्या पिळून व डोक्यावरचें वजन सावरून उतरावे लागत होतें. तिच्या मांडींतील आणि पोटरींतील मासल व नाजुक स्नायू तिला सावरण्याकरितां पराकाष्ठा करीत होते. रोज तोल सावरण्याच्या सरावाने आधींच सुदर बनलेले तिचें शरीर या वेळीं कमालीचें सुंदर दिसत होतें. मृत्यूच्या त्या जबड्यातून उतरताना तिच्या देहाच्या अणूरेणूंनीं तोलावर एकाग्रता केली होती. एक पाऊल चुकले असते किवा अंग कड्याला लागले असते तर ती दरींत कोसळली असती. क्षणभर मनोहरच्या हृदयाचे ठोके थाबले. पायऱ्या उतरून जेव्हां ती कड्याच्या धशीला लागली तेव्हा मनोहरचा जीव खालीं पडला.

मनोहरला कोडे पडलें कीं लाडीच्या मनांत आहे तरी काय ? रोज आपणांस मोह पाडणारी लाडी आज पळून कां गेली ? मृगजलात मृगाची शिकार करण्याची विद्या या गिरिबालेने कुठें पैदा केली ? कां ही प्रीतीची डोंगरी रीत आहे ? मनोहर खजील झाला.

कारवीच्या उन्मत्त सुगंधानें वातावरण भरून गेलें. जसजशी संध्याकाळ होत चालली तसतसा सुवासाचा जोर वाढला. सुगंधाच्या वणव्यानें रान-डोंगर पेटले. काळ-दरी होरपळून निघाली. सुगंधाच्या उठावानें मनोहरचा जीव गुदमरला. तो घरीं जाण्याकरितां घाईनें डोंगर उतरूं लागला. त्याला

वाटले सात पायऱ्यांची वाट पायऱ्याच्या खोड्यात काळ्या कड्याच्या वाटेला मिळते तेथे लाडी उतरेल व आपण तिला पकडू. म्हणून तो तेथे गेला तो त्याला घोडीवर बसून मुकुट पावा वाजवितांना दिसला.

पाव्याची रागदारी सुगंधात मिसळून काळ-दरीला प्रणयमधुर बनवू लागली. त्यांतून लाडीच्या हंसण्याची लकेर मधून मधून संध्याकाळच्या सावल्यांनीं अंधरलेलें रान दुमदुमवी. मनोहरने पायऱ्याच्या खोड्याची वाट सोडली व गांवाची धरली.

लाडी त्याच्या डोक्यात सारखी घोळत होती. कोणाची ही लाडी? आपली कां मुकुटची? लाडी सुंदर आहे, प्रणयनिर्भर आहे. पण आपले शील सोडून आपण तिच्या मागे कां जावे? आपणास एवढा संयम करता येणार नाहीं? लाडीनें आपणांस फसवून गावात ओरड केली तर आपली काय स्थिति होईल? असे सुविचार त्याच्या डोक्यातून गेले.

परंतु कारवीचा सुगध लाडीइतकाच त्याचा पाठपुरावा करीत होता. तो त्याच्या अनुरागाच्या विचाराना चालना देत होता. खलार्टीत कारवीच्या सुगधाने भाताच्या सुवासाला नामोहरम केले होतें. शिवाय त्याच्या कोटाला चिकटलेले कारवीचे पराग जवळून त्याचेवर मारा करीत होते ते निराळेच!

मागल्याप्रमाणें आजहि केसूताल्या त्याला गांवाच्या पांदणीवर भेटले व त्यांनीं गर्भित अर्थानें खाकरून 'अं हं' केले.

* * *

"दादा, तू कारवीच्या जंगलांत गेला होतास?" त्याला सुभद्रेचा पहिला प्रश्न आला.

"हो." मनोहरने आवंढा गिळून उत्तर दिले.

"दादा, तुम्ही काळ्या कड्यावर गेलतां? कडा वेघताना मी तुमांला खोडयांतून पाह्यलं."

"दादा, वाघ आलाय ड्हाण्या त्या बाजूला. माणसाच्या अंगावर येतो धावून." जेवण झाल्यावर मनोहरचे पाय चेपतांना अंधूने वाघाच्या गोष्टी काढल्या. त्या वेळीं तो मनोहरचा चेहरा बारकाईनें पाहत होता.

फिरण्याच्या श्रमाने मनोहरला लवकर झोप आली. त्याने अंगावर रग ओढून घेतला. पलगावर पडल्या पडल्या शेजारच्या खिडकींतून काळा कडा दैत्यासारखा अंधारात उभा असलेला दिसत होता. दक्षिणायनी लाब रात्रींचा काळोख त्याच्या पायथ्याच्या रानांतून दाटला होता. माथ्यावर कारवीच्या सुगधाच्या कहरांत कृत्तिकांचा घोस पोह्याच्या गवताच्या तुऱ्याप्रमाणे चमकत होता.

सराईच्या स्वच्छ आकाशात, रम्य शांततेत, चादण्याचा चमचमाट चालला होता. कापलेलीं भाते राखण्यास गेलेले शेतकरी कडपे चोरण्यास आलेल्या कल्पित कातोड्याचे अंगावर ‘ चोर चोर ’ म्हणून ओरडत उगाच गोगाट करीत होते. मधून मधून डुकरांना भीति दाखविण्याकरितां शेतातून उखळीबार होत होते.

तात्यांच्या घरात परोचे, तोडचे हिशेब, अकरकी-एकोत्री संपून कुत्र्याला इंग्रजींत काय म्हणतात ‘ डॉग ’, पाण्याला काय म्हणतात ‘ वाटर ’, हे सुरू झाले होते. विनोबानी डिट्मारचा दिवा लावून रॅव रॅंव करून एम्.ए.चा अभ्यास सुरू केला होता. त्याची मनोहरला इतकी चीड आली होती कीं, त्या दिवशीं गणेशचतुर्थी असती तर त्याने एका दगडांत विनोबाचा दिवा फोडून टाकला असता.

काळ्या कड्याखेरीज इतर डोगरांचे माथ्यावरील कारवीचे सुगध कहर करून एकामागे एक असे खालीं उतरू लागले. त्या सुगंधमय गुगीत मनोहरला झोप लागली व त्या झोंपेत त्याला सुगंधमय स्वप्ने पडूं लागलीं.

## प्रकरण ८ वें

# कवळा अन् राजा जेवला

वसूबारसेचे दिवशी धवा आणि इतर ठाकूर कानात झेडूची फुले घालून दिवाळीचे पोस्त मागण्यास आले.

" वाघ्या र वाघ्या, वाघ्या राखो तुमची गाय गुरं "

ठाकरानी आरोळी ठोकली. मग त्यांनी वाड्यातील जनावराना ओवाळलें. बाप्पाजींनीं त्यांना दिवाळीचें पोस्त आणि फराळाचे दिलें. शिवाय पोहे, तळलेली बोरें आणि प्रत्येकी आधोली आधोली भात दिले. ठाकूर घोंगड्या टाकून विसाव्याला बसले.

" धवा, रानाला वाघ आला अन् जनावर दगावलं तर भरून घेईन हो भात. " हसत हसत बाप्पाजींनीं विनोद केला.

" बाप्पा आपली वाघजाई पाठीराखी आहे. आपल्या रानाला जनावर कधीं दगावायच नाहीं." धवाने बाप्पाजींची खातरजमा केली.

" पण काय रे धवा, माझी नाचणी नाय घातलीस ? "

" समद्याच्या नाचणीच एकदम माप करूं उद्या. म्हणज आम्ही टाकर खाली वाहून आणू एकदम. "

" मनोहर, उद्या ठाकूरवाडींत जा आणि नाचणी मापून घे. तुला तरी कळल पाहिजे ठाकूरवाडी म्हणजे काय आहे ती ! "

दुसरे दिवशी सकाळी मनोहर ठाकूरवाडींत गेला. ठाकूरवाडी अर्ध्या डोंगराचे उतरणीवर बसली होती. कष्टाळू ठाकरांनीं परड्यातून खूप भाजीपाला लावला होता. कोनफळांचे हिरवे गर्द ताणे त्यांनीं कठड्यावरून चढवले होते, त्यांचे हिरवे कोन बनले होते. त्या पानाच्या डोलाऱ्यांतून झेडूची फुले शोभिवंत दिसत होतीं. माळाच्या उतारावर ठाकरांनीं नागलीवरीची दळीं केलीं होतीं. नाचणीचीं बोंडे व वरीचे तुरे वाऱ्यात हालत होते. डोंगरातील ववळींना लावलेल्या मुऱ्ह्याच्या मळ्या घेऊन ठाकूर परत येत होते. ह्या मुऱ्ह्या व परड्यांतील भाजीपाला जेव्हां ठाकरिणी खालीं गावात जाऊन विकतील व त्याचा कणी-कोंडा विकत घेतील तेव्हां त्यांना जेवण मिळणार. धवा ठाकरानें मनोहरला झोपडींत बोलावलें.

" मनुदादा, तुमच्या नाचण्या घेऊन जा. सबंध भाद्व्याचा उपास काढून पोर खावखावलीं आहेत. उद्यां बायकानी आंबील करुन खपवल्या तर तुम्हाला कोठून घाल ? मग मोठेबाबा म्हणतील धवा लबाड आहे."

धवाने नाचणीची कणग जमिनीवर ओतली. त्याने नाचणीचे अंदाजानें तीन वांटे केले.

" हा घ्या तुमचा तिजाईचा वाटा ! अन् या टोपलीने मी टोपलीभर नाचणी कर्जाऊ आणली त्याची ही घ्या दिढी. "

धवाने दीड टोपलीपेक्षा नाचणी थोडी जास्तच भरली. माप भरपूर झाले नाहीं असे मनोहरने म्हणू नये याकरिता त्याने दोन पसे नाचणी अधिक टाकली व ती त्याने एका मोठ्या टोपलीत भरली. मनोहरला द्याव-याच्या नाचणीपैकीं एक दाणासुद्धां त्याने जमिनीवर ठेवला नाहीं.

" अरे, आम्हाला तू सर्व नाचणी घातलीस. आता तुला काय राहिली?"

होतील कशा तरी पाच सहा आधोल्या. पुष्किळ झाल्या." समाधानाचें हास्य त्याचे तोडावर पसरले होते. "यातल्या निम्या आता दळू अन् निम्या ठेवूं भादव्या काळाला. फाटीमंजुऱ्यावर चालवूं कणीकोंडा कसा तरी."

" आणि तादुळाचं कसं करता ? "

" ठाकराला मिळतात तादूळ ! त्याच्या बाला माहीत नाहींत तांदूळ."

" येव्हढी सराई पिकली आणि तुम्ही तादूळ खात नाहीं ? कातोड-वाडींत तर सारख मुसळ चालू आहे."

" दादा, ते कातोडी आहेत. त्यांच्या पांचवीला ते चोरीचीं लोबटं पुजतात. आम्ही ठाकूर मान कापली तरी खोटं काम करणार नाहीं; खोटं बोलणार नाहीं. सराई कातोडी, मराठे, इनामदार यांची पिकली, कीड-मुगी, पाखर याची सराई पिकली; आमची नाय पिकली.

इतक्यांत धवाची बायको धवी चिंचेच्या पानासारखीं पानें असलेलें पिवळ्या फुलाचें गवत घेऊन झोपडींत वांकून शिरली. भादव्या काळात भुकेच्या वेदनानीं त्रास होऊं नये म्हणून लुगड्याने आवळून बांधलेल्या तिच्या पोटावर लुगड्याच्या बांधण्यामुळें असंख्य चुण्या उमटल्या होत्या. त्याचप्रमाणें तिच्या तोडावर व कपाळावर किती तरी रेघा पडल्या होत्या. जितक्या रेघा तितके तरी भादव्याचे महिने तिने उपासांचे काढले होते.

अशा दैन्यांत देखील तिच्या तोंडावरची प्रसन्नता किंवा हास्य मावळले नव्हते. मनोहरला पाहिल्याबरोबर तिची कळी आणखी खुलली. जशा कुशल चित्रकाराला रेघा मदत करतात तशा तिच्या तोंडावरच्या रेघा तिच्या भोळ्या हास्याला मदत करीत होत्या. तिचे हास्य त्या चिरम्यातून खुलत होते. मनोहरला तिने लहानपणापासून पाहिलेला ! तिला प्रेमाचं भरते कालें. तिने मनोहरची बला करून कानशिलावर बोटे मोडली व मोठ्या आईची व सुभद्रेची चौकशी केली.

" धवा, हे गवतरे कसले ?" मनोहरने विचारलं.

" दादा, हा तर ठाकरांचा भादव्यातला मैतर. हा मीठ घालून उकळवायाचा अन् नाचणीच्या आंबिलीबरोबर खायाचा. याच नाव कवळा."

" भर दिवाळीत हे गवत उकळून तुम्ही भूक मारतां ?"

" कवळा अन् राजा जेवला." धवा मोठ्याने हंसला.

" धवा, तू आज घरी ये, मी तुला मणभर भात देईन."

" नको, म्हातारा गागल."

" बाप्पाजी नसतांना ये. त्याची जबाबदारी माझ्यावर."

धवाने तोस्तान उघडले व त्यातून त्याने चकमक, तबाखू व कप काढून विडी पेटवली. त्या आनंदात समोरच्या डोंगराकडे पाहून तो विडीचे झुरके ओढूं लागला.

मनोहर सगळ्या ठाकरांचे माप घेऊन गावात आला.

दुपारी धवा ठाकूर भीतभीत भात नेण्याकरिता मनोहरकडे आला. त्याला भात देण्यास मनोहरने अधूला सांगितले. अंधू भिऊ लागला.

" मी नाय बा कणग्याला हात लावणार. मोठे बाबा आरडतील ?"

" अरे, त्याना काय कळणार आहे ?"

" मोठ्या बाबाना ! त्याना समद दिसतं डोळ मिटल का. तुमी काय बी करा. तिथं अकाल गुंग आहे."

रानसईतील लोकांचा असा समज होता की, बाप्पाजीना अंतरज्ञान आहे. पण तसे काही नव्हते. बाप्पाजीची प्रत्येक वस्तु मोजलेली असे. देवाकरितां काढलेली बागेचीं फुलेदेखील त्यांची मोजलेली असत. त्यातील कोणी दोन चार खुडली की, त्यांच्या हिशेबात फरक पडे व ते ओरडा करीत की कुणी फुले नेली ?

"मी बघ तुला मदत करतो. असा बेमालूम कणगा लावूं की बाप्पाजींना ओळखूं येणार नाही आणि जर त्यांनी ओळखलं तर मी सांगेन कीं मी भात दिल म्हणून."

"पण मोटे बाबा माझा काटा काढतील बा!" आता मात्र धवाला थरकाप सुटला.

ठाकरा-कातोड्याना बुंदीचे लाडू चारणारे बाप्पाजी क्रूर स्वभावाचे नव्हते. त्याची दया पोटात होती. त्याचे मूळचें दैवत शंभू महादेव तसा त्याचा स्वभाव होता. ते स्वभावाने भोळे होते, तरी कोपिष्ट होते. शंकराप्रमाणे त्याच्यात विरोधाभास होता. कपाळाला वैराग्याची विभूति तर डोक्यावर झुळझुळ गंगाजळ! गळ्यात शेषशाई तर माडीवर हिमनग कुमारी! कंठात हालाहल विष तर डोक्यावर अमृताची चंद्रकोर! मनोहरला हे माहीत होते. त्याने जबरदस्तीने धवाला मोटली बांधून दिली. मनोहरने कणगा जसाच्या तसा लावला, कुठं भाताचा दाणा पडू दिला नाही.

बाप्पाजी सकाळपासून समनागमनाच्या येथे जाऊन बसले होते ते परत आले. आल्याबरोबर त्यांचें कणग्याकडे लक्ष गेलें. ते सशयाने कणग्याजवळ थांबले. मग त्यांनीं कणग्यातील सागाचीं पाने उचकटून पाहिलीं. त्यानीं लगेच आरडाओरड करण्यास सुरुवात केली.

"अधू कणग्याला कुणीं हात लावला होता?"

अंधू गर्भगळीत झाला.

"नाय बा मी तर हाथच हाय. कणग्याला हात कोण लावील!"

बाप्पाजींनीं पुन्हा पाने तपासली. त्यानी उत्तरेकडे देठ करून दहा, पूर्वेकडे देठ करून पंधरा, दक्षिणेकडे देठ करून वीस व पश्चिमेकडे देठ करून दहा अशी पाने लावलीं होती. ती त्यांची खूण विसकटली होती. मनोहर व अधू याना ही खुबी माहीत नव्हती. बाप्पाजी पानांकडे थोडा वेळ पाहत राहिले व उद्गारले,

"छुट्, कणगा उघडला होता. भात चोरीस गेल. मणभर भाताला फटका बसला."

मनोहर व अधू आश्चर्यचकित झाले. बाप्पाजीचा अदाज अचुक असे. देवापुढे ते डोळे मिटून बसले व बाहेर भाताचा भारा कुणी सोडावयास

आले तर झोडणीच्या पहिल्या फटक्याला जे भात खळखळ आवाज करून पडे, त्यावरून भाऱ्याला उतारा किती होईल हे ते अचुक सांगत. त्यांचे डोळे व कान इतके तीक्ष्ण होते.

बाप्पाजी जेव्हां फारच ओरडा करूं लागले तेव्हां मनोहरने आपण भवाला भात दिल्याचें सांगितलें.

" मनोहर, या ठाकराजवळ नाही शेतना-पोत. हा भाताची दिढी चालणार कसा ? "

" बाप्पाजी, त्याला एक लहानसं शेत द्या ना. "

" शेत द्या या ठाकरांना ! लाकडाच्या कुदळीने वरी नागली करणारे हे आडमुठे ! ह्याना नागर कसा असतो ते माहीत नाही, तर हे हाकणार कुठून ? उद्यां देवाने नड सांगितली, नाहीतर ढेकूण, पिसा झाल्याचे निमित्त करून हे झोपड्यांना आगी लावून दुसरीकडं राह्यला जाणार. त्यांचा नेम काय ? "

" पण बाप्पाजी, कानोडी खलाटींतील सराईच भात कुटून खात आहेत. अन् ठाकूर कवळ्याच्या भाजीवर उपासमार काढीत आहेत. मी आज प्रत्यक्ष पाहिल. "

" उपाशी राहतील कवळ्याच्या जीवावर अन् उलट अभिमानानें म्हणतील ' कवळा अन् राजा जेवला. ' त्याला आपण कांय करणार ! आपल्याला कोण मोडतो ? माझ्या गळ्याला तात कशी लागली आहे हे पाहतोस ना ? मनोहर आपण सगळ्याची कींव करावयाची, पण आपली कोण करणार ? धवाचे एक मण भातानें काय होईल ? दे त्याला दोन तीन मण आणि त्याला सांग ठाकुरवाडीखालच्या बेदा यंदापासून तूं कर. अंधू, आपले बैल त्याला नांगरकीला दे आणि मुंडी गाय अर्धलीनें त्याच्याकडे राखोळीला घाल. "

## प्रकरण ९ वें

# राजपाटीची कापणी

दिवाळीमुळे राजपाटीची कापील लाबली. शिवाय अद्याप भात हिरवे होते. बाप्पाजीऐवजीं आज मनोहर राजपाटीच्या कापणीवर देखरेख करीत होता. राजपाटीवर सकाळ-मध्याकाळ हेलपाटे घालणारे बाप्पाजी हल्लीं क्वचितच शेतावर जात. त्याच्या मनोहरने त्याचे ओझे घेतले होते. सकाळच्या प्रहरीं जेव्हा गडी आणि बायका पाटीत शिरल्या तेव्हा अधू गणू पहाटचाऱ्याला नेलेलीं गुरं दाडाने चारीत चारीत मनोहरकडे आला. कारण त्याची राही कापणीच्या कामावर होती. राजपाटी माणसानीं भरून गजबजली होती. त्यात मुकुट आणि लाडी पण होते. त्यांनी शेजारींशेजारीं पाती धरल्या व पात पुढ कोण नेतो म्हणून त्याची चढाओढ लागली. लाडी मुकुटच्या आडोशाला इतकी बेमालूम लपे की, मनोहरला पुष्कळ वेळा तिचा भातात मागमूस लागत नसे. कापणीच्या घाईत सुद्धा ती मुकुटचा डोळा चुकवून मनोहरकडे दृष्टिक्षेप करी.

सोळा पाजवलेले विळे भाताच्या चुडातून खास खास आवाज करू लागले. त्याच्या पुढे भाताच्या पाती माना टाकतील नाहींतर काय करतील? काळ्या कड्यावर सूर्य आला तसा विळ्याचा चमचमाट वाढला. भातावरचें दहिवर उडाले. कापणाऱ्याचे गप्पाविनोद सुरू झाले. लाडीच्या हसण्याच्या लकेरी ऐकू येऊं लागल्या.

"दादा, आपली ताबू गाय पहाटेची व्याली." अधूला मनोहरकड यायला ही चागलीच सबब होती.

"काय घातल रे?"

"गोऱ्हा! गजा हरकुड्याची अन् माझी पैज लागली आहे. तो म्हणतो वासराचा रग ताबडाच राहील अन् मी म्हणतो दवळा व्हईल. जत्रेत त्याच्या बाला तमाखूची डबी सोडणार नाहीं ऐन्याच्या झाकणाची!" अधूची नजर राहीवर सारखी खिळून होती.

" ते राहू दे. मोहतुराची सुपारी कधी फुटणार ? " हलक्या आवाजात मनोहरने विचारले.

" दादा, कोपरबलासाचे गोट मागते, पुतल्या मागते अन् येला मागते. त्याबिगर बोलायला राजी नाही ती. मराई निगृतच पिकली हाय बाप्पाजीजवळ कशी गोरट कारायची ? पन आवदा सोरनार नाय. अधूने एक निश्वास टाकला व पालवा बाधावर आपटला.

" अधू, पण म्हातारपणी कशाला या फदात पडतोस ? "

" दादा, मी मेलो म्हज मला पानी कोन पाजील अन् काव काव कोन करील ? नशीबांत असला तर होईल मुलगा बाळगा. "

मनोहरने एकदा लाडीकडे आणि एकदा राहीकडे दृष्टि फिरवली व तो गालातल्या गालांत हसला. अधू ओशाळला. मग बोलण बदलण्याकरता त्याने बैलाच्या गोष्टी सुरू केल्या.

" दादा, आपल्या बैलाना रगीत शिगदोऱ्या पाहिजेत. येवढी केस् तात्याची ऐट नको. "

" तात्यांचा काज्या आता चागला तयार झाला आहे. आपल्या बड्याशी जोड होईल त्याची ? "

" हाथ् त्याला वाघानं खाल्ला ! तो काय बड्याची जोड करील ? राहू द्या. तात्या त्याच्या शिंगाला माती लावतात. त्यान का बैल झोंबी खेळतो ? दमऱ्याच्या दिवशी केसूतात्यानी मारे दोन काढण्या लावून बैल गोठणीवर आरडाओरडा करीत आनला, कीं बाजूला व्हा, बैल मारील. लोक म्हणू लागले कीं काज्या झोंबी जिंतणार. अन् जव्हा बंड्यानं डरकाळी फोडली तव्हा लागला पळायाला. बंड्यानं धावत जाऊन त्याला आडवा पाडला अन् मग कांहीं केल्या बड्या काज्याला सोरीना. काज्या गोंगावला. लोक म्हणाले बैल मरतो. अधू, झोंबी सोरीव. तवा मीं झोंबी मोरवली. बैल कस तयार करायच अन् झोंब्या कश्या लावायाच्या, ही इद्या फकास्त अधूलाच माहीत. दुसऱ्याला नाय ! त्या तात्याला म्हणाव मेलाम तरी म्होरल्या जल्मीं नाय यायची तुला. "

" अंधू, काय तुझी विद्या तरी काय आहे ती सांग आम्हाला. " मनोहर खेडेगावांतील गुराढोरांच्या गोष्टीशीं तन्मय होऊन विचारू लागला.

अंधूने सगळीकडे बारीक नजरेने पाहिले व कोणी जवळपास ऐकायला नाही अशी खात्री करून घेतली, तेव्हां तो बारीक आवाजात बोलूं लागला.

" दादा, सांगणार नाय ना कुनाला ? "

" नाही रे. "

" दादा, बाप्पाजींना माहीत नाय. रोज मी तोळा तोळा गाजा चारतों बैलांना पदरचा. तवा बैलाटं तय्यार राहतात. बघा त्यांचं डोळे कशे मस्त हैती. उगाच नाय नांवाचा अधू ! "

मनोहरने लाडीसारखी हंसण्याची एक लांबलचक तान मारली. वांकून कापणारे लोक कापणी थांबवून एका हातात विळा व एका हातांत कापलेला चूड घेऊन शेतात उभे राहिले व आश्चर्याने पाठीमागे वळून मनोहरकडे पाहूं लागले. कारण अद्यापपर्यंत मनोहरचे व अधूचे पाटीच्या बाधावर हळूहळू बोलणे चालले होते. आतां एकदम काय झालें हें त्यांना कळेना. या सर्व प्रकारानें अंधू पण गोंधळला. पण त्याची राही जेव्हां त्याच्याकडे पाहूं लागली तेव्हां मात्र त्याची फारच तिरपिट उडाली. तो गुरे वळवून नेण्याच्या निमित्तानें जनावरांच्या अंगावर ओरडूं लागला. त्याने जनावरांमागे पळतां पळतां मनोहरला बजावलें—

" दादा, शिगदोऱ्याची गोस्ट ध्यानांत ठेवा. अन् माझ्या बैलांना दृष्टमण्यांची माळ होवी हो. मी बऱ्हाऱ्याकडं पाहून ठेवलीय. आणाल ना ?"

" आणीन. " मनोहरने वचन दिले.

" अन् दसऱ्याला अन् बेंद्याला तोड्याच्या माळा गळयात अन् शिंगांना टोपणं. काय त्यांचीं शिगं हायती सोभिवंत ! "

" आणीन, आणीन. "

" अन् पायांत तोडे ? "

" अंधू, तुझी यादी लांबत चालली. "

" माझीं बैलाटं तशींच हायती गुनाची. हो, हो, थोब, थोब. पवळ्या, पवळ्या !" अंधू जनावरांमागे पळत लांब लांब जाऊं लागला.

" दादा, बेगुन ध्या. जत्रेला व्होवं. एकच जोड हाय. नाहीं तर ताल्या घेईल. " अंधू आरोळ्या मारीत मारीत दांडाने गुरे घेऊन निघून गेला.

काहीं तरी निमित्त काढून थोडा वेळ विसावा घेणारे कामकरी पुन्हा वांकले. अधूची बैलांची कांहीं तरी भानगड आहे एवढे कळल्यावर त्यांचे कुतूहल नाहींसें झाले. इतक्यात न्याहरी आली.

राजसबाईनीं मनोहरचें फराळाचें व चांदीच्या गडूत चहा पाठवला.

सगळ्याच्या बरोबर मनोहरने न्याहरी केली. त्यानें आपले जिन्नस कामकऱ्यांना थोडेथोडे वांटून दिले. नंतर कोणी झऱ्यावर पाणी पिण्यास गेले, तर कोणी विड्या ओढीत बसले. ही संधि साधून राही मनोहरकडे आली.

" दादा, याचा बदोबस्त तुम्ही लावा. मी रांडमुंड बाई. मला काहीं अब्रू हाय का नाय? तुमचा गडी सदान्‌कदा माझ्या मागं येतो. मी इरीवर गेलें, हायीच माझ्या मागं. शेताला गेले, हायच मागं. इथं उभा. तिथं उभा. लावण्या म्हणतो. डोळे मोरतो. मला बोलावतो. मी म्हनतें मी बिनअब्रूची नाय. रीतीनं तूं बामन बोलीव. चार मंडली जमीव. म्होतुर लाव. दादा, यांत माझी कांहीं गैर गोस्ट हाय?" राही कांगाव करूं लागली. तो विरोधी प्रीतीचा आहे हें मनोहर कळून चुकला.

" सागेन मी त्याला." मनोहरनें आश्वासन दिले.

सूर्य माथ्यावर येऊं लागला. कडपावरचें दहिवर नाहींसें झालें. त्याऐवजी कृषिकर्मांच्या घामाने भात भिजूं लागलें. खालीं शेतात पाणी तापलें आणि वर उन्हाचा ताप. त्रासलेले कामकरी सपासप भात कापूं लागले. सराईची रनाळी दरीदरींत लहरी मारूं लागली. त्या स्वच्छ प्रकाशांत लांबवरची गवताची काडीन्‌ काडी अन्‌ पानन्‌ पान स्पष्ट दिसत होतें. ऊन, स्वच्छ हवा व भूक यांमुळे मनोहरला बाधावर ऐनाच्या सावलीत एक प्रकारची तंद्री आली. त्या तंद्रीत शेताच्या मध्यभागीं लाडीचें तोंड भाताच्या लोंबरांतून कमळाप्रमाणे दिसत होतें.

दुपारचें जेवण आले. जमिनींत खड्डे करून त्यांत करमेळाचीं पानें बसविलीं. त्या पानांत गड्यांनीं जेवण वाढून घेतलें. राजसबाईनीं मडकंभर गोड ताक पाठवलें होतें. तें पाहून सर्वांचीं तोंडें प्रफुल्लित झालीं. लाडीनें परड्यांतील काकड्या आणल्या होत्या. जेवणानें तृप्त झाल्यावर ताक आणि काकड्या यांनीं सर्वजणांना गारीगार केलें. नंतर मनोहर जेवणाकरितां घरीं गेला.

सूर्य धारईवर कलला, तेव्हा मनोहर शेतावर परत आला. कापणी जोराने चालली होती. कापताना कुणाला सशाची पोर, पाणकोंबडीची अंडी. लाव्हरीची पिलें सापडलीं. एका ठाकराला एक कासव सापडले. इतक्यांत विळ्याने लाडीची करंगळी कापली व तिचे लालभडक रक्त घळघळा वाहू लागले. मुकुटने धावत जाऊन रामबाणाचे कणीस आणले व त्याचा कापूस जखमेवर लावला. मनोहरने आपल्या पांढऱ्या स्वच्छ रुमालाने लाडीची जखम बांधली. रुमालाला लव्हेंडरचा वास येत होता. लाडी प्रेमाने तो वास घेऊं लागली तेव्हां मुकुट वैषम्यानें तिच्याकडे पाहू लागला. मनोहरने लाडीला बांधावर जाऊन बसायला सांगितलं

चार वाजता वाळवलेल्या भाताचे भारे बांधण्याचे व ते वाहून खळ्यावर रचण्याचे काम सुरू झालं. भारे वाहताना भाताच्या लोंब्या चटाचट तडकून उडत व बायका त्या टिपून ओच्यात ठेवीत. या टिपण्याला सर्वा करणं असे म्हणतात. लाडी मोकळी असल्यामुळे तिने पुष्कळ सर्वा केला होता. भारे वाहण्याचे काम सुरु झाले तेव्हा बाप्पाजींनीं अंधूला शेतावर पाठवलें.

" सर्वा कुणी करायचा नाय. लाडे ठेव त्या लोंब्या. " अंधूने आरोळी दिली व तो अधिकारयुक्त नजरेने राहीकडे पाहूं लागला.

लाडीने आपले कमलाक्ष मनोहरकडे फिरवले.

" अंधू, लाडीचं बोट कापलंय. मीच तिला सर्वा करायला सांगितलं आहे. "

लाडी खुदकन् हसली व सर्वा करू लागली. संध्याकाळच्या आडव्या उन्हात दाणे टिपणारी ती पोरगी कुणी अप्सरा कीं वनदेवता करमणुकी-करिता शेतांत शिरल्यासारखी दिसत होती. सध्याकाळ झाली तसे कारवीचे पराग दरवळूं लागले. कापणीचें काम थांबले. नंतर एकाच पाऊलवाटेनें मनोहर व लाडी गांवांत परत आले. लाडी पुढें चालली होती. मनोहर तिच्या मागून येत होता. मुकुट दुसऱ्या वाटेनें निघून गेला.

बाप्पाजींनीं मनोहरचे अंगणांत स्वागत केले.

" किती भारे सापडले ? "

" अर्धी कापिल झाली. तीनशें भारा मिळाला. " उभ्या आयुष्यात बाप्पाजीना आजच विसावा मिळाला.

## प्रकरण १० वें

# झुंज

अगदी सकाळीं मनोहर आणि मुकुट नदींत कुस्तीकरिता मऊ वाळूची जागा शोधीत होते. आधल्या दिवशीं रात्रीं त्यानी लढत करण्याचें ठरवले होतें. ही गोष्ट बाहेर कशी फुटली कुणास माहीत! मनोहर व मुकुट यानीं लगोट कसले तेव्हा पहाटच्याऱ्याला गेलेले गव्हारी, किनाऱ्यावरून मासे घेऊन आलेले कातोडी आणि इतर शेतकरी तेथे जमा होऊं लागले. लाडी देखील गुरे हाकलण्याच्या पालवावर रेलून, आपला कळप थोपवून उभी राहिली. तिच्या खालच्या बाजूला अंकुशान् भिवरी बसली होती. काठा-वरच्या लोकाचे प्रतिबिंब खालच्या डोहात उमटले होतें.

मुकुट मनोहरचे प्रथम पाया पडला. मग तो कुस्तीला उभा राहिला. मुकुटच्या अंगावरची सोनेरी लव तर मनोहरची गुलाबी नाजुक कातडी सकाळच्या उन्हांत चमकत होती. पहिली सलामी झाली. धिप्पाड मुकुटने मनोहरचें मनगट पकडून त्याला हिसडा मारून आपल्याकडे खेचले. त्या बरोबर मनोहर चपळाईनें हुशीसरसा मुकुटच्या पाठीवर गेला व त्याने असा काहीं पेच लढवला की त्याबरोबर मुकुट गुढग्यावर आला. त्या क्षणीं मनोहरने कुस्ती सोडली. मुकुटचे डोळ्यात रक्त चढले होतें. त्याने घसावर उभ्या असलेल्या लाडीकडे पाहिलें अन् तो म्हणाला,

" कुस्ती सोडलीशी ? पुन्हा होऊं द्या. "

" मुकुट, इथं सगळी जाडी रेती आहे. आपण तांबडमातीचा हौदा करून मग लढूं. नाहीं तर ढोपरं-कोपरं फुटतील. "

" आम्ही तुमच्यासारखे नाजुक नाय. न्यारीला असले दगड खातो आम्ही ! "

पुन्हां कुस्ती उभी राहिली. सलामी झाली. पुन्हा मुकुटने मनोहरला कव घातली. मनोहरनें पट काढला व तो पुन्हा मुकुटच्या पाठीवर गेला व त्यानें मुकुटला पेंचांत खालीं आणले व स्वारी भरली. त्याच वेळीं मनोहर

मुकुटच्या ढोपराची स्थिति पाहत होता. मुकुटचें ढोपर स्वारीनें फुटून रक्तबबाळ होऊं लागले. मुकुट त्या वेदना निमूटपणे सहन करीत होता. या खेपेला देखील मनोहरने कुस्ती सोडली व तो उठून उभा राहिला. मुकुट रागाने ओरडला !

" दादा, हे काम खरं नाय. मर्दाची कुस्ती होऊ द्या. डोकं फुटलं तर मी तयार हाय. चितपट झाल्याबिगार मी कबूल नाय करणार. "

" मुकुट, मी चुरशीची कुस्ती खेळायला आलो नाहीं. आपण फक्त ताकद अजमावण्याकरिता आलों आहोंत."

" नाहीं दादा, चितपट होऊ द्या. " लोक ओरडूं लागले.

पुन्हा कुस्ती उभी राहिली. सलामी झाली. या खेपेला दोघेजण समोरासमोर भिडले व एकमेकाना रेटूं लागले. कोणी कुणास ऐकेना. इतक्यात बगल मारून मनोहर चपळाईनें मुकुटच्या पाठीवर गेला. प्रतिपक्ष्याच्या पाठीवर चपळाईने जाणे हे मनोहरच्या कुस्तीचे वैशिष्ट्य होतें. आता मुकुट आडदांडपणाची कुस्ती सोडून सावधपणाने खेळूं लागला. मनोहरनें त्याला मागून पकडले होते तरी तो त्याला टांग मारू देईना किंवा पेंच लढवूं देईना. अखेर मनोहरनें त्याला थकवण्याचा डाव सुरू केला. मुकुट दमात कमी पडूं लागला. तेव्हां मनोहरने पुन्हां पेच घातला व मुकुटला खालीं आणले. खाली येतां येता मुकुटने त्वेषानें आपली सर्व शक्ति एकवटली व असामान्य बळ खर्च करून एखाद्या कोकराला वर उचलावें असे त्याला उचलले व डोकीच्या वर नेलें. सर्वांना वाटले मनोहरचा मोधळा आपटून मुकुट त्याची हाडें मोडणार. हें दृश्य पाहून सर्व लोक हाहाःकार करून ओरडले. परंतु मनोहरनें चपळाईनें मलखांबाची उडी केली व तो पुन्हां मुकुटच्या पाठीवर आला. तेव्हां मुकुट फार चिडला. त्याला खालीं आणण्यास मनोहरला वेळ लागला नाहीं. परंतु खालीं आल्यावर मुकुट भलतीच चिकाटी दाखवूं लागला. काहीं केल्या तो जमीन सोडीना. मुकुटची व मनोहरची खूप झटापट झाली. एकदां मुकुटने मनोहरला खालीं आणलें. ही संधि साधून मनोहरने मुकुटला धोबीपछाड मारला व मुकुटला फेकलें. आतां मनोहर मुकुटला चितपट करणार तों मुकुटनें पुन्हां कुस्ती सावरली व जमीन पकडली. कुस्तीला पुन्हां जोर चढला. दोघे गडी दोन-

चार वेळा उलथेपालथे झाले, गरगरा फिरले, तरी कुस्ती पुरी झाली नाहीं. या भानगडीत मनोहरच्या कपाळाला खरचटलें व गालावर ओरखडं निघाले. मुकुटचें ढोपर-कोपर अन् सर्व अंग खरचटून रक्तबंबाळ झालें. तेव्हां लाडी घाबरून ओरडत खालीं आली.

"दादा, सोडा सोडा. तुमच्या पायां पडतें, सोडा. तुम्हा दोघांच रगत निघाल. सोडा."

"चला, सोडा, बराबरी झाली." लोक ओरडूं लागले.

"नाय नाय, दादा जितले." अंकुशा अन् भिवरी ओरडली.

त्याच वेळीं तुकाराम फॉरेस्टर व केसूतात्या अचानक तेथें आले. ते कातकऱ्यांकडे रागानें पाहूं लागले.

"मुकुट, कुस्ती पुरी होऊ दे." तुकाराम ओरडला.

"पुरी झाली पाहिजे. ह, हंः!" लाडीकडे पाहत केसूतात्या पुटपुटले.

मनोहरला खाद्यांना धरून लाडीनें ओढून काढलें. तेव्हा मनोहरने कुस्ती सोडली. तो उठून उभा राहिला. थकलेला मुकुट वाळूतच बसला.

मनोहर म्हणाला, "मुकुट, छान लढलास. बराबरी झाली."

"नाय, दादानीं कुस्ती जितली." मुकुटने पराजय कबूल केला.

"मुकुट, तुझी कुस्ती रांगडी आहे. नाही तर तूं मला पाडलं असतंस."

नदीच्या पाण्याने कपाळाची जखम धूत मनोहर मुकुटचें प्रोत्साहनपर सांत्वन करूं लागला.

दरम्यान लाडीने लुगड्याचा पदर भिजवून आणला व तिने मुकुटच्या जखमा धुण्यास सुरवात केली. तिनें क्षणाचा विचार न करता लुगड्याचा पदर फाडला व ती त्याच्या जखमा बांधू लागली.

"नाहीं दादा, मी सांगू मी कां हरलो?" लाडीकडे पाहत तो बोलला व बोलतांना थोडा थाबला. लाडी व इतर लोक मुकुटच्या पराजयाचें कारण ऐकण्यास उत्सुक झाले.

"दादा, तुम्ही बंदिस्त असता अन् आम्ही नसतो." त्यानें लाडीकडे रोखून पाहत हे उद्गार काढले.

लाडीच्या कपाळाची शीर ताठ झाली. परंतु तिने त्याच्या जखमा बांधण्याचें काम सोडलें नाहीं.

इतक्यांत अधू गणू आनदाने बेहोष होऊन पिसाटासारखा धांवत आला.

" दादा दादा, बेगी बेगी चला. लई गमत हाय. काज्याच अन बंड्याचं झोंबाट लागलंय."

सर्व लोक अधूच्या मागे धांवले. मनोहर पण तिकडेच निघाला. नदीच्या पात्रात बंड्या काज्याच्या कुसाडावर ढोसण्या मारून, केरूतात्यानीं काज्याला किती खुराक चारला ते तपासून पाहत होता. गुराख्याची इतर जनावरे कळप करून बाजूला उभीं होतीं. त्यातील अडील गोऱ्हे डरकाळ्या फोडून शिंगात शिंगे अडकावूं लागले. युद्धाचे पवित्रे सुरू झाले. एकच रणधुमाळी माजली. गुराख्यांनीं व लोकानी नदीची घस गांठली. लोक बैलांना प्रोत्साहनपर ओरडूं लागले. केसूतात्या, "माझा बैल मेला. सोडवा सोडवा." असे ओरडूं लागले.

हें चाललें आहे तो गावात झोंबीची बातमी पोचली व झोंब्या पाहण्या-करितां गर्दी नदीच्या पात्रात लोटली. डबल प्रोग्रॅम व्हावा म्हणून कांहीं लोकांनीं डोबणांतून हले हाकलून आणले. बैलांच्या डरकाळ्यांत हल्याचा ट्र्वट्र्व मिसळला व एकच हलकल्लोळ उठला. परंतु हल्यांची दावण बैलांच्या बाजूला न येता बाजूनें पळत गेली व एक मोठें संकट टळलें.

मनोहर पहिल्यापासून झोबी सोडवीत होता. त्याने जागा सोडली नाहीं. तो बैलांच्या टकरींत सांपडला. तेव्हां लोक घाबरून ओरडूं लागले,

" दादा सांपडले, दादा सापडले. धावा धावा ! "

मुकुटनें ते ऐकले. लाडीचा पालवा घेऊन तो धांवत आला व त्या बैलांच्या धुमाळींत शिरला. त्याने बैलांना असे रट्टे मारले कीं, पालवा पिंजून फुटला व बाजूच्या बैलांनीं झोंब्या सोडल्या. मग तो बंड्याच्या जवळ गेला व ताकतीच्या बळावर त्यानें बंड्याचीं शिंगे धरून त्याला ओढून काढलें. तेव्हां काज्या शेंपूट उडवून तेथून पळून गेला.

" हाथ्, तुला वाघान खाल्लं ! " आपल्या दुष्मानाकडे पाहत अधू ओरडला. " आतां येशील का बंड्याची कुरापत काढायला ? "

मनोहरने मुकुटचे आभार मानले व लाडीवरची दृष्टि बळानें काढीत तो गांवाच्या वाटेला लागला.

" फुकाट खाल्ला तात्यांचा रतीब बैलटानं !" अधूनें तात्यांना सर्वांसमक्ष हिणवले.

" तो मुळी झोब्रीचा बैलच नाहीं. त्याचा वाण तो काय ? पण छकडीला असा तुरूतुरू चालेल कीं यंव !" तात्यांनीं आपल्या अभिमानाला पळवाट काढली.

" तात्या, जत्रेला होऊं द्या तुमची आमची शर्यत." अंधूनें आव्हान दिलें.

" जुपणार तर काय सोडीन !" तात्या चिडून बोलले. " उद्यां भरतो गाडीला."

" हा, हा. तात्या, तुमचे बैल नाय आटपायचे छकडीला. काज्या काय, मौज्या काय, घरचे गोऱ्हे. रातंदिन घरच्या कालवडीला प्यालेले. ते नाय आटपायचे कुणाला दमांत." गांवकरी तात्यांची टिंगल करू लागले. परंतु तात्यांना कळत नव्हतें कीं, ही स्तुति आहे कां टिंगल !

त्या दिवशी रात्रीं मनोहरला झालेल्या प्रकारानें झोंप येईना. लाडीची नवोनव मूर्ति त्याच्या डोळ्यांपुढून हलेना. त्याची खात्री झाली कीं, मुकुटने चिडून लाडीवर खोटा आरोप केला. बाहेर चंद्राचा स्वच्छ प्रकाश पडला होता व त्यांतून डोंगरमाथ्यावरील कारवीनें कहर केला. त्या सुगंधमय वातावरणांत लाडीचें संस्मरण त्याला अनुपम सुख देत होतें. त्या संस्मरणांत त्याला डुलकी लागली. तों रात्रीं त्याला मोठा आवाज ऐकूं येऊन तो जागा झाला.

" हाथ्, तुला वाघानं खाल्ल !" अंधूनें दुसरी एक धोपाटी काज्यावर घातली.

# प्रकरण ११ वें

## भांडण

दुसरे दिवशीं सकाळीं तात्यांच्या घरासमोर खूप गर्दी जमली. कारण तात्यानीं काज्याला गाडीला धरले होते. पहिल्या सलामीला काज्याने वेसकटींत गाडी घालून जोडीच्या मोज्याला पाडले व आपण मोकळा झाला. लोकांनीं हा हूं करून गाडी पुन्हा सरळ केली व काज्याला पुन्हा जोडलें. तात्यांनीं काज्याचा कासरा ओढला. त्याबरोबर काज्याने वेसकटीच्या धोंडीवर गाडी चढवली व अशी कांहीं युक्ति केली कीं, गाडी अन् तात्या एकदम खालीं ! लोकांनीं त्यांना महा मुष्किलीने गाडीच्या बाहेर काढले गाडी अर्धी अधिक मोडली. कारण गाडीचा देखील काज्याप्रमाणेच अवतार होता. तात्यांचा सावकारीचा धंदा होता. त्यांतील गहाणवट मोडक्यातोडक्या गाड्यातून, एकीचे तुंबे, एकीच्या अरेपाट्या, एकीच्या धावा असें करून गाडी उभी केलेली होती. तिची कारागिरी देखील एका ऋणको सुताराकडून व्याजाच्या पोटीं तात्यांनीं करून घेतलेली होती.

गावकऱ्यानीं खिळखिळी झालेली गाडी पुन्हां सरळ केली व काज्याला जोडले. या खेपेस तात्यानीं ' झ्या ' करून चाबूक मारल्याबरोबर काज्यानें बैठक मारली. तो काहीं केल्या उठेना. लोकानीं शिकस्त केली. तात्यानीं त्याला लडिवाळपणाच्या सर्व हाका मारून पाहिल्या, पण काहीं उपयोग झाला नाहीं. गांवकऱ्यांनीं काज्याची शेपटी धरून त्याला उठवण्याचा प्रयत्न केला. शेपटी तुटण्याची वेळ आली, पण काज्या उठला नाहीं. मग तात्या गाडीखालीं उतरले व त्यांनीं काज्याला चाबकाने बडवबडव बडवले. परंतु काज्यानें कातडीसुद्धां चमकावली नाहीं. तेव्हा तात्या अतिशय चिडले. त्यांनीं घरांत जाऊन बांबूची काठी आणली व सदरा काढून काज्याला धोपटण्यास सुरुवात केली. धोपाटी मारतांना त्याच्या छातीच्या सांगाडा व बरगड्या मोडक्या विरल्याप्रमाणें वर-खालीं होत होत्या. अंधू हा महोत्सव हॅनिबॉलच्या सूडबुद्धीनें पाहत होता.

" माझे उडीद ! " मार धोपाटी.

" माझी पेंड ! " पुन्हां धोपाटी.

" माझा कोंडा ! " दांत खाऊन पुन्हा धोपाटी.

" फुकट फुकट खाल्ला ! " दम घेऊन तात्यांनी आणखी धोपाट्या घातल्या.

त्यानी काज्याच्या नाकाडावर देखील कांहीं फटके मारले. पण काज्या हालला नाही ! तात्या दमले. त्यांच्या हाताला झिणझिण्या आल्या. मग ते ओटीवर जाऊन बसले. लोक आपसांत विनोद करून तात्यांची चेष्टा करीत होते. ओटीवर तात्यांना युक्ति सुचली. त्यानीं तीन धारी निवडुंगाचे झाड तोडलें व त्याची काडी त्यानीं काज्याच्या कुशीपोटाखालीं सारली. पण काज्याने या प्रयोगाला देखील दाद दिली नाही. तेव्हां तात्यानीं काज्याच्या पोटाखालीं गवत पेटवले. बैल चटक्यामुळे केविलवाण्या आवाजात गोंगूं लागला.

आतापर्यंत बाप्पाजी कमरेवर हात देऊन आपल्या घराच्या ओटीवरून तात्याचे अमानुष क्रौर्य संतापयुक्त अंतःकरणाने पाहत होते. तात्यांनीं जेव्हा बैलाखाली आगटी पेटवली तेव्हा त्यांचा संताप अनावर झाला. ते गाडीजवळ धांवत आले.

" चांडाळा, तुझ्याशी बोलूं नये; पण काय चालवलंस हे ? मुक्या जनावराचा जीव घेतोस ? "

मनोहरने बैलाची खीळ व जुंपणी काढली.

" बैल माझा आहे; समनाच्या कर्जातला नाही. मी त्याला ठार मारीन. " तात्या ' इस इस ' करून आगटी फुंकूं लागले.

कांहीं पाणी आणणाऱ्या बाया भरले हाडे घेऊन ही गंमत पाहत होत्या. त्यापैकी एकीचा हांडा घेऊन बाप्पाजींनीं आगटीवर ओतला. तात्यांच्या धोडस्यावर पाणी पडून ते ओलेचिंब झालें ! तात्या ' शंभो ' करून ओरडले व त्यांनीं बाप्पाजीच्या नांवाने तीन वेळां बोब मारली. मग ते ओटीवर बसून बाप्पाजीना शिव्या देऊं लागले. ही संधि साधून काज्यानें भूम ठोकली व गान गांठलें.

" अरे, तुझी काय किमत. तूं आणि तुझे वडील माझ्याकडे श्वानवत् पडून असत. त्या धर्माच्या अन्नावर वाढलेलें रक्तमास अजून तुझ्या देहांत

आहे. मात्रागमन्या, ताम्रमुखी खाऊन तुझ्या तोंडावर थुकलं पाहिजे. ह माझं अस्थिचर्म फक्त वडिलार्जित आहेत. रक्त देखील स्वकष्टार्जित. मुदतीबाहेर गेलेले चुलत्याच्या कुटुंबाचें कर्ज तेरा हजार रुपये मीं व्याज-मुद्दल फेडले मारवाड्यांचे. कर्जातील एका पैला मी लिप्ताळा नव्हतो. पण म्हटलं चुलत्याला नरकांत घालायचं नाहीं. चुलता आणि बाप काहीं वेगळा नाहीं. मी मारवाड्यांना भीत नाहीं अन् कर्जाला पण भीत नाहीं. मला हिणवतोस मारवाड्याच्या पैशाने बैल आणले म्हणून ! हे सगळं वडिलार्जित पण स्वकष्टाच्या पैशानं विकत घेतलेलं. चोरीवर माडी नाहीं बांधली.''

बाप्पाजींचा क्रोध अनावर झाला. त्यांच्या कपाळांतून निघालेलें उंच नाक फेदारलें. जाड भुंवयांखालच्या सिंहासारख्या दिसणाऱ्या डोळयात ठिणग्या पडतात की काय असे दिसूं लागले. त्याची तांब्याच्या पत्र्याप्रमाणे दिसणारी कातडी लाल भडक दिसूं लागली. ते भृगुऋषीप्रमाणे तात्याना शाप देऊन भस्म करतात की काय असे लोकाना वाटलें. त्यांना अद्याप गांवकऱ्यांपैकीं कोणी ' अरे तुरे ' केले नव्हते. बाप्पाजींना आवरण्याची कोणाची प्राज्ञा नव्हती. कोणी पुढे येईना. तेव्हां सयाजी गर्दीतून पुढे आला व त्यानं बाप्पाजींचीं जाड बोटे पकडलीं.

'' बाप्पा, तुझा शबुद म्हंजं लाखांतलं रतन. आन् कोनाला देतोस ? ' सयाजीने बाप्पाजीला मोठ्या घरांत ओढून नेलें.

'' मोठा हरिश्चंद्र आहेस; मग केवद्याला पळवून त्याचं कर्ज कस बुडवलंस ? '' तात्यांनीं शेवटची तोफ डागली.

'' त्यानं खोटा जमाखर्च केला. तो आपल्या कर्मानं मेला. अजून तो आला तरी मुदतीबाहेरचं त्याचं देणं मी देऊन टाकीन. सांग त्या समनाला. ''

सयाजीनें बाप्पाजींना घरांत नेऊन शांत केलें.

काज्याच्या मेहनतीनें तात्या इतके थकले कीं, त्या दिवशी रात्रीं त्याचे घरीं आकरकी एकोत्री, परोंचे, तोंडचे हिशेब, इंग्रजींत कुत्र्याला काय म्हणतात ' डाग ', वगैरे गोष्टी बंद होत्या. रात्रभर तात्या इवळत होते.

---

## प्रकरण १२ वें

# जत्रा

ताम्बूच्या वासराचा रंग करडा होऊं लागला. परंतु गजा हरकुडा अधूकडे तोंड करीना. अंधूला पाहिले की, तो पलिकडच्या बाघाने पसार होई. मग ऐन्याच्या झाकणाची तंबाखूची डबी देण्याची गोष्ट लांबच राहिली. अधूने डबीची आशा सोडली. जत्रा जवळ येऊ लागली तसा तो खिन्न झाला.

कार्तिक पुनव उजाडली. त्याच दिवशीं त्रिपुरसुंदरीची जत्रा. अधू सकाळीं उठला तो त्याला काज्याचें तोंड दिसलें. अधूचा राग अनावर झाला.

" हाय् तुला वाघानं ग्वाल !" अंधूने दाणदिशी धोपाटी हाणली. ' रामाच्या पारी अपसकून करतो ! "

काज्या नेहमींप्रमाणे कुंपण उडून जाऊ लागला परंतु त्याचे पुढले पाय काटीच्या शेव्याला अडकले व काज्या कुंपणात तडफड करू लागला. त्याला पळून जाता येईना. आजचा दिवस अधूच्या आत्मचरित्रात सोनेरी शाईने छापावा इतक्या आनंदाचा ठरला. ज्याची अंधू कैक दिवस वाट पाहत होता ती सुवर्णसंधि, तो अमृतसिद्धियोग, आज आयता चालून आला. अधूने जसे काज्याचे तोंड पाहिले तसे काज्यानेदेखील अधूचे पाहिले होते. एवढेच नव्हे, तर शकुनाचे फळ काज्याला लवकर मिळाले. अधूने काठी टाकून सागवानाचे वासकट उचलले व तो काज्यावर दोन्ही हातांच्या उपटी घालूं लागला.

खिडकीतून मनोहरने अंधूला खुणावले की, तात्या कुपणीत उभे आहेत. " हा माझा फुटका डोळा हाय कुपणाच्या बाजूला. मला तात्याबित्या कोन दिसत नाय. " नेलसन्प्रमाणे अंधूने उत्तर दिले व तो काज्याला आणखी धोपाटू लागला. इसापनीतींतील एक डोळ्याच्या हरणावर फुटक्या डोळ्यामुळे आपत्ति आली. परंतु अधूचा फुटका डोळा त्याला नेहमी याप्रमाणें उपयोगी पडे.

---

" मारा, मारा आमच्या गोऱ्ह्याला. म्हणजे सुटेल तरी तुमच्या हातून तो. मालकाची भूतदया कुठ गेली आतां ?" तात्या कुंपणींतील टेहळी बुरजावरून ओरडले.

" पहिल बैलाचं तोंड पाहिलं. आतां धन्याचं. आजचा दिवस कसा काय जातो !" हं हं करून अंधूनें उपटी चालू ठेवल्या.

या फलज्योतिषाचा दृक्प्रत्यय बाप्पाजींनीं ओटीवरून घेतला व ते घसा फोडून ओरडले,

" अरे अध्या, हरामखोरा, तुला घालू का तसल्या उपटी ! छुद्‌छुद्‌छुद् ! याला कितीहि सांगा. पालथ्या घड्यावर पाणी. अरे, मुक्या प्राण्याला मारून काय होणार ?" बाप्पाजी तळमळले.

" हाथ्, त्याला वाघ कां खाईना ! वाड्यांत अरण आणतो !"

" अरे, तो त्याचा जातिधर्म आहे. त्याला हाकलून काढ अन् गाईला आंतल्या बाजूला बांध." बाप्पाजी ओरडले.

अंधूची आता पक्की खात्री झाली कीं, आज आपली जत्रा फुकट जाणार. हे विचार त्याच्या डोक्यांत शिरतात न शिरतात तो मनोहरने त्याला माडीवर बोलावले.

" अंधू, आज दुपारीं आपल्याला जत्रेला जायच. बैलाना चागल धू आणि तेलपाणी कर. पण काय रे, गजानें दिले का तुझ्या पैजेचे पैसे ?"

" देतोय ! फुकाचा बोलत नाय तो."

" हें घे तुला जत्रेला." मनोहरनें अधूच्या अंगावर रुपाया फेकला.

अंधू नाचत खालीं गेला. इतक्यांत बाप्पाजींनीं अंधूला हांक मारली.

" अंध्या, हरामखोरा, इकडं ये. तूं आज कुणाचं तोंड पाहिल होतंस ?" बाप्पाजींनीं दरडावून विचारलें. अंधूला वाटलें आपण काज्याचे तोंड पाहिलें, तेव्हां अपशकुनच होणारच. अंधूचा एक डोळा भीतीने पांढरा झाला. तो थरथरा कांपू लागला.

" सालबोलीच्या कराराप्रमाणें तूं माझ्याकडं पांच वर्षे नोकरी घातलीस. आज रावबहाद्दुरांचं पत्र आलं आहे. ते आपल्या सुभद्राताईला पाह्यला येणार दोनतीन दिवसांत. मी तुला एक साल माफ केलं आहे. हे घे तुझे सालाचे बारा रुपये."

बारा रुपये अन् एक मनुदादांनी दिला ! हे झाले तेरा. अंधूने रुपये पुन्हा पुन्हा मोजले. राहीला भुलवण्याकरितां चादीचा करगोटा घेण्याचे अधूने किती तरी दिवस ठरवले होते. शिवाय ऐन्याच्या ढापणाची तबाखूंची डबी, अन् दाढीतले पांढरे केंस उपटण्याकरितां एक चिमटा विकत घेऊन आज अंधूनें आपली मनीषा पूर्ण करण्याचें ठरवले.

दुपारची अंधूनें छकडी जुंपली. मनोहर, सुभद्रा छकडीत बसली. मनोहरने आणलेली दृष्टमण्याची माळ, पितळेच्या साखळ्या व जुन्या झुली अंधूनें बैलाना घातल्या व छकडी दौड करण्यास तयार झाली. बाप्पा जींचें व तात्या यांचें भांडण झालें त्याच दिवशीं तात्यांनी चुरशीने मोज्याच्या जोडीला नवा बैल विकत घेतला होता. तात्यांनीं पण छकडी जुंपली. ते आज छकडी हाकायला बसले. विनोबा छकडीच्या मध्यभागीं शुंभासारखे बसून आपली दुर्बीण सुभद्रेकडे लावीत होते. पहिल्या धडाक्याला तात्यानीं छकडी अंधूच्या पुढें काढली. तात्यांचे बैल जीव खाऊन पळू लागले.

अंधूचे माथें फिरलें. तो बंड्या-पुतळ्याला दवडवूं लागला. तेव्हा मनोहरने त्याला मना केले.

"तात्या पराणी मारताहेत बैलाला. आपली छकडी तात्यांच्या मागो माग ठेव. मी सांगेन तुला कधीं पुढं निघायचं ते."

मैलाचा दगडी खांब गेला अन् कावलेल्या तात्यांच्या बैलांनीं छकडी नांदुरकीच्या झाडावर घातली. बैलांच्या जुपण्या तुटल्या अन् तात्यांची छकडी वाकलेल्या एका फांदीला टागली गेली ! अर्थात् अंधूची छकडी पुढें निघाली व जत्रेच्या पटांगणापर्यंत अंधूला तात्यांचा त्रास झाला नाही.

जत्रेला माणसांची व गाड्यांची रीघ लागली होती. जत्रेला जाताना वनश्रीची अपूर्व शोभा दिसत होती. छकडी जशी रस्त्याच्या वळणावळणा-तून लांब जाऊं लागली तशी रानसईची राने, खलाटी, काळा कडा, डोंगर निरनिराळ्या दृष्टिकोनांतून निरनिराळी शोभा धारण करूं लागले. पाणव्हळ जमिनीतून अद्याप भाताची कापणी चालली होती. वाटेत खळ्यांवरून झोडणी सुरू होती. मनोहरच्या म्हणजे बाप्पाजीच्या छकडीशीं कोणी शर्यत देत नव्हते. इतका त्यांचा आजूबाजूच्या गांवांतून लौकिक होता. शेतकऱ्यांच्या तोंडावर सराईचा आनंद दाटला होता.

तळात गाडी सोडल्यावर मनोहर व सुभद्रा टेकडीवरील त्रिपुरसुदरीचे दर्शन घेऊन खाली आली. नतर ती दोघे कचकड्याच्या दुकानावर गेली. अधू पहिले छूट तबाखूची डबी घ्यावयाला गेला. तेथे त्याला राही भेटली. त्याने राहीला चाच्या 'टाव्हरना'त नेले अन् एक कोप चा पाजला. मग रसाच्या गुऱ्हाळावर दोघानीं एक शेर रस घेतला. त्यानंतर राहीकरिता पचमेळेची खरेदी झाली. पुढे अधूला सोरटीचे दुकान लागले. अधूने बागडी फेकून तीन वेळा दोन दोन आणे मिळवले. तेव्हा लोक त्याची स्तुति व सोरटवाल्याची 'हुर्रे' करू लागले. अधूने आपला एक डोळा अभिमानानें चमकावला व सोरटवाल्याला रानसईचे पाणी पाजण्याचा विचार केला. ' अधूच्या डोंगरी चलाखीपुढे आपण हार खाणार! हा बुड्डा जंगली आदमी माझे दिवाळे काढणार ' असे सोरटवाल्याने नाटक सुरू केले. अधूनें तीन रुपये गमावले, तेव्हा राहीने त्याला खेचले. मग त्याने चादीचा करगोटा, डबी अन् चिमटा राहीला चोरून घेतला.

इकडे मनोहरने सुभद्रेला मेवा-मिठाई, कंगवा-फण्या, आरसे-बाजे अशा जिनसा घेऊन दिल्या. त्याला लाडी भेटली. तिला त्याने बरोबर घेतले व दोघींना चक्रावर अन् पाळण्यांत बसवले. नतर त्याने निरनिराळे खेळ आणि चित्राची प्रदर्शने त्यांना दाखविली व सर्व जत्रेतून हिडवून आणले. इतक्यात अंध शिकारी कुत्र्यासारखा त्याना शोधतांना दिसला. अधूने चादीचा करगोटा कमरेला लावून त्यावर नवीन रुमालाची लंगोटी पण चढवली होती. मनोहरने अधूला सांगितले की, ' सुभद्रेला व लाडीला छकडीत नेऊन बसव.'

मग तो जत्रेची खरी गमत पाहण्यास निघाला. त्या वेळी हंगामी देशी दारूच्या दुकानांत त्याला मुकुट आणि तुकाराम दारू पिताना आढळले. अकुशा पण लास होऊन दारू-दुकानाच्या ताटीला टेकून त्या दोघाच्या गोष्टी ऐकत होता. मुकुट पाठमोरा होता. परतु तुकारामानं मनोहरला पाहिले व त्याने आपले लाल डोळे मनोहरवर रोखले. इतक्यांत एक चलाख दिसणारा, नीटनेटका पोषाख केलेला इसम दारू-दुकानात शिरला. त्याची दृष्टि तीक्ष्ण होती व तो चौफेर नजर ठेवून सर्व गोष्टी बारकाईने पाहत होता त्यानें मुकुटला रामराम केला व मोठ्या रुबाबात विचारले,

" तुम्ही कोणत्या पलटणीत असता ? "

मनोहर दुकानाच्या बाहेर उभा राहून त्याचें भाषण ऐकूं लागला.

“ मी पलटणींत नसतो. ” मुकुटनें उत्तर दिले.

“ छट् ! खोट बोलता. लष्करी ढब कुठ लपते ! वः वः काय ही गर्दन ! काय हा पुट्ठा ! ” त्या इसमानें मुकुटच्या पाटीवर जोराची थाप मारली. नंतर त्यानें त्याचे दंड दाबले व छातीवर गुद्दे दिले.

“ वः वः बदन सख्त है. ओहो काय या फाकदार पटा अन् या घाटदार पिढऱ्या ! अन् तापलेल्या सोन्यासारखा रंग ! तानाजीसारख्या पिळ्या मिशा अन् मर्दानी नजर ! माझा दिल् खूष झाल. तुम्ही पलटणीत नोकरीला नाही, तर मग काय करतां ? ”

“ करतो शेतीचा उद्योग. ”

“ छेः छेः बस्स ! मिलिटरीचा युनिफार्म तुमचे अंगावर काय पण खुषबु बसेल ! या इथ कमरेला संगीन तलवार, हातांत रैफल, डोकीला साफा अन् छातीवर मेडल्स. बस ! राजेंद्राची ऐट येईल चालताना ! ”

त्या इसमानें मुकुटला मिलिटरी पौडांवर चालून दाखवलें. मनोहरनें ओळखले की, तो इसम रिक्रूटिंग ऑफिसर आहे.

“ सरदार, चला, मी माझ्या कमांडरला सांगून तुम्हांला पलटणींत दाखल करून घेतो. एकदम जमादाराची जागा. उद्यांला डॉक्टरची तपासणी करू. ”

“ अरे बापरे ! तो छातीला चमचा लावील. ” मुकुट ओरडला.

“ बिशाद आहे पठ्ठे ! शेकिनमध्ये असा हात दाबा की बस्स. मग काय बी करणार नाही. ”

“ सरदार, माझी अशी अडचण आहे....... ”

“ हां, हां, मी ओळखल किसनजी. तुम्ही पलटणीत शिरा कीं गांवो-गांव चंद्रावळी भेटतील. मर्दगड्याला काय तोटा ! आपण मराठे गडी. मुलूखगिरीशिवाय आपलं कस काय चालणार ? घरांत माशा मारीत बसण आपला धर्म नाहीं. कोण गावचे तुम्ही ? ”

“ रानसई. ”

" तुम्ही विचार करा. घाई करूं नका. अन् शिवाय तुम्ही आज प्याला आहात. मी पुन्हां तुमच्या गांवी येईन. मी तुमच्या वडिलासारखा. तुम्ही निशा करू नका. हा शिद्दी कोण तुमच्याबरोबर आहे? हा! फॉरेस्टचा बिल्ला आहे. पोरांना बिघडवतोस? चांगला धंदा करतोस."

त्या इसमाच्या बोलण्यात अशी गोडी आणि असा अधिकार होता की, कैक लोक दारू पिण्याचे विसरले व त्याच्याभोंवती रणांगणाच्या, कुतल-आमाराच्या वेढ्याच्या, गॅलीपोलीच्या, अफगाण लढाईच्या गोष्टी ऐकत बसले. मनोहरला पण मोह पडला. परंतु सध्याकाळ होत आली. देवळाच्या दीपमाळांवर असंख्य दिवे लागले. सुभद्रा, लाडी आपली वाट पाहून कंटाळल्या असतील या विचारामुळे तो तेथून उठला व त्याने अधूला छकडी जुपण्यास सांगितले.

मागें त्रिपुरसुदरीच्या टेकडीवर लावण्यसुंदर दीपमाळा उजाळल्या. समोर काळ्या कड्यावर पौर्णिमेचें चद्राबिंब आले. वाटेनें मैलोगणिक कारवींचा वास दरवळला; आणि शेजारच्या शीतलांगी लाडीच्या अंगाचा मनोहरला मधून मधून गाडीच्या हादऱ्यांत स्पर्श झाला. अशा त्या परागमय स्वप्नसृष्टीतून तो परत घरीं परत आला.

---

## प्रकरण १३ वें

# मळणी

आज रडतोंडीच्या वाटानी मळणी होती. मळणीवर बाप्पाजींनी मनोहरला पाठवले. अंधूने पोत्याचा बिडा व फरी घेतली व गाडी हाकली.

" दादा, फरीच माप तुम्ही करूं नका, मी करीन." वाटेने अधूनं मनोहरला सूचना केली. " तुम्हाला फरी कापता यायची नाही."

" त्यांत काय अवघड आहे ?"

" दादा, तुमच्या मापात अन् माझ्या मापात फरीमाग अधोलीचा फरक परल. मी अधोली तरी जास्त मारीन."

" ती कशी रे !"

" फरीला बोट लावून रूल ओरला तर रूल उचलला जातो व त्याचे खाली अधोली दीर अधोली–वेळेला पायलीभर–भात जास्त राहत."

" पण ही गरीब शेतकऱ्यांची शुद्ध फसवणूक आहे. बाप्पाजींना माहीत आहे ही गोष्ट !"

" नाय बा. बाप्पाजीना सांगू नका हो. नाही तर माझा कारा कारतील."

" अन् आपली कुळ काहीं तक्रार नाहीं करीत ?"

" त्या बेट्यांना काय कळत. त्यानीं सराई पिकवायची अन आपल्या कोठारांत भरायची. वारी-दिरी दिल्यावर त्याना राहनारच काय मुदली ! भादव्या कालांत पोटाला मिळाल म्हजं झाल."

" शेतकऱ्यांनी सराई भरायची तुमच्या कोठारात अन् तुम्हीं तिला नेऊन बसवायची समनागमनाच्या कोठारात. चांगला न्याय आहे ! उद्या समनागमनान खोट्या फरीन माप घेतल तर ते तुला चालेल ?"

" त्याची काय टाप आहे साल्याची ! पहिली मी फरी मापतो आपल्या फरीन. मग म्होर माप. अंधू हाय मी नांवाचा बाप्पाजींचा गरी."

मनोहर दीपाजीच्या खळ्यावर पोहोचला तेव्हा गड्यांनीं भारे झोडले होते. दीपाजी बरा झाला नव्हता, पण तसाच खळ्यावर येऊन बसला.

लाडी आणि त्रय मातेरं पाखडीत होत्या. दीपाजीने आपल्या एकुलत्या एक बैलाच्या जोडीला दुसरा एक बैल शेतीच्या कामाकरितां वाफेने म्हणजे भाड्याने घेतला होता. त्याचा मालक वाफ घेण्याकरिता खळ्यावर सकाळ-पासून बसला होता. भात वारवण्याकरिता गडी वाऱ्याची वाट पाहत होते. त्यानीं खळ्यांतील भुस्कट मुठीने उचलून दोनतीन मुठी खळ्याच्या निरनिराळ्या बाजूनें हवेंत सोडून वारा कसा वाहतो ती दिशा ठरवली व भाताची माड कशी घालावयाची तें कायम केलें. भात साफ करून वारवण्याचे काम सुरू झालें. दीपाजी भातांत पळीज फार ठेवतो म्हणून अधूची अन् त्याची हुजत झाली. हळूहळू भाताची पिवळीधमक माड सह्याद्रीच्या रांगेप्रमाणे तयार झाली. मग शेतकरी कोल्हे-हुकीची वाट पाहू लागले. कोल्हे-हुकीला माप केले म्हणजे वाढतें, असा शेतकऱ्याचा समज आहे. त्याच्या आधी शेतातील देवीची परडी अन् देवाची जत्रा झाली. मग माडीच्या कण्याची पूजा झाली. मांडीच्या मधे त्यानीं नारळ ठेवला, उदबत्त्या लावल्या व फुले वाहिलीं. सर्व काम खुणानीं चाललें होतें. कारण मळणीच्या वेळी शांतता ठेवण्याचा प्रघात आहे. त्या शांत खलाटींत शात खळें एक प्रकारची गूढता आणीत होते. जणू शांत धरित्री माता शेतकऱ्याना बक्षिस देण्याकरिता तेथे साक्षात् येणार आहे !

"दादा, पूर्वी शेताला चार पाय लागत, पण आता पूर्वीसारखी पिकरात नाही. हल्ली आम्हीं दोन पायावरच भागवतो." दीपाजीने मनोहरला शेताची माहिती सांगितली.

दोन पाय म्हणजे कोंबडा. चार पाय म्हणजे बकर. ते दोन पाय उडवीच्या मागे खळ्यांत बांधून ठेवले होते. त्याची थोड्या वेळाने कंदोरी झाली.

"तुझ्या त्या वरल्याकडल्या कोपऱ्यांत धामण हाय तोपर्यंत तुला कायबी कमी पडायचं नाहीं." दीपाजीच्या कामावर आलेला एक शेतकरी बोलला.

ज्याच्या शेनात धामण असते तो शेतकरी गब्बर होतो, असा शेतकऱ्यांचा दुसरा एक समज आहे. लंगोट्यांच्या विलायतेतील हा फाटका व निष्कांचन शेतकरी कधीं व कसा गब्बर होणार, याचे मनोहरला एक कोडे पडले.

" शेतात धामण हाय मग पिकरात कशी अशी ! काय भात नामी आल व्हत, पन शेतात धुर माजली. त्यान समदा नास झाला. " हताश होऊन दीपाजी बोलला.

" धुर झाली ? " आनदाने प्रफुल्लित होऊन त्या कामावर आलेल्या शेतकऱ्याने दीपाजीला प्रश्न केला. तो काय सागणार हें ऐकण्याकरिता दीपाजी त्याचेकडे उत्कठेने पाहू लागला.

" धुर झाली ! आता तुला कायबी भिती नाय. म्होरल्या सराईला तुला दुप्पट पिकरात होईल. शेतात खताची मळई आल्याबिगर धुर होत नाय. "

एका शेतकऱ्याने दुसऱ्या शेतकऱ्याला आशेचा किरण दाखवला. त्यानें दीपाजी पुन्हा खुलला.

कोल्हे हुकीच्या सुमारास उलाटण्याने मापाला सुरवात झाली. माप वाढावे म्हणून दर खेपेला एक मूठ भात मापाड्या परत उलाटण्यात टाकी. दर खेपेला उलाटणा फरीत रिकामा करावा लागे. एकदम फरी भाताला लावली तर शकुन जातो. अशा तऱ्हेने थोडेसे माप झाले नाहीं तो समनागमना गाडी घेऊन तेथे धडकला. त्याच्या गड्याने शेतकऱ्याला न विचारतां बैलाना आधीं चारसहा हिरवे पेंढे सोडले. समनाने मनोहरला बाप्पाजींची चिठ्ठी दाखविली कीं, आधी समनाशेटला खडीभर भात द्यावे. मनोहरने आपल्या फरीनें समनाची फरी मापली ती बरोबर निघाली. फरींत कांहीं लबाडी नव्हती. मनोहरने फरीवर फिरवावयाचा दाडू समनाजवळ मागितला.

" तुम्हांला दाडूं कशाला पाहिजे ? अधू सवता फरी कापील. त्यांत कसला आहे वांधा ! " समना दाडू देण्याची टाळाटाळी करू लागला. पण मनोहर कांही ऐकेना.

" भाषा बद कर ना समनाशेट. दादाना तुझा दाडू तपासून पाहायचा आहे. " अंधूने समनाला दम दिला.

" हे बघ शेट, तुला कांहीं संशय येत असेल तर आमच्या दांडून फरी काप. "

" हे बघा इनामदार, आमचं आधीं कर्ज काढायच अन् मग सतरा वाधे घालायचे, हे खर काम नाहीं. तुम्ही बाप्पाजीला शोभत नाहीत. "

" मारवाड्या, तोंड नीट संभाळून बोल." असे म्हणून मनोहरने समनाच्या एक तोंडांत भडकावली. अंधूने त्याचे हातातील दाडू हिसकावून घेतला. तेव्हा समना कांगावा करून ओरडू लागला.

" तुमी मोटे इनामदार ! तसा मी पण इकमटाक्स भरतो. खुद्द मामलेदार मला खुर्ची देतो अन् तुमी मला मारता ? मी पाहून घेईन तवा याचा जबाब मागेन."

मनोहरने समनाचा फरी कापायाचा दाडू लक्षपूर्वक पाहिला व तो मनाशी हसूं लागला.

" अंधू, दरसाल बाप्पाजी याच दाडूने फरी कापतात ?"

" होय." अंधूने उत्तर केले.

" अरेरे ! समना तू बाप्पाजींना फसवतोस ! अन् अंधू तू बढाई मारतोस, पण तुलाहि समना फसवतो. भर पाहू फरी."

अंधूने समनाची फरी भरली व मनोहरने फरीला बोट न लावता कापली अन् मग ते भात आपल्या फरीत ओतले, तेव्हां समनाच्या फरींत पायलीभर भात जास्त शिल्लक राहिले. कारण दाडूला आंतून बाक होता. अंधू आ वासून उभा राहिला.

समना मात्र निर्लज्जासारखा उभा होता. तो कांहीं दुसऱ्याचे फरीने किंवा दांडूने माप करावयास तयार होईना. दीपाजीच्या खळ्यावर कांही तरी घोटाळा उडाला ही बातमी बाप्पाजींना कळल्यावर ते धावत खळ्यावर आले. तेव्हा समनाने आपला मारवाडी सूर आणखी काढला. मनोहरने बाप्पाजींना समनाची लबाडी सांगितली.

" अरे माझ्या समना !" बाप्पाजींच्या बोलण्यात वैताग भरून राहिला होता. देवाची फुलें आणि कणग्यातील भात मोजणाऱ्या चाणाक्ष बाप्पाजींना मारवाडी फसवीत होता, याची त्या भोळ्या सांबाला चीड आली होती.

" अरे, गेलीं चाळीस वर्षे माझं पन्नास खंडी भात मी तुझ्या घरात घालतों आहें. अन् प्रामाणिकपणानं मी तुझी पैन् पै फेडीत आहें. तरी तू मला फसवतोस ? दगा किसका सगा नही."

" अरे बाप्पा, तुमीं तो शब्दाची घमंड मारता. तो आमचा भाऊ केवदा फरारी आहे. त्याच देणं का बुडवता ? सागा पाहूं. "

" तुझ्या केवद्याला उद्या आण. पहिलं मी त्याच देण देऊन टाकतो. " बाप्पाजींनीं दरी गर्जविली.

" मग आमच्येजवळ देऊन टाक. "

" तुझेजवळ कस देणार? तुझ त्याच दुकान निराळ. ज्याचं कर्ज त्याचे-जवळ दिलं पाहिजे. "

" अरे, असा बोलून खाता मुदतीबाहेर घालवला. आता नाय तुला भीति कोर्टाची नि कचेरीची . आता कसला येतो केवदा? जेलमदी जायाला ? "

" अरे, आम्ही कोर्टाला भीत नाही नि कचेरीला भीत नाही. ब्रह्म-देवाच्या बापाला भीत नाहीं. प्रत्यक्ष परमेश्वराला भीत नाही. तुझ्या चोपड्याना भीत नाही आणि चित्रगुप्ताच्या वह्याना भीत नाहीं. कारण आमच्याजवळ सत्य आहे. तू केवद्याला सारंगखिडीच्या माथ्यावर आण. ती हद्द पर्तांच्या मुलुखात आहे. तिथे मी त्याचे सातशे रुपये व्याजमुद्दल देऊन टाकतो. ही घे माझी टाळी. केव्हा आणतोस केवद्याला ? बाप्पाजी कधी शब्द बदलत नाहीं. "

" उद्याला. "

" मारवाडांतून तो उद्या कसा येणार ? "

" त्याची तुम्हाला काय काळजी ! "

बाप्पाजींची टाळी म्हणजे टाळी हे समना जाणून होता. बाप्पाजींच्या टाळीनें तो प्रसन्न झाला व मापाचा प्रश्न तेथेच राहिला.

" अन् बाप्पाजी, माझ्या खात्याचा हिसाब करून टाक. लई दिस झाले. "

" तो बी हिसाब होईल. "

" हें बघ बाप्पाजी, मी बोलतो पन राग मानू नकोस. तेव्हढी राजपाटी मी विकत नाहीं मागत, पण फरोक्ताचा कागद अन् परत देण्याची बोली करून टाक. तुझी जमीन तू घे. आमाला ती कशाला ढगदग पाहिजे ! "

केवढ्याला पैसे मिळणार म्हणून समना खुषींत आला. मनोहरनें त्याच्या थोबाडींत मारली हे देखील तो विसरून गेला. मापाला सुरवात झाली. बाप्पाजींनी पहिल्या प्रथम खडीभर मक्त्याचे भात काढून घेतले व ते समनाच्या हवालीं केले. दीपाजीने सहा मण आगोटीला व भादव्याच्या महिन्यांत पोटाला कर्जाऊ नेले होतें त्याची आपली दिढी त्यानीं काढून घेतली, म्हणजे नऊ मण भात घेतले. त्याचेनतर वाफवाल्याने पहिल्या बैलाचे चार मण व तो बैल थकला म्हणून दुसरा दिला त्याचे चार मण, असे आठ मण भात घेतले. तरी शेवटची फरी भरली नाहीं. बयनें पळजीची रास पाखडली तेव्हां माप पुरे झाले.

बयने टपटप आसवें गाळलीं तीं लाडीने निपटलीं. "बय, रडूं नकोस. मीं फाड्यांवर चार महिने चालवीन."

काल जत्रेत खुसू खुसू हंसणारी लाडी आज खळ्यावर रजीस झाली होती. ती मनोहरकडे बिलकुल पाहत नव्हती. मारवाडी खळ्यावर आला नसता तर मनोहरने चलाखी करून दीपाजीला जास्त भात घातले असते. पण मनोहरचा लाडीला खूष करण्याचा डाव फसला.

लाडी उडवीला टेकून आकाशातील रगांकडे बेगुमान नजरेने पाहू लागली. पेळ्याची काडी तोडात धरून ती दाताने तोडीत उभी होती. तिचे उसळणारे लावण्य, यौवनाचा बहर, रक्तिमा, डोळ्यातील तेज बिलकुल कमी झालें नव्हते. पश्चिमेकडे निळ्या डोंगराच्या मागून सोन्याचा तापलेला चुरा उडत होता त्याचा उजेड तिच्या मुखश्रीवर पडून ते रागेजले होते. मनोहर तिच्याकडे बाप्पाजीना चोरून पाहण्याची सधि घेई. आज लाडीचे मनोहरकडे देखील लक्ष नव्हते.

थोड्या वेळाने बय पण ताळ्यावर आली व ती खळे साफ करू लागली. दीपाजी देखील निर्विकार बसला. बाप्पाजीना सराईचे दिवसातले असले प्रसंग अगवळणीं होते. सराईत ते दया पोटात ठेवीत, नतर आगोटींत भादव्या काळात दाखवीत.

"दीप्या, यंदां बराबरी झाली जेमतेम! काय भात पिकवलस! तू तसाच आहेस रड्या! लोकांची जनावरं घेऊन का शेती होते?"

" बाप्पाजी, मला काय शेत दिसत वाटेवरच. साऱ्या गुराची वर्दळ. पुन्हां पाणी अगावर. दरसाल खाडी जातात. मी तरास तरी किती काढू? अन् चिखुल कसा व्हणार घरच्या बैलाशिवाय ? "

" दरसाल रड. " बाप्पाजी उठले. कारण पोतीं भरून गाड्या जाण्यास तयार झाल्या.

" वाटेल ते झालं तरी मी सूट नाय मागायाचा, भीक नाय मांगायचा. दीपाजी हाय नावाचा. बाप्पाजी आंवदा नाय पन म्होरल्या सराईला अस्सा भात पिकवीन ! "

दीपाजी, बय, लाडी सुपे-टोपल्या घेऊन घरीं जाण्यास निघाली.

" चला, आपली सराई आगोटीला अन् भादव्याच्या महिन्यात. " दीपाजी एखाद्या तत्त्ववेत्त्यासारखा उद्गारला.

समनाचे बैल भक्कम होते. खडीचे वजन त्याने गाडींत टाकले. पोत्यावर उपडी फरी टाकली. नंतर गाडींतल्या भरल्या पोत्यावर ऐटींत बसून तो घरी जावयास निघाला. त्याचे पाठोपाठ बाप्पाजी निघाले. धरणीवरच्या आकाशरेषेवर, डोक्यावर रिकाम्या टोपल्या घेऊन दीपाजी, बय व लाडी याच्या सावल्या पाऊलवाटेने पेंगत, रेंगाळत अन् पायात पाय गुतत—अशा चालल्या होत्या. मनोहर कळवळला.

" मनोहर, यंदा पीक चागलं आल आहे. यदाचा अन् मागल्या सालाचा दाणा न् दाणा वसूल झाला पाहिजे. सुभद्रेच्या लग्नाच कुठं पटकन जुळलं तर आपल्याजवळ आदा पाहिजे. मारवाड्याचं तोंड नको पहायला त्याकरता. "

" यंदाचा वसूल काय करायचा ? "

" यदाचं भात विकून पैसे उभारू. व्याजापुरत मारवाड्याला भात देऊं म्हणजे झाल. "

" बाप्पाजी, दीपाजीन येवढं भात पिकवल पण तीन चिमटी भात कांहीं त्यानं घरीं नेलं नाही ! ते पहा बिचारे रिकाम्या टोपल्या घेऊन चालले आहेत ! "

मनोहरने मुद्याची गोष्ट ओळखली या अर्थाने बाप्पाजी हंसले.

" अरे मनोहर, दर सराईला मी हेच पाहतो. किती सराया मी पाहिल्या आहेत! शके सतराशे दुदभिनाम, संवत्सरे. पहा, त्या साली माझा जन्म झाला अन् वयाच्या दहाव्या वर्षापासून मी शेती करतो. दहाव्या वर्षी माझे वडील वारले. जगाची राहटी अशीच चालली आहे. या लोकाची सराई पावसाळ्यात भादव्याच्या महिन्यात येते. आपल्या आधी ते सराई ग्यातात. मघाशीं दीपाजीने खळ्यावर काय सांगितल ? "

" मग आता आठ महिने ते काय करणार ? "

" करतील कांहीं उद्योगधदा. लाडीचा लाकूडफाटा अन् अंडीं-कोंबडीं याच्यावर वय भागवील. समनाच्या जातणीवर पण ती जाते. तिथं मिळतो कणी-कोंडा. त्यावर जातील त्याचे दिवस. मात्र दीपाजीनं काही घोटाळा करतां कामा नाहीं. नाहीं तर आहे त्याचा आपला सोळाबाराचा धंदा. "

बाप्पाजींचे भाषण ऐकल्यावर मनोहर खिन्न होऊन उगा राहिला. थोडा वेळ विचार करून तो बोलला,

" आपली राजपाटी त्याला दिली तर ? "

" काय राजपाटी! त्या रडतोंडीच्या घाटाला देऊं? तूं दीप्याला ओळखलंस कुठं! जरा टोपलीभर भात जास्त पिकलं कीं हे कुळबी उर फाटतात. अरे कुळब्याबिगर दाता नाही अन् मारल्याबिगर देता नाहीं. आणि यांना लाख पिकलं म्हणून काय होणार? हे असेच ओरडायचे; आणि शेवटीं मारवाडी, काळण नाहींतर चिकीवाला याची भर करायचे."

" चिकीवाला ? "

" हो, चिकीवाला. कुळब्याचीं बायका-पोरं मागल्या दारान भात उपसतात अन् पैसा दोन पैशांच्या चिकीकरता अधोलीच पायली भात देतात. तो रामदीन भय्या चिकीवारी अन् फुटाण्यावारी वीस खडी भात नेतो आपल्या खोंड्यातून. "

" अव, चिकीवाल्याला काय करता! तो पानवाला अन् भोई अन् बागड्यावाला कासार समदे लुटतात शेतकऱ्याला." अधू त्या खोंड्यांतील बातम्या व गप्पा यात सर्वज्ञ होता.

" मनोहर तुला एक गोष्ट मागतो. ध्यानांत ठेव. सराईला दया पोटात."

अधूला ते पेटलें. त्यानें जोराने गाडी पिटाळली.

---

# प्रकरण १४ वें

## सारंगखिंडींत

रानसईच्या दक्षिणेस दोन भले उंच डोंगर भरत-भेटीकरितां जवळ-जवळ आले होते. आता ते कड्याला कडा छातीला छाती लावून एकमेकाना कडकडून भेटणार तो त्यांचे थिजून फत्तर झाले. छातीछातीचे कडेकोट बनले. या दोन कड्यांत एक खिंड निर्माण झाली. याच खिंडी-मधून ताबडमातीचा गाडीरस्ता पोवळ्याच्या वेलीप्रमाणें गेला होता. रानसईची प्रसिद्ध सारंगखिंड ती हीच. माथ्यावर गेले म्हणजे या हृदयाकार सारंगखिंडीतून अनंत नीलिमेचा समुद्र परमेश्वरी मनाप्रमाणे लांब लांब पसरलेला दिसतो. जणू अवकाशाचा अर्क काढून त्याचे हे निथळ निळे रसायन हृदयाकार कांचपात्रांत ठेवले आहे कीं, हें निळे परब्रह्म या पर्वतांच्या संयुक्त हृदयपुष्पाने झेलले आहे! आज रात्री मनोहर व बाप्पाजी केवद्याचे कर्ज देण्याकरिता सारंगखिंडीत जाणार होते. मनोहर जेवण झाल्यावर सारंगखिंडीकडे पाहू लागला. या हृदयपुष्पात अगस्तीचा तारा श्रीकृष्णाच्या घनःश्याम वक्षःस्थलावर जसा कौस्तुभ त्याप्रमाणे त्याला लकाकतांना कैक वेळां दिसला होता.

त्या रात्री समनागमना केवदा मारवाड्याला सारंगखिंडीच्या माथ्यावर आणणार होता. मोठ्या आईची नथ समनाकडे गहाण ठेवून बाप्पाजींनी केवद्याची रक्कम तयार केली. रात्री बाप्पाजीनीं अंधूला गाडी जुंपण्यास सांगितले. अंधूने कुऱ्हाड घेतली. मनोहरने भाला घेतला. बाप्पाजींनीं एक सोटगा जवळ ठेवला व कर्जाची रक्कम घेऊन ते आवशीचे निघाले. सारंगखिंडीच्या घाटांत मध्यावर गाडी आली तेव्हां कृत्तिकांचा नक्षत्रसमूह काळ्या कड्यावर उगवला. मनोहरने त्यांतील सात तारे मोजले. मोत्यां-सारख्या नक्षत्रांचा तो पुंज त्याला मोठ्या आईच्या नथीसारखा दिसला.

या विचारांत मनोहर होता इतक्यात अंधारांत विड्या झुगझुगल्या. बाप्पाजींनी सोटगा सावरला. अंधूने कुऱ्हाड काढली. बाप्पाजी ओरडले, "कुठलं रं कातोडी!"

" बाप्पा, तू हायस व्हय. आमाला वाटल तीन शेड्याची गाडी हाय. चल चल, आमी हाय सोबतीला." कोया पुढें होऊन बोलला. त्याचे मागे अकुशा वगैरे रानसईच्या कातोड्याचा पुढा होता.

" कोया, ही थैली साभाळ. माथ्यावर गाडी आली कीं, माझ्याजवळ दे. दुसऱ्या गावचे कातोडी आले तर लुटतील मला." बाप्पाजींनीं कोणाच्या अगावर थैली फेकली.

" बेस लुटतील ! आमी बांगड्या भरल्यात व्हय." कोयाने हातानीं बागड्या भरण्याचा अभिनय केला.

" टकुर फोडूनशानी टाकू." सर्व कातोडी ओरडले.

माथ्यापर्यंत कातोड्यानी बाप्पाजींच्या गाडीला सोबत केली. बाप्पाजीं-बरोबर लोक आहेत असे केवद्याला कळले असते तर पैसे घेण्याकरिता तो पुढे आला नसता. म्हणून सारगखिड जवळ आली तेव्हा बाप्पाजींनी कातोड्याना रजा दिली. कातोडी झाडाच्या, जाळ्याच्या अधेऱ्यातून कसे नाहीसे झाले हे कळले नाही. सारगखिडीत समना गाडीची वाट पाहत होता. गाडी वाजू लागली तेव्हा त्याने केवद्याला—तो पलीकडच्या उतरणी-वरच्या धनगरवाड्यात बसला होता तेथून—आधींच बोलावून आणलें होते. बाप्पाजी आल्यावर समनाने अधूला फाणस लावण्यास सांगितले आणि मग सर्वजण एका डगरीच्या आडोश्याला जाऊन बसले. केवद्याने बरोबर दौतलेखणी आणली होती. त्याने पावती लिहिली व एक आण्याचे तिकीट लावून पैसे मिळाल्याची सही केली. समना पैसे मोजून घेत होता. सर्व व्यवहार पुरा झाल्यावर समनाला बाप्पाजीबद्दल प्रेमाचे भरतें आले. त्याने बाप्पाजींच्या दाढीला हात लावला व तो म्हणाला,

" चांगला माणस तो चांगला माणस."

" हिग अटे वटे सागला माणस." केवद्याने समनाला मारवाडी भाषेत अनुमोदन दिलें.

मग ती रुपयाची थैली घेऊन ते दोन्ही मारवाडी धनगरवाड्याकडे निघून गेले. बाप्पाजींना आपल्या डोक्यावरचे ओझे उतरले असे वाटलें. त्यांनीं भक्तिभावाने परमेश्वराला एक नमस्कार केला. मग त्यांनीं

रानसईकडे गाडी फिरवली. गाडी दोनचार वाकणे खालीं जाते न जाते तो त्यांना एक मोठा गलका ऐकू आला. धनगरवाड्यावरचे लोक 'चोर चोर' म्हणून ओरडत होते व गोफणीचा मारा करीत होते.

"आपल्या कातोड्यानी काही दगाफटका केला नाही ना?" सचित होऊन बाप्पाजी बोलले.

"आपल्याशी ते बैमान होणार नाहींत." मनोहरने कातोड्याची शिफारस केली.

"कातोडीभाई! त्यांना आले आहे इनाम! स्वतंत्र वृत्तीचे लोक ते. मनात येईल तसे करतील. आपलं एक मीठ खाल्लं आहे त्यानीं, पण मारवाड्याला ते सोडणार नाहीत."

दुसरे दिवशी सकाळीं धनगरवाड्यावरल्या लोकांनी समनाला डोलीत घालून आणला. त्याच्या डोकीला पागोटे नव्हते. त्याचे धोतर फाटले होतें. बाराबदीच्या चिंध्या उडाल्या होत्या. त्याचे अंगावर वळ होते. त्याचे अंग सुजले होते; पायात काटे बोचले होते. त्याची केविलवाणी स्थिति पाहून पुष्कळांना बरे वाटले. नास्तिकाना देखील परमेश्वरान्चें अस्तित्व पटूं लागले. जमलेल्या गर्दींतील लोकांनी डोलीच्या धनगराना विचारलें, तेव्हां त्यानीं हकीकत सांगितली कीं, "रात्रीं कातोड्यानीं समनागमना व आणखी एक मारवाडी त्याचेबरोबर होता त्याना धनगर-वाड्याजवळ लुटले. मारवाडी पागोटी टाकून पळाले, पण कातोड्यानीं त्याना बेदम मारले. त्यांचा गलका ऐकून धनगर मदतीला गेले. नाहीं तर त्यांनी आणखी मार खाल्ला असता. त्या धनगरानीं समनाला त्याच्या घरी आणले आणि त्या दुसऱ्या मारवाड्याला पारगावला त्याच्या घरीं पोंचते केले."

त्या दिवशीं रात्रभर कातोडी दारू पिऊन बेहोष नाचत होते. दुसऱ्या दिवशीं सकाळीं अंकुशा मनोहरला भेटला. तेव्हा मनोहरने त्याला सारंगखिंडींतील हकीकत विचारली. अंकुशाने कानावर हात ठेवले. तो म्हणाला,

"तुमाला सोडलं अन् आम्ही घराला निघून आलों. हे तानक्याचं काम आहे खास. आमांला त्याची चाहूल लागली म्हणून तर आम्ही तुमच्या

सोबतीला आलो." अकुशा तोंडावर काही विकार न दाखवता बोलत होता. तथापि त्याच्या चकाकणाऱ्या डोळ्यांत मस्करीची लकेर दिसत होती. मग मनोहरने त्याला विनोदाने हुरळता केला.

" तुम्ही आपली शिकार डोंगरगावच्या कातोड्याना द्याल? खिडींत खून पडले असते. काळ्या कड्याखालच्या झाड्याच्या खुनाचा बदला सारंगखिंडींत घेतला असता तुम्हीं."

मग अकुशा कबूल झाला. " रानसईचे कातोडी डोंगरगांवच्या हद्दीत शेतातील भातात लपून मासे मारीत होते. तेव्हा खडकावर तानक्या व त्याचे साथीदार यांनीं मिळून खलबत चालवले. फरारी केवद्याला सारंग-खिंडीत बाप्पाजी आठशे रुपये देणार तेव्हा घाटात गाठून बाप्पाजींचा कसूर काढवायाचा, असें त्यांनीं ठरविलें. बाप्पाजींनी त्याना मारल्याचा खुनस त्याचे मनांत होता. मला गड्यांनीं बातमी सांगितली. मीं कोयाला सांगितले. तो म्हणाला, ' अकुशा पोरा, मी बाप्पाच्या अन्नावर वाढलो आहे. मोठ्या आई दरसाल आपल्याकरता लोणच घालतात; कातोडी उपाशी मरूं लागले की, वाढण देतात. भादव्याच्या महिन्यात आपल्याला काय खायाला असत? त्या वेळीं बाप्पाजी भात देतात. अन् हा समन्या बाप्पाजींना छळतो. अकुशा पोरा, तुझ्या बापाच्या लगिनाला बाप्पाजीनीं पैसे दिले तेव्हा तू पैदा झालास. वरीसभर त्यान चाकरी घातली अन् तुझा बाप मेला. अर्धे पैसे देखील फिटले नाहीत. आता पोरा बघ. आपला बाप्पाजी कसा हरिचंद्रासारखा आहे तो. फरारी मारवाड्याचा पैका देतो आहे अधारांत. आतां तू माझी मसलत ऐक अन् नीट काम कर.' मग आम्ही मसलत केली. आम्हांला घाटांत पाहिल्यावर तानक्या अन् त्याचे लोक पळाले. आमच्या गड्यांनीं विड्या बराबर लपवल्या नाहीत म्हणून आम्ही तुम्हांला दिसलो. आम्ही तुम्हाला सोडल्यावर सारंगखिंड गांठली. तुमच समदं भाषण ऐकलं व केवद्यान पावती दिली तवा आमचा जीव खालीं पडला. तुमची पाठ फिरली नाही तों आम्ही मारवाड्यावर घसरलो. बेटे पागोटीं टाकून पळाले. ते बघ केवद्याचं पागोटं फाडून भिवरी कशी नटली हाय ती!"

" अंकुशा, उद्यां समन्यानें फिर्याद दिली तर तुरुंगात जाल ना!"

" दादा, तुरंगाला कोण भितो ! तुरंगांत तर लई आराम ! वेळच्या वेळेवर खायाला मिळतं. गेले सराईला धाक्या कातोडी गेला होता तीन महिनं. तो लई गमती सांगतो तुरुंगाच्या. वार्डर त्याला भिऊन वाडगाभर कोड्यांस जास्त देई बघा. अन् उजूनं समन्या कांहीं फिर्याद देणार नाहीं. त्याचा केवढा गवसल ना. आमच्या आधीं तो जाईल तुरुंगांत. "

पाचसात दिवसांनी समना बरा झाला, तेव्हां तो रागानें बाप्पाजींकडे आला व बाप्पाजींना अद्वातद्वा बोलूं लागला कीं, बाप्पाजींनीं त्याला ठरवून सारंगखिडींत कातोड्यांकडून मार बसवला व त्याच्या भावाला बुडवलें.

" अरे समना, तुला मारून मला काय मिळालं ? जन्मांत तरी मीं असली गोष्ट कधीं केली काय ? "

" बाप्पा, तूं कातोड्यांना सामील झालास. कर्ज एका हातानं दिलंस अन् दुसऱ्या हातानं नेलस. बाप्पा तुझी पहिली साक सगळी गेली. तू नाहीं तर तुझ्या पोरान आम्मांला मारवलं. तो कातोड्यांचा दोस्त आहे. त्यांच्यांत जाऊन गाणीं म्हणतो अन् नाचतो. पण मी मारवाडी बच्चा आहें. एक दिवस याचा बदला घेईन. "

---

# प्रकरण १५ वें

## शेतकऱ्याची झोपडी

पावसाची ओल हटूं लागली. हिवाळ्याचे कोरडे वारे सागाच्या वठलेल्या जगलांत धोधो करून वाहू लागले. त्यावर सावरीच्या दोड्यातून म्हाताऱ्या उडूं लागल्या. तसा दीपाजीचा थडीताप आपोआप बरा झाला. दीपाजीच्या माळ्यावर चितई येऊन बसली होती. तिने कोंबडी खाण्याचा सपाटा चालवला.

चितईला दीपाजीनें मारली नाहीं. कारण घरात चितई शिरणे शुभ समजतात. सगळ्या गावकऱ्यानीं जमून चितईचा भाग तपासून पाहिला व तिची पूजा केली. चितई अजगरासारखी असते, पण तिच्या डोक्यावर एक उभी रेषा दिसते. तिलाच खेडेगांवचे लोक भांग समजतात व पुण्यप्राणी म्हणून पूजा करतात. सर्व कोंबड्या चितई खाणार. तेव्हा आपणच त्याना आधीं सपवून टाकलेले काय वाईट! शिवाय चितईच्या आगमनामुळे त्याचे भाग्य उदयाला येणार होते. त्या आनदांत दीपाजीनें रोज एक कोंबडी कापून व काळणाच्या इथला दवा आणून थंडी-गारठा साजरा करण्याचा नेम धरला. सराईच्या दिवसांत काळण भात घेऊन दारू विकतात. दीपाजीचे हळवाराचे खायला ठेवलेले भात रोज अधोली-पायलीनें कमी होऊ लागले. गर्वे भात मक्त्यात, कर्जांत अन् वाफेत फिटले होते.

'चितई घरात शिरली, पण भाग्य कुठे व कसे फळफळणार!' दीपाजी विचार करू लागला. सराई तर होऊन गेली. आतां शेताचें भात वाढणे शक्य नव्हते. इंद्र, वरुण किंवा दुसरा कोणी देवदूत दीपाजीला जादूची काडी फिरवून एकदम श्रीमंत करण्याचा मनसुबा धरून त्याच्या झोपडींत आला असता तरी त्याला कोडें पडलें असते कीं, 'या इसमाला श्रीमंत करावयाचे कसे? याला नोटा दिल्या तर उंदीर त्या कुरतडून खाणार; रुपये दिले तर ते ठेवण्याला जागा नाहीं! नाहीं याचेजवळ हंडा, पिशवी ना पेटी!' पण जी गोष्ट देवाला अशक्य वाटली ती काळणाच्या इथला दवा प्यायल्यावर दीपाजीला शक्य वाटली. तरी म्हणतात 'सरकार शेतकऱ्याच्या हिताकरिता दारूबंदीचा कायदा करणार.' दीपाजीला दव्याने स्फूर्ति येऊन कल्पना सुचली.

दीपाजीच्या डोक्यांत भाड्याची गाडी करण्याचे वेड शिरले. गज्या हरकुडा गाडीचा धदा करीत असे. दीपाजी गज्याकडे गेला व त्यानें गज्याचा सल्ला घेतला.

"नकु नकु नकु बाबा. गाडीचा धदा नकु तो. अरं, गाडीमाग धुरळा."

दीपाजीला वाटल, गज्या त्याच्या भाग्याच्या आड येत आहे. त्याला बरकत येणार हे गज्याला सहन होत नाहीं.

बज्या थरकुड्याच्या मार्फत त्यानें आपला एक बैल व गाय देऊन बदल्यात चांगला गाडीला उपयोगी पडणारा बैल घेतला. नतर समनाचे कर्ज काढून तो आणि बज्या इंदोरीच्या बाजाराला गेले व त्यांनीं तेथें दुसरा बैल खरेदी केला.

"वा काय पण जोडी झाली! आतां आवदा वाफन बैल नको घ्यायला तुला. दहा वरीस बघायला नको बैलाकढ." बज्याने मुडी हालवीत बैलाची स्तुति केली. गांवकऱ्यानी पण मुंड्या हालवल्या. नंतर बज्यानें गांवातील एक जुनी गाडी ठरवली. एवढ्या व्यवहारात बज्याने वीस रुपये दलाली खाल्ली. त्या पैशातून बज्याच्या डोकीची कानटोपी जाऊन जरीचा रुमाल आला, लंगोटीची जागा काबरुणानीं घेतली, उघड्या-नागड्या पोरांवर सदरे चढले, घरीं रोज सागुती येऊ लागली. शिवाय इदोरीच्या सफरींत त्याने चैन केली ती निराळीच! परंतु दीपाजीनें पैशाची तमा धरली नाहीं; कारण गाडीचे पैसे ताजे रोजच्या रोज येणार होते.

दीपाजीनें हौसेनें गाडी सजवली. लाडीजानूंनीं बैलाचीं नांवे सोन्या आणि रूपा ठेवलीं. बैलाना पत्र्यान् शिगदोऱ्या न् कासरे, गाडीला चऱ्हाट, शिवळा-जुपण्या, चाकांना वगण, नळ्याला तेल अन् दीपाजीला पैसे मिळाले. पहिली खेप झाली. दीपाजीला समनानें सव्वा रुपया भाडे दिले. दीपाजीच्या झोपडींत आनंदी-आनंद झाला. शेजारणी उसने मागायला येऊं लागल्या. कारण दीपाजी शिरिमंत झाला होता.

दीपाजीला समनाचें दुसेरं भाडें मिळालें. सकाळींच दीपाजीनें अंघूळ घवली, टिळे-टोप केले व खांद्यावर चाबूक टाकून दीपाजी खेपा करण्याला सज्ज झाला. बयनें दीपाजीची न्याहारी तयार करून ठेवली. तांदळाच्या

भाकरीचा खरपूस वास अन् तव्यांतील भुजण्याचा भपकारा शेजारणीच्या नाकांत गेला व दीपाजी बाहेर पडतांना ती अवलक्षणी शिंकूं लागली. दीपाजी थोडा बसला अन् मग त्याने गाडी जुंपली.

खेप बारा कोसांवरून यावयाची होती. वाटेंत उन्हानें एका चाकाची धांव उडाली. दीपाजीनें शेजारच्या गांवातून एक चाक भाड्यानें घेतलें व आपलें नादुरुस्त चाक व धाव घेऊन परत प्रवास सुरूं केला. भाड्यानें घेतलेलें चाक दीपाजीच्या दुसऱ्या चाकापेक्षां लहान निघालें. त्यामुळें गाडी एका अंगावर कलत चालली. दीपाजीचें नशीब महाथोर कीं, गाडीचा आस बरोबर रानसईत लोहाराच्या घरासमोर मोडला. दीपाजीनें दुसऱ्याच्या गाड्यांत पोतीं चढवून गाडी रिकामी केली व नीट करावयास टाकली.

त्या दिवशीं लोहाराकडे कोळसा नव्हता. दुसरे दिवशीं लोहारानें कोळसा आणला तर त्याच्या हाताखालचा भाता मारणारा व घण ठोकणारा इसम फरारी झाला. तिसरे दिवशीं लोहार दारू पिऊन लास झाला. याप्रमाणें या नाहीं त्या कारणाकरितां दीपाजीची गाडी आठ दिवस बैठी राहिली व बैलांना फुकट रतीब द्यावा लागला. दुसऱ्या चाकाची धाव गाडी बैठी राहिली म्हणून उडाली. लोहाराने कणा आणि धावा कंडम केल्या. कण्याचीं टोंकें झिजून गेलीं होतीं व धावा चपट्या होऊन पातळ झाल्या होत्या. दीपाजीने गाडी गहाण टाकून नव्या धावा व नवा कणा केला. तो लोहाराकडून घरीं परत आला नाहीं तो गांवचा सुतार त्याच्या गाडीची लक्षपूर्वक परीक्षा करतांना दिसला.

"काय राहिलाय या साठींत अर्थ! पार कुजून गेलं हाय सामान! दीपाजीबोवा, येवींतेवी तुम्ही गाडी नीट करतां तर साठी घ्या ठोकून नवी मग तीन वरीस तिच्याकडं पघायाला नको. काय हो झुर पाटील, खर कीं नाय?"

"हां हां, नवा सरंजाम का कुनाला ऐकतो?" झुर पाटलानें सुताराला पुष्टि दिली. कारण त्याला सुताराकडून थोडक्यात काटणाचा नागर ठोकून घ्यावयाचा होता.

दीपाजीनें सुताराला गाडीची साठी नवी करावयाला दिली. दीपाजीला नवे कर्ज झालें. गाडीची साठी, धावा, कणा नीट झाले. पुन्हां गाडी चालू झाली. भुजण्याच्या कोड्यांसाऐवजीं दीपाजीच्या झोपडींत भाजलेला बोबील दरवळूं लागला. शेजारणी दीपाजीची खोड मोडली म्हणून खूष झाल्या व पाणोठ्यावर दीपाजीच्या गाडीची चेष्टा करूं लागल्या.

परंतु गाडीला पुन्हां चांगलें भाडें मिळूं लागलें. दीपाजीच्या व त्याच्या कुटुंबाची आशा पालवली. कर्जांचे पैसे जाऊं लागले. शेजारणीची दांत-खीळ बसली. त्या पुन्हां उसन्याला दीपाजीच्या इथें खेपा करूं लागल्या. गाडीच्या तीनचार खेपा झाल्या.

पांचव्या खेपेला दीपाजीच्या चाकाचा एक आऱ्या उडाला. दीपाजी गाडीतळांत मटकन बसला. दुसऱ्या एका गाडीवानानें त्याला धीर दिला, "अरं, तुझा एकाच चाकाचा एक आऱ्या मोडला अन् माझ्या दोन्ही चाकाचे दोन उडाले अन् एका चाकाचा पाट्या फुटला. मग मीं काय करायच ? गाडीचा धंदाच असा आहे. धावा उडायच्या अन् कुन्ह्या पडा-यच्या, कणे मोडायचे, आरे निखळायचे, पाटे फुटायचे, म्हणून गाडीवान डरतो काय ? चल, जूप गाडी माझ्या सामनी."

दीपाजीनें गाडी जुपली. वाटेंत त्याला शेंकडों गाड्यांच्या रांगा भेटल्या. युक्रेनमधील धीर गभीर कोसॅक्सप्रमाणें ते मुरब्बी गाडीवान नवख्या दीपाजी-कडे खाद्यावर चाबूक टाकून तुच्छतेनें पाहत होते. दीपाजी त्यांच्याकडे तुलनात्मक दृष्टीनें पाहूं लागला. आतांपर्यंत त्यानें शेतीच केली होती. त्याला गाडीवानाची नजर आली नव्हती. त्याला गाडीच्या खुब्या कळल्या नव्हत्या. आतां त्याला एक एक नवी गोष्ट दिसूं लागली. त्याला भेटणाऱ्या बहुतेक गाड्या शेतकऱ्याच्या होत्या आणि जवळ जवळ प्रत्येक गाडीची त्याच्या गाडीसारखीच—किंबहुना जास्त भयंकर—स्थिति होती. तरी त्या गाड्या मजला मारीतच होत्या. बैल रडत रडत चाललेच होते आणि गाडीवान बेदरकारपणानें मागीलपुढील गाडीवानांशीं गप्पा मारीत होते. रस्त्यात कांहीं ठिकाणीं गाड्या उलथून पडल्या होत्या—कोणाचे कणे मोडले होते, कोणाचीं चाकें खचलीं होतीं, कोणाच्या धुऱ्या मोडल्या होत्या ! दीपाजीला

हीं दृश्ये पाहून समाधान वाटलें कीं, आपली एकट्याचीच अशी दुर्दशा नाहीं. गाडीवानाची दीनवाणी दुनिया पाहून त्याला धीर आला.

गाडीच्या आणखी चार खेपा सुखासमाधानानें झाल्या. गाडी हाकताना आणखी आरे किंवा पाटे उडतात काय असा दचक दीपाजीचें काळीज धडधडवी. परंतु दीपाजी या मोडतोडीला आतां चागलाच निर्ढावला होता. त्यातल्या त्यात चार आण्यांचा बेवडा रस्त्यावरच्या टाव्हरानात मारला, कीं या काळज्याचा गाडीवानाना बिलकूल त्रास होत नाहीं, असें जेव्हां इतर गाडीवानांनी त्याला शिकवले तेव्हां तो निर्धास्त गाडी हाकू लागला. गाडीचे सोळाबारा होऊ लागले. कारण पेंडीचा-पेळ्याचा भाव वाढला. माल कमी व गाड्या जास्त झाल्या. त्यामुळें गाडीच्या भाड्याचा दर कमी झाला. पाच गाड्यांची वर्दी असली तर पन्नास जमू लागल्या.

पुढे गाडीच्या बाबतीत जे घडावयाचे तें घडूं लागले. बैलाच्या पऱ्या पडल्या. गाडीचे तीन आरे आणि दोन पाटे निखळले. दीपाजीला दोन्ही चाकाच्या धावा उतरवून आरे-पाटे दुरुस्त करावे लागले. आरेपाट्याचा खर्च आणि धावा परत चढवण्याचा खर्च व गाडीची कमाई याची बरोबरी झाली.

परतु ह्यानंतर दोन्ही चाकें बांकली. गाडीवानाची समिति बसली व सर्वानुमते चाके उलट्या बाजूने घातलीं कीं बाक जाईल असें ठरलें. चाकाचा बांक गेला, परतु नवे घातलेले व जुने असे आणखी चार आरे-पाटे मोडले. पुन्हां धावा उतरवल्या, पुन्हा नवे आरे-पाटे घातले, पुन्हा धावा चढवल्या. असें तीन वेळां झाले व चाकाचे सर्व आरेपाटे नवे बनले. तुब्याशिवाय सर्व चाकें नवीं झालीं. दीपाजीची गाडी बागडीसारखी खणखण वाजू लागली. गाडी रस्त्याने गेली कीं शेतकरी तिच्याकडे बघतच राहत.

दुर्दैवी दीपाजीचीं चाकें पुन्हां वांकलीं. तेव्हां तो चिडून लोहाराकडे चाकें घेऊन गेला.

"मी म्हणतच होतो तुला कीं एक गोम राहिली म्हणून! तेव्हढ्या तुब्याच्या आटेबांगड्या आवळल्या असत्यास तर चाकाना काय बी झालं नसतं. पण तुम्ही आठ आण्याच्या पैशाकडं पाहणार!"

" मग पहिल्या प्रथम का नाय सांगितलंस ? " दीपाजी चिडून लोहारावर ओरडला.

पुन्हा लोहाराने धावा उतरवल्या, चाक ठोकलीं, आटेत्रांगड्या आवळल्या व धावा चढवल्या.

" आतां निर्धास्त जाऊं ना ? " पैसे देताना दीपाजीनें लोहाराला हडसून खडसून विचारले.

" काय बी बघायला नको आतां. तूं चारी महिने पावसाळची गाडी हाक."

दीपाजीनं गाडी नेली. गाडीमुळे दीपाजीचें कर्ज खूप वाढले. तेव्हा जास्त भाड्याच्या आशेने त्याने गाडी कोळशावर लावली. पहिल्या दिवशीं जेव्हां तो घरीं आला तेव्हां त्याला पाहून त्याचीं मुले भीतीने रडू लागलीं. तीं कांहीं तो आपला बाबा म्हणून कबूल करीत ना. इतका तो कोळशाचे व धुळीचे चेरीब्लॉसमने भूतासारखा काळा झाला होता. त्याचे कपडे फाटून त्याचीं काळीं लकतरें बनलीं होतीं. त्यानें जेव्हां आघोळ केली तेव्हा त्याचीं पोरे त्याच्याजवळ आलीं. थोडे दिवसानीं कोळशाचे कचक्यात आरेपाटे पुन्हा हालूं लागले. गाडीवानांची पुन्हां बैठक बसली. त्यानीं गाडी दुसऱ्या लोहाराकडे नेली. त्याने गाडीचीं चाकें चिकित्सक नजरेनें तपासलीं.

" कोणी गाडी दुरुस्त केला ? तो लोहार होता कीं हजाम होता ? " नवा लोहार ओरडला.

" काय झालं ? " दीपाजी प्रभृति गाडीवानांनीं पृच्छा केली.

" अहो, हे जुने तुंबे पार कुजलेत. यांत तुम्ही कसेहि आरे बसवलेत तरी ते ढिले पडायचेच. तुम्हीं लाख वेळा चाक ठोकलंत तरी तें बसणारच ! "

" मग याला उपाय ? " गाडीवानांनीं विचारलें.

" नवा चाकजोड घ्या. माझ्याजवळ असा फाकडू आहे बगा. "

दीपाजीची गाडी गर्रकन वळली. हो, हो, करून गाडीवान गाडीमागें धांवले. त्यांना वाटलें बैल उधळले. परंतु तसें काहीं झालें नव्हते. दीपाजीने बैलांना खरपूस तडाखे दिले. गांवात आल्याबरोबर त्यानें बैल विकले व गहाणदारांचे पैसे दिले; गाडी विकली व त्याचा एक टोणगा विकत घेतला.

तरीहि समन्याचे पैसे राहिलेच. समन्यानें दीपाजीची गांवठाणांतील जमीन विकत घेतली व त्या जागेंत दिपाजी रुपया भुईभाड्यानें राहिला. पुढे दीपाजी पूर्ववत शेतावर टिंगू लागला.

" आतां सराईशिवाय डोकं नाय निघणार. कुळंब्याला शेतीबिगर धंदा नाय. " दीपाजीनें म्हणावें.

" तरी मी सांगत होतों. नकु नकु नकु तो गाडीचा धंदा नकु. गाडी-मागं धुरळा. " गज्या हरकुडा दीपाजीला बोले.

" गाडीमागं धुरळा. " बाजूचे शेतकरी गज्याची साथ करीत.

---

## प्रकरण १६ वें

# कडेलोट

वाजून गाजून राहिलेले पाव्हणे एकदांचे आले! रावबहाद्दुरांनीं सुभद्रेची निरनिराळ्या तऱ्हेने ओटीवर परीक्षा घेतली तर रावबहाद्दुरबाईनीं सुभद्रेच्या अंगाकेसांवर हात फिरवून तपासणी केली. सडपातळ रावबहाद्दुरांचे मते सुभद्रा लठ्ठ ठरली तर लठ्ठ रावबहाद्दुरणीनें तिला किरकोळ अंगाची ठरवली. ओटीवर तिला गोरी म्हणून सर्टफिकीट मिळालें तर स्वयंपाकघरांत तिची काळ्या-सावळ्यात जमा झाली. अंधेऱ्या कोठीच्या खोलीची खिडकी ओटीवर आली होती. रावबहाद्दुराचा निर्णय ऐकण्याकरतां राजसबाई किती तरी वेळा त्या खिडकींत येऊन उभ्या राहिल्या. स्वयंपाकघरांतून कोठीची खोली, अशा खेपा मारून त्याची पुष्कळ पायपीट झाली.

जेवणखाण झाल्यावर मनोहरनें रावबहाद्दुराना आपलें सर्व घर दाखवलें; बाप्पाजींचें भूषण अशी राजपाटी दाखवली. रावबहाद्दुर प्रत्येक गोष्ट बारकाईनें आणि चौकस बुद्धीनें पाहात होते. जणूं बाप्पाजींची व आपली सोयरीक जुळली तर आपल्याला त्यातील काय लांबवतां येईल याची ते नोंद करीत होते. आपल्या चादीच्या मुठीच्या काठीनें त्यांनीं घराचे वासे देखील ठोकून पाहिले. तेव्हां मनोहरने त्यांना ते सागाचे असून भरीव आहेत असे सागितलें. रावबहाद्दुर मोठ्यानें हंसले.

"हो: हो: हो. तुम्ही यंग मेन बुढ्ढ्या लोकांना ऐकायाचे नाहींत. तुम्हीं छान विनोद केलांत. बडें घर आणि पोकळ वासा."

अंधू देखील रावबहाद्दुरांच्यावर खूप चिडला. त्यांतल्या त्यांत रावबहाद्दुरीणबाईनीं त्याचीं बैलाटं खूप दमवलीं, म्हणून तो रागावला होता. बाईनीं शेजारच्या मोरयाचे दर्शन घेतलें; देवीचें स्थान पाहिलें. अशीं आजूबाजूचीं सर्व ठिकाणे त्यांनीं पाहून घेतलीं व शेवटीं बाप्पाजींना पांच हजरांचा आंकडा सांगितला.

"माझ्या डोक्यावरून पाणी जातें. माझी तीन हजारांपर्यंत उडी आहे."

"तीन हजार देखील आपल्याला जड आहेत." राजसबाई कोठीच्या खिडकीतून बोलल्या.

"तुम्हीं घरात जा. हें बायकांच काम नाहीं. माझ्या तोंडातून शब्द गेला तो गेला. वाटेल ते करून मी शब्द पुरा करीन."

बाप्पाजींनीं रावबहाद्दुरांची खूप मनधरणी केली. परतु ते काही हुंड्याचा आकडा कमी करीत ना. शिवाय मुलगा विद्येत व दिसायला जेमतेमच होता. फक्त मोठी आशा म्हणजे वडिलांची इस्टेट. अखेर, लग्नाच्या वाटाघाटी फिसकटल्या व पाहुणे आले तसे शेवटची मेजवानी खाऊन अधूच्या गाडीनें स्टेशनपोच झाले!

"दादा, बाधावर गारी देऊं उलटवून? अशी खोर मोरेल." चिडलेल्या अंधूनें स्टेशनवर गाडी नेण्यास जुपली तेव्हा मनोहरजवळ परवानगी मागितली.

"छट्! अधू, आपल्याकड ने पाहुणे आले आहेत. आपण बोलावलं म्हणून ते आले."

"पाव्हण हायती! धमेलभर शिरखंड खाल्ला, बासुंदी वरापली. अन् त्येनं गोटपाटल्याच हात उरवून काय सागितलं? आमाला नगं अशी सोन्यावाणी मुलगी. पैका देऊन नाय म्हंगते. आन् मी राईच्या किती नाकधुऱ्या कारतों."

"खरच अधू, म्होतुराच काय झाल?"

उत्तर देण्याचे ऐवजीं अंधूने बड्याच्या नाकाडावर चाबकाच्या दांड्याचा फटका मारला. मनोहरनें ओळखलें की अधू चिडला आहे.

"फिसकटलं वाटतं?"

"तो वादी हाय ना?" विटलेल्या खोट्या चांदीचा करगोटा सावरीत अंधूनें उत्तर दिले. जत्रेत दुकानदाराने अंधूला फसवून त्याचे गळ्यात खोटा करगोटा बाधला होता.

"कोण?"

"गज्या हरकुरा."

"अरे त्याची बायको मरून पंधरा दिवस झाले नाहींत तों लगेच पाट लावतो होय?"

" पाट नाय लावत. मीं सवतां पाहिलं. तिच्याशीं लारीगुरी काय लावतोन्, तिन शिणाची पाटी भरली कीं, हा चालला तिच्या डोक्यावर उचलून द्यायला. पन मनुदादा, मी हवी त्याची शपथ खातों. आवदा सोरनार नाय. " अंधूने जोकाड्यावर चाबकाचा दांडा मारला. अंधूला ऑथेल्लोसारखे संशयानें पछाडले होते.

अधूनें ऑथेल्लोची आणखी नक्कल करून दाखवली असती. परंतु तितक्यात बाप्पाजी पाहुण्याना गाडींत बसवण्याकरितां आले.

" पुन्हां एकदा आपण विचार करा अन् आम्हाला पदरांत घ्या. " असे बाप्पाजी हात जोडून रावबहाद्दुराची विनवणी करतात न करतात तो अधूने बैलाचे अंगावर चाबूक ओढला. 'हो हो ' करून अंधूला सबूर होण्यास बाप्पाजी ओरडू लागले. रावबहाद्दुर व त्याची पत्नी पण अधूला गाडी थांबवण्यास सांगण्याची आपली पराकाष्ठा करू लागल्या. त्यांचीं फक्त बोलण्याकरिता उघडलेलीं तोंडे लोकाना दिसत होतीं. ते काय ओरडत होते ते गाडीच्या खडखडाटात कोणाला ऐकू गेले नाहीं. त्या दिवशीं अंधूने आपल्या सारथ्याची कमाल केली. क्षणात त्यानें गाडी गावाबाहेर काढली व मुद्दाम दगडाळीच्या रस्त्याने पिटाळली. अधूचे बैल चारी पायावर उडाले. रावबहाद्दूर व रावबहाद्दूरीणबाई यांनीं अंधूच्या अंगावर ओरडण्यास तोंड उघडलें कीं, त्याचे 'अ अ अ अ ' होऊन दातांखालीं जीभ सापडे. रावबहाद्दुराना आपली हृदयक्रिया थांबणार असे वाटले. त्या दोघा नवराबायकोच्या पोटात वायगोळे उठले व त्याचे प्राण कासावीस झाले. तरी अधूने त्याच्या बाजूला आपला फुटका डोळा केला नाहीं स्टेशनवर पोचल्यावर रावबहाद्दुर जोडप्याला आपला पुनर्जन्म झाल्यासारखा वाटला. जेमतेम अधूच्या मदतीने ते गाडीखालीं उतरले व आगगाडींत जाऊन बसले. लग्न फिसकटलें हे बरें झाले असे त्याना वाटले. पुन्हा या गावचे तोंड पाहणार नाहीं अशी त्यांनी प्रतिज्ञा केली. अधू पोस्त मागण्याकरिता रावबहाद्दुराच्या डब्याजवळ उभा राहिला.

" मी बैलाटं मारलीं म्हून गारी सांपरली. " अधूनें पोस्ताची प्रस्तावना केली. परंतु रावबहाद्दुरानीं अधूकडे तिरपी नजरदेखील केली नाही. त्यानीं अंधूला एक पै पोस्त दिलें नाहीं.

" नाय पोस्त तर नाय. पन खोर मोरलीन् कीं नाय?" अंधूनें हें सगळें वर्णन मनोहरला सागितलें तेव्हां त्याचे हसतां हंसतां पोट दुखलें. राहीमुळें त्याचे मनाला आलेली उद्विग्नता निदान आठ दिवस तरी नाहींशी झाली.

पुन्हा राही अधूच्या डोक्यांत आली. शेणखईशेजारील भाताच्या तुसाचा ढीग उपसताना पांढऱ्या भुसकटानें माखलेला अंधू शेणखई-पलीकडील परड्यांतील आपल्या प्रणयदेवतेची लावण्या म्हणून आराधना करी व मुद्दाम काम लांबवून तेथे वेळ काढी व 'आंवदा सोरनार नाय' म्हणून प्रतिज्ञा करी. परंतु त्याच्या प्रणयदेवतेनें त्याला कौल देऊं नये. मग अधू गज्यावर चिडून गोठ्यांत जाई. गोठ्याच्या खांबाच्या खोबणींत लपवलेली तंबाखूची डबी काढी व त्यांतील ऐन्यांत आपलें रूप पाही. गज्यापेक्षां आपण कुठें कमी आहोत हें तो निरनिराळे प्रयोग करून पडताळी. तो दात विचकी, ओठ व जीभ बाहेर काढून पाही. जत्रेंतील चिमट्यानें दाढींतील पाढरे केस उपटी. यांत अंधू तासन् तास घालवी. त्यामुळें कामाचा खोळंबा होई. ही गोष्ट बाप्पाजींच्या लक्षांत आली. ते गोठ्यांत गेले अन् त्यांनीं अधूला असल्या माकडचेष्टा करतांना पकडलें.

" अरे अंध्या, शिववाहना, गौरीनंदना, शंभ्या, आरशांत काय पाहातोस डोंबल तुझ! मोठा सुंदरमाधव लागून गेलास कीं नाहीं?" बाप्पाजींनीं अंधूची निर्भर्त्सना केली. " जा, ती शेणाची गाडी राजपाटीवर ने."

" आता नाय पुन्हां पाहनार आरशींत. बाप्पाजी मला बोलले. आता नाय पाहणार. आरशीची काय किंमत!" अंधूनें दगड घेऊन काचकाच तंबाखूची डबी बाप्पाजींसमोर फोडून टाकली व शेणाची गाडी भरली होती तिला बैल जुपले. मग खांद्यावर चाबूक टाकून त्यानें गाडी हांकली. जाता जातां तो मनोहरला हळूच म्हणाला, "पन् आंवदा सोरनार नाय."

" हा इकडून कुठून गाडी नेतो राजपाटीवर?" बाप्पाजी आश्चर्यानें स्तभित झाले.

" हल्लीं रोज नेतो इकडून गाड्या. धुमधडाका लावलाय त्यानं." बज्या थरकुडा तिथं उभा होता त्यानें माहिती सांगितली.

" कां रे?" बाप्पाजींनीं विचारलें.

" राहीचं घर या बाजूला हाय. तिचं दरसान घडतं ना त्याला ! "

" पण गाडी उलटून बैल मारील अन् आपण मरेल ना ! " बाप्पाजी बोलतांना थांबले.

दरम्यानच्या वेळांत अंधू राहीच्या घरासमोर आला होता व मोठमोठ्यानें लावणी म्हणत होता. बाप्पाजी अंधूचा सूर ऐकून हंसले व म्हणाले–

" प्रेम वेडें आहे. " बाप्पाजींनीं सहज मनोहरकडे पाहिलें. मनोहर ओशाळला व तिथून निघून गेला.

सबंध दिवसांत बाप्पाजींना मनोहरनें तोंड दाखविलें नाहीं. त्याला वाटलें, बाप्पाजी त्याला मुद्दाम टोंचून बोलले. पण वास्तविक बाप्पाजींच्या ही गोष्ट ध्यानींमनीं नव्हती.

संध्याकाळीं तो खळ्यावर गेला तेव्हां शेताच्या बांधाला अंकुशा बिळात वेलींचे फोक घालून खेकडी गिरवीत होता. तो मनोहरला आडवा झाला व म्हणाला,

" दादा, तुकाराम अन मुकुट एक झालेत. "

" तुला काय माहीत ? "

" जत्रेच्या दिवशीं मी ऐकलं. तुकारामानें मुकुटला प्यायला शिकवल हाय. जत्रेत त्यांचं खलबत सुरू झालं. पन तो लष्करचा माणूस आला अन् तें थांबलं. तवापुन मी त्यांच्या पत्त्यावर हाय."

" काय त्यांचा विचार आहे ? "

" तें कळत नाय. पन दगाफटका हाय त्यांचे मनात. तुमाला नाहीं तर लाडीला. रोज ते रानांत खलबतं करतात; दारू, माडी पितात. गेले आठ दिवस ते लाडीच्या मागावर हायती. पन लाडी रानांत गेली नाय. आज ती गेली. तिचे मागोमाग ते दोघेजण गेलेत. मी टेहळ ठेवून हाय."

" छट्, मुकुट असं करणार नाहीं. "

" दादा, हें येड हाय. मुकुट अंधळा झालाय ! आन् हा फारिस्ट दीड लहऱ्या हाय; झडा कांबळा हाय; घोणस हाय. "

मनोहरच्या डोक्यांत रक्त चढलें. त्यानें काळ्या कड्याची वाट धरली.

" दादा, रिकाम्या हातानं जाऊं नका. " अंकुशानें मनोहरला सूचना केली.

मनोहरनें अंकुशाच्या हातांतील बांध उकरण्याचा खोचेरा घेतला व तो तडक रानांत गेला. तो काळा कडा चढून नीट वर आला. तेव्हा सात पायऱ्याखालील खडकाच्या अगातील पाऊलवाटेवर मुकुट आणि लाडी बोलत बसलेली त्याला दिसली. अनवाणी, पाय न वाजवतां तो त्याचेजवळ या खडकामागून त्या खडकामागें लपत गेला. एक घरासारखी धोंड अर्ध्या डोंगरात घसरताना लटकून राहिली होती. तिच्यामागे उभा राहून तो त्याचे भाषण ऐकूं लागला. त्या वेळीं रानातून एक शीळ आली. मुकुट व लाडी बोलत होते त्याना ती ऐकू आली नाहीं. तसेंच मनोहर लपत लपत जाण्यांत व्यग्र होता म्हणून त्यालाहि ती ऐकूं गेली नाहीं.

"लाडे, मला तूं कां छळतेस? मला तू कशाला आशेला लावलंस?'

"मी कधीं आशा दाखवली?"

"काय? मग तें समदं खोटें होतं? मीं पावा वाजवला कीं, तूं आपली गुरं माझ्याकडं घेऊन यायचीस. अन् मग तुझीं गुरं अन् माझीं गुर संगसंग एक व्हायचीं. मग आपण धोंडीवर बसून अंगाला अंग लावून तीं चारायचीं. मीं पावा वाजवायचा अन् कवळीची-ढवळ्याची झोंबी चालायाची अन् पुन्हा गोडी व्हायची अन् मग आपण हंसायचं. तूं न मी शिदोऱ्या एके ठिकाणीं सोडायच्या अन् एका झऱ्यावर पाणी प्यायच. हें पण खोटं? तुझीं गुरं मीं संभाळायचीं, हे पण खोटं? अन् पाऊस आला कीं, मी तुला माझ्या इरल्यांत घेई हें पण खोटं?"

"हें खरं होतं. मग तू लगीन कसं केलंस?"

"माझ्या बानं माझं लगीन लावलं."

"मग माझा बा पण माझं लावील."

"समदं खोटं. मनुदादा आल्यापुन तूं बावचळलीस."

"ते तर आकाशांतील चंदर आहेत. ते मला कसं मिळतील?"

"लाडे, लाडे, तूं माझी हायस! मी कोणाला घेऊन देणार नाय तुला." मुकुटनें लाडीचा हात पकडला व तो लाडीला ओढूं लागला.

"मुकुट, तूं नि मी लहान होतों. तेव्हां मला काय समजत होतं? तेव्हांच्या गोष्टी आतां कशाला काढतोस? मी तुला खरं सांगतें, माझ्या

मनांत पाप नव्हतं. आपण हंसलों, बसलो, रुसलो, खेळलों. कारण आपण बाळपणाचे मैतर म्हणून संगं सग वाढलो. मग तूं आतां असं कां करतोस ?"

"मी काय करतो ? अन् यांत काय पाप हाय ? मी तुझ्याशीं लगीन लावीन."

"अन् पहिली बायको वाईट हाय ? माझ्यापरीस सुंदर हाय."

"मला नाय आवडत."

"मला टाकून तूं दुसरी करशील."

"तें मी जाणत नाय. तू माझ्याबरोबर चल." मुकुट लाडीला जोरानें ओढू लागला.

"मी नाय येणार. मुकुट, सोड मला. वाट अवघड आहे. मी पडेन."

मुकुटने लाडीला जबरदस्तीने पाटकुळी घेतली व तो कडा वेधूं लागला. तेव्हां मनोहर त्याला आडवा झाला व त्यानें खोचेऱ्याचा दांडू मुकुटवर उगारला.

मुकुटने लाडीला खालीं ठेवले व त्या कर्वतकड्यावर तो मनोहरशीं झटापट खेळूं लागला. मुकुट जिवावर उदार होता व मनोहर स्वतःचा व मुकुटचा तोल कड्यावरून जाणार नाहीं या प्रयत्नात आपली शक्ति खर्च करीत होता. ही संधि साधून मुकुटने मनोहरला खालीं ओढलें व तो त्याला कड्यावरून खालीं लोटू लागला. तेव्हा लाडी मनोहरच्या मदतीला धावून आली. तिनें मुकुटची कंबर धरुन त्याला ओढले. इतक्यांत मुकुटने मनोहरला कड्याच्या कंगोऱ्यावर दडपले. मनोहरचा फक्त एकच पाय कड्यावर राहिला. आतां तो खालीं जाणार तो लाडीनें मुकुटला सोडले व मनोहरला धरले. त्याच वेळीं मुकुटनें आपले शक्तिसर्वस्व खर्च करून मनोहरला खालीं लोटले. लाडीनें मनोहरला मिठी मारली. मग ते दोघेजण काशाच्या गवतावरून कड्याखाली घरंगळत गेले. वाटेपासून धोदाणीपर्यंत थोडासा उतार होता व तेथून कडा खालीं नीट तुटला होता. कडा व धोधाणीची सोंड यांचेमध्ये दाट कारवटाची पट्टी उगवली होती. एक-मेकांना मिठ्या मारलेली मनोहर-लाडीची मोट कड्याच्या वरंगळीवरून लोटत लोटत कारवटांत शिरली. त्यांच्या अंगानें कारवी काडकाड मोडल्या !

त्या आवाजाचे भीषण प्रतिध्वनि धोदाणीच्या घुमटांत घुमून कड्याकड्यावर पडसादूं लागतात न लागतात तों धाप करून एक प्रचंड आवाज आला. त्या आवाजानें कड्यावरचीं माकडे भुभुःकार करूं लागलीं. कड्यावरून खालीं डोकवून पाहणाऱ्या मुकुटचे डोळे गरगरले. मनोहर व लाडीचा कडेलोट होऊन पुरतें काम निघालें असें समजून तो तेथून घाबरून पळाला. त्याच वेळीं कड्याचे वरचे बाजूला लपून बसलेला तुकाराम पण पळत सुटला. या सर्व आवाजाच्या कड्यावरून उमटणाऱ्या ध्वनिलहरी क्षीण होत जाऊन दरींत शातता झाली.

खालच्या झाडींत होणारा पक्ष्याचा किलबिलाट थांबला. कारवीच्या दरवळाने सुवासाचा कल्पात माडला. त्या सुवासात रात्र आपली छाया पसरूं लागली. आकाशांत असख्य तारे लकाकूं लागले. रात्रीनें बुरख्याचे चंद्रकलेच्या पदराखालीं काळ्या कड्याला झाकून घेतलें. कालिया डोहा-प्रमाणें काळोख काळदरींत भरून राहिला. कारवटांत अडकलेला मनोहर शुद्धीवर आला तेव्हां त्याला आपल्या छातीवर दडपण आहे असें आढळले. त्यानें चापसून पाहिलें तों त्याला मृदु शीतलांगाचा स्पर्श झाला. गडबडा कड्याखालीं लोळत येतांना मनोहर कारवटांत अडकून राहिला होता. परंतु मारामुळे त्याची शुद्ध गेली होती.

बेशुद्ध होत असताना त्यानें कड्याखाली कांहीं तरी पडल्याचा आवाज ऐकला. त्याला वाटलें लाडी पडली. परंतु त्याच्या धक्क्यानें धोडा कोसळला त्याचा तो आवाज होता. आता त्याला ज्ञान झाले कीं, लाडी तर त्याच्या वक्षःस्थलावर जिवत आहे. तिचें नाक त्याच्या ब्ल्यू सर्जच्या कोटाच्या वरच्या खिशांतील लव्हेंडरनें सुवासित झालेल्या रुमालाजवळ आलेले आहे. तिच्या श्वासोछ्वासाचा त्याला वारा लागत आहे. तिच्या सुखकर स्पर्शाचा त्याला अमृतानुभव येत आहे. त्यानें तिला आपल्या बाहुपाशात घेतलें. तिचे दोन्ही हात सावरले. थोडा वेळ तो आकाशाकडे पाहत राहिला. तेथें नक्षत्रें द्राक्षांच्या घोसाप्रमाणे लटकली होतीं. त्या गिरिकंदरातील नितात शाततेंत, परागमय अंधेरात, त्यानें त्या रानफुलाला आपल्या हृदयाजवळ धरले. इतक्यात एक भयंकर विचार त्याचे मनात आला व त्याचे अंगावर काटा उभा राहिला. लाडी बेशुद्ध

आहे आणि तो आणि लाडी कडेलोटाचे तोंडाशीं कारवीना अडकून राहिले आहेत. त्यानें किंवा लाडीने जरा हालचाल केली किंवा आतांपर्यंत तग धरून राहिलेल्या त्याच्या कुशीखालच्या कारवी मोडल्या तर ते दोघेहि गडगडून खालीं जातील व त्या दोघांचा कपाळमोक्ष होईल. मनोहर लाडीला दृढ धरून तसाच पडून राहिला. कारवीच्या सुवासांतून आता आणखी निरनिराळे सुवास येऊं लागले. आंब्यांच्या बहरणानें कहर केला. त्याचे मागून फणशीच्या कुयऱ्यांचा वास आणि त्यामागून उंबर यांचे राकट सुवास. मधूनमधून सायलीचा नाजुक दरवळ निघे. कुडाकरवद व इतर जंगलीं झाडें यांनीं पण वसंतपंचमी सुरू केली! शहाजहान बादशहाच्या बागेंत असले सुगध सुटले नसतील! निरनिराळ्या मदिरांच्या मिश्रणांप्रमाणें सुगंधाचीं मिश्रणे बनू लागलीं व त्याच्या सुगंधी अमलानें मनोहरचा जीव हैराण झाला. काळोखाच्या कालिया डोहांत सुगंधाचा दर्या उसळला. त्या परागमय स्वप्नसृष्टींत एका बाजूला मृत्यू होता, तर दुसऱ्या बाजूला प्रेममय जीवन होतें.

इतक्यांत पश्चिमेकडील डोंगर पांढरे दिसूं लागले. कारण काळ्या कड्यामागून चंद्रोदय होऊं लागला. यमुनेच्या प्रवाहावर गंगेचा प्रवाह पसरावा तसें दरींतील काळोखावर काळ्या कड्यामागून पडणारें चांदणे पसरलें. त्या उजेडांत मनोहरला त्याचे डोक्यावर कारवाटातून घुसून आलेला पुष्पमंडित सायलीचा वेल दिसला. इतक्यांत चंद्र काळ्या कड्यावर ढळला. मनोहरनें तो वेल पडल्या पडल्या ओढून पाहिला. त्याचीं मुळे बळकट होतीं. मनोहर त्या वेलाला धरून उठला. त्या वेळीं सायलीनें त्याचेवर पुष्पवृष्टि केली.

मनोहरनें लाडीला बाजूला निजवले. आता चांदणे स्पष्ट पडलें होतें. कडेलोटापासून मनोहर बराच वर होता शिवाय आधार घ्यायला बळकट दगड पण खालच्या बाजूला होते. मनोहरने लाडीचे अंग व तोंड तपासून पाहिलें. तिला जखम वगैरे कांहीं इजा झालेली त्याला आढळून आली नाहीं. परंतु ती निपचित पडून राहिली होती. मनोहरनें तिच्या अंगाला हात लावला. ते उबदार होते. तिचा श्वासोच्छ्वास पाहण्याकरितां तो चंद्रिकेनें उजाळलेल्या त्या मुखकमलावर वांकला तेव्हां त्याला लाडीचे

डोळे अर्धोन्मिलित दिसले. हास्याची एक छटा पण तिच्या तोंडावरून सरकली. इतक्यांत लाडी विगलित अंग करून निश्चेष्ट पडली. मनोहर घाबरून खालीं वांकला, तेव्हां लाडीनें त्याला दृढालिंगन दिलें व त्याचे चुंबन घेतलें. लाडी लकेर करून हसली त्यानें दरी आणि कडे घुमले.

" लाडे, मला वाटलं, तूं बेशुद्ध आहेस !"

" छट्. तुम्हीच बेशुद्ध झालां. कड्याच्या टोकावरून मीं मोठ्या शिकस्तीनें तुम्हांला ओढून इथं आणून ठेवलं. "

" मग तूं ढोंग केलं होतंस ! " मनोहरनें लाडीला पुन्हां जवळ ओढले.

इतक्यांत दोन सावल्या त्यांच्याजवळ आल्या. अंकुशा व भिवरी त्यांचा शोध करीत आले होते.

" दादा, आम्हांला वाटलं तुमचा घात झाला. मघापून आम्ही तुम्हांला शोधीत आहोंत ! "

मग भिवरी व अंकुशा यांनीं लाडी व मनोहर यांना सुरक्षित वाटेनें संभाळून खालीं आणलें. वाटेत त्यांना डोक्याला कानटोपी व गळ्याला गळपट्टा गुंडाळलेले तात्या गड्याबरोबर कंदील घेऊन राखणीकरितां जातांना दिसले.

" हं हः हः काय नाय. काय नाय. ठीक चाललं आहे. " असें त्यांनीं मनोहर-लाडीकडे पाहून उद्गार काढले. त्याचा प्रणय पाहून 'नवलाईची नवलपरी, कोबडीच्या गळ्यांत सरी ' असें तात्यांना वाटले.

---

## प्रकरण १७ वें

# अंधूचें हितगुज

कर्वत कड्यावरच्या हकीकतीचे दुसरे दिवशीं गावात गोंग उठली कीं, मुकुट रात्रीपासून गांवातून नाहींसा झाला. केसूतात्यानीं लाडी-मनोहर याच्याबद्दल गावात कंड्या पिकवल्या. त्या बाप्पाजींच्या कानांपर्यंत गेल्या. बाप्पाजींनीं अकुशा व भिवरी याना खोदखोदून विचारलें, परंतु ते फुटले नाहींत. मुकुट नाहींसा झाला होता व तुकाराम खरी गोष्ट कुणाला सागणें शक्य नव्हतें. त्यामुळें कर्वत कड्यावर आदल्या रात्रीं काय घडलें हें बाहेर फुटणे शक्य नव्हतें. अकुशाने बाप्पाजींना थाप मारली कीं, " मनुदादा डोंगरांत वाट चुकले. ते आम्हाला वाटेत भेटले. डोंगर उतरून खालीं आल्यावर आम्हाला वाटेत लाडी भेटली. डोंगरांत ती फाट्याला गेली तिथं पडली. ती लगडत येत होती. भिवरीने तिला हाताला धरून आणल. पाहिजे तर केसूतात्याना विचारा. "

लाडीच्या पायाला लागले ही गोष्ट खरी होती आणि कोणालाहि सहजासहजीं तिची जखम दिसून आली असती. मनोहरला डोक्याला गुपित मार लागला होता आणि तोहि केसांत. त्यामुळे बाप्पाजींना अंकुशाची थाप खरी वाटली. इतर लोकांचेहि अकुशानें समाधान केलें आणि तात्यांच्या कंड्या जागच्या जागीं राहिल्या. तात्याच्या कंड्यांपेक्षा मुकुट एकाएकीं गावातून नाहींसा झाला या गोष्टीनें लोकाना जास्त धक्का दिला होता. लोक मुकुटचें काय झालें याबद्दल तर्ककुतर्क करूं लागले, पण कोणास कारण सापडलें नाहीं. परतु मुकुटचे दुसऱ्या दिवशीं पत्र आले कीं, त्याला मिलिटरींत एकदम जमादाराची जागा मिळाली. पत्र वाचून सयाजी छाती काढून चालूं लागला. त्या कुतूहलात तात्यांच्या कड्या जागच्या जागींच राहिल्या. शिवाय तात्यांच्या शब्दावर कुणाचा विश्वास बसणे शक्य नव्हतें. कारण तात्यांना असलीं लफडीं आढून पाहण्याची व फुगवून सागण्याची चटक होती.

कर्वत कड्यावर हकीकत घडली त्यानतर दोन दिवसांची गोष्ट. राज-पाटीच्या खळ्यावरील भाताचे दोन भारे कातोड्यांनीं चोरले. ही संधि

साधून मनोहर उडव्या राखण्याकरिता खळ्यावर झोंपावयाला गेला. दुसरे दिवशीं सकाळीं अधू मनोहर झोंपला होता तिथें आला. मनोहरने डोळे उघडले तों अंधू रणजितसिंगाच्या तीव्र नजरेनें सगळीकडे पहात आहे असें त्याला दिसले.

दहिवरलेल्या गवतावर असंख्य दवबिंदू मोत्यांप्रमाणे चमकत होते. गवतांतील झुडपांवर माशाचे हिरवेनिळे कोष रत्नांच्या झुंबरांप्रमाणें लकाकत होते. त्या मोत्यांच्या वाळवणातून एक चिमुकली वाट गवत मोडीत गेली होती.

" तुमची तऱ्हा काय नि आमची तऱ्हा काय एकच ! " त्या चिमुकल्या पाऊलवाटेकडे पाहत अधू बोलला.

" म्हणजे काय ? " मनोहरनें विचारलें.

" दादा, लाडी रातची इथं आली होती ? " अधूने त्या मोडलेल्या पाऊलवाटेकडे बोट दाखवले.

" होय, आली होती. "

" दादा, हा अंध्या तुमच्याशीं दगलबाजी करनार नाय. मला समदं कळतं. जी माझी तऱ्हा तीच तुमची ! मी राईची आन वाहून सागतों कीं, मी फुटणार नाय. बाप्पाजींनीं मला तुमच्या पाळतीवर ठेवलय. रातभर बाधावर घोगडी टाकून मी निजलोंय. पन मी बाप्पाजींना अक्षर फुटणार नाय. " धनी-चाकरात परस्पराविषयीं सहानुभूति निर्माण झाली. मनोहरला या उत्पन्न झालेल्या परिस्थितीचें कौतुक वाटलें व तो मोठ्यानें हसला.

" अंधू, जगभर लैलामजनूच्या जोड्या भरून राहिल्या आहेत. पण तुझ्या राहीच्या म्होतुराचं काय झालं ? "

" तें कुठून आमच्या नशिबांत ? " शुक्राचार्यांच्या स्थितप्रज्ञतेनें अंधू बोलला.

" कां ? बाप्पाजींजवळ गोष्ट नाहीं काढलीस ? "

" दादा, कशी कारनार ? त्यांना इंगळ्या लागल्या नी त्या आपन पाहतों. "

" दोनशें रुपायांना बाप्पाजी डरणार नाहींत. "

" दादा, तुमांला माहीत नाय. मधीं पाव्हणं आले तवा मारवाड्यानं

उधार माल दिला नाहीं. मीं मारवाड्याला म्हटलं, 'आता सराई पिकली. आता तुझ्या बाच भय हाय व्हय? गारीमागें गारी लावतों भाताची तुझ्या दारात.' तवा तो काय म्हनतो मला! 'जा जा अशा कैक सराया पाहिल्या, पन कराज फिटलं नाय. जा सांग इनामदाराला. मागली बाकी दे, नाहीं तर रोखीनं माल ने.' मग बाप्पाजींनीं दोन मण भात पाठवलं माझ्या डोक्यावर मागील दारन. तवा चा, साखऱ्या अन् सामान आनलं अन् पाव्हण्याची सोभा केली. सारंग खिंडीपासून मारवाडी लई बिथरलाय. तो म्हणतो, आपुनच त्याला कातोऱ्याकडनं मारवलाय. दादा तो बाप्पाजींना खड्डयात टाकनार."

एका क्षणांत मनोहरची प्रणयसृष्टि नाहींशी झाली. त्याला समनाचा इतका राग आला कीं, त्याला वाटलें आताच्या आता पेठेत जावें, समना गमनाच्या दुकानाच्या गेरूने रंगवलेल्या फळ्या फोडाव्यात, त्याच्या तांबड्या पुठ्याच्या वह्या फाडाव्यात आणि त्याची पितळेची दौत फेंकून द्यावी.

"पण मोठ्या आईचे दागिने काय झाले?"

"तुमच्या कॉलेजच्या परीक्षेच्या वेळेस काय पैसे भरावे लागतात तवा गहाण टाकले."

"मग केवढ्याला पैसे कुठून दिले बाप्पाजींनीं?"

"मोठ्या आईची नथ गहाण टाकली समन्याकडं."

"काय नथ?" मनोहरचा चेहरा उद्विग्न झाला. कारण ती नथ तशीच होती. ती नथ वडिलार्जित होती. करवंदांसारखे मोती होते तिला. लालडीच नुसती पाचशें रुपयाची होती. ती नथ मोठ्या आईनीं घातली कीं लाल-डीचा तांबडा उजेड त्याच्या गालावर पडे व त्या कोल्हापूरच्या अंबाबाई-सारख्या घवघवीत दिसत.

"दादा, पाव्हणं गेल्यावर समन्याचा अन् बाप्पाजींचा मोठा खटका उडला. तवा बाप्पाजींनीं मारवाड्याला दम दिला. 'माझा मनोहर आता बी. ए. होऊं दे. मग दाखवतों तुला. एका मिनिटांत हिसाब करीन तुझा. मनु मामलेदार नाहीं तर मुनसफ झाला कीं तूं येशील माझ्याकडं वशिला लावायला! अरं, आमचा हा तळहातायेव्हढा मळा!' बाप्पाजींनीं

डोईवर हात ठेवला. 'हा पिकला की मग नाय आमी डरत!' तुझा जन्मभराचा व्याज अन् व्याजाचा हिसाब अन् आमचा हा मळा. हा नाहीं ऐकायाचा तुझ्या हिसाबाला."

"मग समन्या काय बोलला?"

"तो म्हंगाला उद्या हिसाब करनार तो आज कर ना बाप्पाजी. तेमंदी वांधा नाय. माझा हिसाब पुरा कर, नाहीं तर राजपाटी लिहून दे."

अंधूचा एक एक शब्द मनोहरच्या हृदयांत घुसत होता. आतांपर्यंत बाप्पाजींनीं आपली काय हलाकीची स्थिति आहे हें एका शब्दानें सुद्धा मनोहरला कळूं दिले नव्हतें. मनोहरला आतांपर्यंत वाटत होतें, आपण काय वडलाचे एकुलते एक. दरीच्या या टोंकापासून त्या टोंकापर्यंत आपल्या एक-तळी जमिनी लागून राहिल्या आहेत. अर्ध्या डोंगरात फॉरेस्टचे बुरूज दिसतात तेथपर्यंत आपलीं जंगले वाढलीं आहेत. माथ्यावर गुराचा वाडा आहे. तेथून हंड्याने दूध येत आहे! गडी आहेत. नोकर आहेत. ओटीवर कुळांचा भरणा बसला आहे. शेतात गडी खपत आहेत. या भरंवशावर त्यानें अभ्यासाकडे दुर्लक्ष केले. लायब्रऱ्या पालथ्या घालून त्याने ज्ञान संपादन केले; व्यायाम केला. तो खेळ खेळला, दिलदारीने राहिला. मित्रांचीं खिल्लारे घरीं आणून त्याने मज्जा केली. भलतींच पुस्तके वाचून तो सारखा नापास होत गेला. तो गतकालाची पश्चातापपूर्वक आठवण करूं लागला.

"अधू" मनोहर अंधूला विश्वासांत घेऊन बोलूं लागला, "यंदा नाहीं तरी पुढल्या वर्षी मी जोर करून परीक्षा पास होणार."

"दादा, तुम्ही बिगि बिगि पास व्हा. अन् मामलदार नाय तर मुनसिफ व्हा, म्हंजी मी तुमचा पट्टेवाला व्हईन. पट्टेवाल्याचा काय रुबाब असतो—जसा काय घरजांवई" अंधू पालवा घेऊन जायला उठला.

"अंधू, हे सल्ले माझ्या आजोळकरांनीं मला मुंजींत दिले. हे बाप्पाजींच्या ध्यानात नाहींत. तूं हे सल्ले वीक अन् म्होतूर लाव. माझ्याजवळ दुसरे सल्ले आहेत ते मी वापरीन. म्हणजे बाप्पाजींच्या लक्षांत ही गोष्ट येणार नाहीं."

अंधूच्या डोळ्याची खांच कृतज्ञतेच्या अश्रूंनीं भरली. तो सल्ले घेईना.

" अधू, तू भिऊ नकोस ! मी आतां चंग बांघतों, शेती रांकेला लावतो, भराभर पास होतो कीं, दोन वर्षांत समनाला आपण घरांतून काढू आणि नीट घडी बसवू. येवढ्याशाला आम्ही भ्यालों म्हणजे कसं होईल ? "

मनोहरनें बळेच सल्ले अंधूच्या जवळ दिले आणि सांगितलें कीं, " म्होतुर करायाचें ठरले कीं, मी . ते मोडून देईन. पण अंधू, गज्या हरकुड्याला आमत्रण द्यायला विसरू नकोस हो ! "

अधूने भटाला बोलावले व रात्रीं राहीबरोबर म्होतुर लावला. जरीचा रुमाल बांधून अंधूनें स्वतः जाऊन गज्या हरकुड्याला म्होतुराची सुपारी दिली. बाप्पाजीच्या परड्यांत अधूनें खोप बाधली. मनोहर जेव्हां अंधूची खोप पहायला गेला तेव्हां अधूने त्याला एक कोप चा पाजला. त्या बारक्या खोपींत रतिमदनाचे राज्य सुरू झाले. अंधू व राही राजाराणीं-सारखीं राहूं लागलीं. अधूची लग्न लावण्याची भीष्मप्रतिज्ञा ( ? ) सिद्धीस गेली. इतक्या वर्षांनीं त्याचीं हाडे उजळलीं, जन्माचें सार्थक झालें व त्याला मनाचे समाधान मिळाले.

---

# प्रकरण १८ वें
# वाघाची शिकार

तात्यांचा मार खाल्ल्या दिवसापासून काज्यानें रान धरले. तो परत कांही त्याच्या गोठ्यांत आला नाही. रानातून आल्याबरोबर त्याला बडवायचें असें तात्यानीं ठरविलें आहे ही गोष्ट कदाचित् त्याला रानात कळली असावी. बाप्पाजींमुळें बैल गेला म्हणून तात्या बाप्पाजींना घालून पाडून शिव्या देऊं लागले. काज्याचे रानात काळे झालें म्हणून सगळयात अंधूला आनंद झाला. शिवाय अंधूच्या दुसऱ्या एका आशेला अंकुर फुटले ते निराळेच. काज्या रानांत राहिला आहे तेव्हा एक दिवस तो वाघाच्या तावडींत सांपडणार खास, असें अंधूला वाटत होतें. आणि अंधूचें भाकित जवळजवळ खरे ठरले. एक दिवस काज्या जीव घेऊन हंबरत घरीं पळत आला. त्याच्या मागील फऱ्यावर वाघाच्या पजाचे ओरखडे निघाले होते. काज्या मरतां मरतां वाचला. "तुला वाघानं कसा खाल्ला नाय !" अंधू ओरडला. काज्याच्या मागोमाग गांवचीं गुरे चौखुर शेपट्या वर धरून पळत आलीं. त्याना वाघाने हुसकावले होते. त्या दिवसापासून रानसईला वाघाचा त्रास होऊ लागला. रोज कुणाच्या तरी जनावराचा वाघ बळी घेऊं लागला.

त्या दिवसापासून रानसईचे शेतकरी बाप्पाजीच्या अगणात बसून वाघाच्या गोष्टी सागूं लागले.

"आज धर्म्या पानसऱ्याची गाय खाल्ली." झुर पाटलानें बातमी दिली.

"अन् परवांच्याला मोहपाड्याच्या पाटलाचा टोणगा खाल्ला. आख्या रातींत एक माजलेला टोणगा खाल्लान् बघा. साऱ्या रातभर कडकडं हाड फोडीत बसला पार उजडसतसवर. नुसतीं शिंगं अन् खूर ठेवले मागं त्यानं. झाडावर शिकारी बसवले दुसरे दिवशीं, तर झाड थर थर कांपे त्याच्या डरकाळ्या ऐकून." बारकू पाटील बोलला.

"शंभू पाटील, तुमचा सापळा लावा." बाप्पाजींनीं तोड काढली.

"दादा, नाय गवसायचा तो सांपळ्यात. गोळी खाल्लेलं जनावर आहे. लई हुशार. पडीवर येत नाय अन् हाका घातला तरी निघत नाहीं बाहेर. मातर रात झाली कीं लागला खलाटीला खॅव खॅव करायला."

"रात्री रान सोडून खलाटीला येतो न् ?" मनोहरने विचारले.

"हमेश" सभू पाटलाने ग्वाही दिली.

"दादा, इतक्यात वाघ मारायचा नाय." अंधू वाघाची तरफदारी करू लागला

"का रे?" मनोहरने विचारले.

"बिगार काज्याला खाल्ल्याशिवाय त्याला नाय मारायचा." अंधूच्या विनोदाने लोक हसले.

"आपले ठाकूर, कातोडी अन् मराठे मिळून दोनशे गडी काढा. सागाच्या शंभर चुडी बनवा. तुम्हीं खेकडे मारतांना चुडी करतां तशा. एकान चूड खाद्यावर घ्यायची अन् दुसऱ्यानं जोडीन त्याला सोबत करायची. प्रत्येकान कुऱ्हाड, भाला किंवा खोचेरा जवळ ठेवायचा. वाघ खलाटींत ओरडू लागला की शंभर चुडींनीं खलाटी वेढायची अन् हांका घालीत कोल्हेडुगीच्या बाजूला सरकत यायच. घाई करायची नाहीं. कोल्हेडुंगी खलाटीच्या बरोबर मध्यभागीं आहे. वाघ वेढून हुसकवला कीं, तो नेमका कोल्हेडुगीच्या झाडींत शिरेल. मग सकाळीं आपण त्याला चेचू." मनोहर म्हणाला.

"मनुदादा, बिबळ्या नाहीं तो. पटाईत डहाण्या आहे. बारा हात उडी मारतो. आपल्या कुऱ्हाडीनं मरेल तो?" झुर पाटलानें शंका काढली.

"हा हां. झुर पाटील, बराबर बोललात!" बारकू पाटलानें झुर पाटलाला दुजोरा दिला.

"कां नाहीं मरणार! अरं, आपण इकतं गडी असल्यावर नाचणीच्या बोडासारखा कुटून काढू त्याला नुसत्या टिकूऱ्यानं. मग हातात कुऱ्हाडी असल्यावर कशाला पाहिजेत गोष्टी!" बज्या थरकुडा मनगटांतलें चांदीचे कडे मागे सारीत वीरश्रीने बोलला. गज्या हरकुड्याने त्याला साथ केली.

"मनोहर, पहा बुवा. मोठं साहस आहे." बाप्पाजींनीं मनोहरला मोडता घातला.

दुसरे दिवशीं गांव जमवून मनोहरनें वाघाच्या शिकारीची तयारी सुरू केली. सागवानाचे वासे चिरून त्यांच्या लांबलचक पण बारीक अशा चट्ट मोळ्या तयार केल्या. ठाकूर, कातोडी, मराठे लोकांना बोलावून त्यांना

तीरकामठे, भाली, बर्चे आणण्यास सांगितलें. कोणीं कुठे उभे रहावयाचें हें नक्की ठरविण्यात आले. सर्वानुमते वद्य नवमीपर्यंत शिकारीचा बेत तहकूब ठेवावा असे ठरले. कारण नवमीला निदान बारापर्यंत तरी काळोख पुरणार होता.

वद्य नवमीला संध्याकाळीं सर्व लोक चुडी व हत्यारे घेऊन आपल्या नेमून दिलेल्या जागीं बसले. मनोहरला मोठ्या आईनीं बहिरीचा अगारा लावला व तो पण खलाटींत आला. काळोख पडूं लागला तसे लोक वाघाची वाट पाहूं लागले. कोणी हूं का चूं करीत नव्हतें. रातकिड्याचा किर्र असा आवाज चालू होता. मध्येंच कुठे तरी सागाचें पान कुजबुजे, नाहीं तर वाऱ्याने गवत सळसळे. विहिरीच्या तळाप्रमाणे वर आकाश ओंड दिसत होतें व त्यातून नक्षत्रे चमचम करून खालच्या लोकांना सोबत करीत होतीं. हळूहळू गारठा वाढूं लागला व शिकाऱ्यापैकीं कैकांना विड्या ओढण्याच्या हुक्क्या आल्या. पण त्यांना आपली तलफ थांबविणे भाग होतें.

मध्यान्हरात्रीं काळ्या कड्याच्या खोच्यातील ऐनाटांत वाघाने डरकाळी दिली. त्याबरोबर एकामागून एक चुडी पेटूं लागल्या व चुडीच्या उजेडाचे एक वर्तुळ तयार झाले.

दरीच्या काळोखात पेटलेल्या चुडी बोरमाळेसारख्या दिसत होत्या. सर्व चुडी पेटून तयार झाल्याबरोबर ऐनाटातल्या लोकानीं हाका सुरू केला. हाकेवाले ' हां हं ' करून ओरडत होते. काहीं लोकानीं वाजविण्याकरिता घासलेटचे रिकामे डबे, पितळ्या अशीं वाद्यें घेतलीं होतीं. ऐनाटातील चुडीच्या माळेचा भाग हळूहळू पुढें कोल्हेडुंगीच्या दिशेने सरकूं लागला. बाकीच्या चुडी आपल्या जागा घेऊन बसल्या. ऐनाटांतले लोक प्रत्येक झाडीवर, झुडपावर आरडाओरडा करून काठ्या मारीत होते, दगडधोंडी गुरूळ किंवा ओढ्याचे, बाधाचे खळगे तपाशीत होते. कारण वाघ कितीहि मोठा असला तरी अंग चोरून त्याला बारीक होतां येतें व तो एकाद्या लहानशा झुडपाचे किंवा धोंडीचे आड लपूत बसतो.

सुभद्रा व राजसबाई आगाशींत उभ्या राहिल्या. गांवातील यच्चयावत् लोक, बायकापोरें ही गंमत पहावयाला बहिरीच्या माळावर जमलीं. गांवांत समना गमनाशिवाय चिटपाखरू राहिलें नाहीं. भाताच्या तुसानें

घांसलेल्या लखलखीत समईच्या उजेडात समनाशेट जमाखर्च लिहिण्यात एकचित्त झाला होता. आतल्या खोलींत पोतीं व दुकानाचा माल साठवला होता. तेथे त्याची शेटाणी उंदराच्या भीतीने घासलेट तेलाचे टमरेल जळत ठेवून झोपली होती. त्याचा कुच् कुच् करून उदीर निषेध करीत होते. समना मधूनमधून 'तेल फार जळत आहे' म्हणून बायकोच्या अंगावर ओरडत होता.

ऐनाटांतील लोकाना फार श्रम करावे लागले नाहींत. एका धोंडीवर उभा राहून वाघ निर्भयपणे चुडीच्या जाळाकडे पाहात होता. एका कातकऱ्याने त्याच्या फऱ्यात भाल ठेवून दिली तशी त्याने एक भयंकर डरकाळी फोडली व तो कोल्हेडुंगीच्या बाजूकडे धूम ठोकून पळू लागला. त्याबरोबर हाकेवाल्यानीं एकच हककल्लोळ सुरू केला. हाक्याना अवसान चढले. 'अर, डुंगीकडे पळाला र पळाला रं पळाला र!' करून ऐनाटातील हाके इशारा देऊ लागले. त्याबरोबर सर्व चुडी हालू लागल्या. सर्वजण झाडाझुडपांवर, दगडधोंडीवर काठ्या हापटीत हाका घालू लागले. बोरमाळेचा फास बटव्याच्या फासाप्रमाणे आवळ होऊ लागला. चुडी कोल्हेडुंगीच्या बाजूने सरकूं लागल्या. त्याच्या उजेडानें रानें उजळलीं. अंधारात ती माळ चालत्या बोलत्या दिवाळीप्रमाणें दिसत होती. चुडीबरोबर जो सुटा गडी ठेवला होता त्यानें आणि गाव, कातोडवाडी व महारवाडा यातून मागे राहिलेले लोक यानीं हातांत पराजलेले टेंभे व पलिते घेतल. माळ खूपच मोठी झाली. शिकाऱ्याच्या जयघोषानें काळ दरी दणाणून गली. हाक्याच्या दणक्याने मधून मधून भेकड हृदयाचे ससे उठत व आपले मागले लांब पाय हवेत लुडबुडवून, पुढल्या बुटक्या पायावर वेड्यावांकड्या उड्या मारीत, लांब कान उभे करून कोल्हेडुंगी गांठीत. गवतातून बेडक्या त्याचप्रमाणे उड्या मारून बाजूला होत. साप, धामणी बिळें गाठीत. शेपटीचे ओझे घेऊन कोल्हीं, खोकड आपलें निवासस्थान जी कोल्हेडुंगी तिच्याकडे, हितोपदेशांतील उपदेशाप्रमाणें म्हणून, धावूं लागत. याप्रमाणे अंतर कापीत, जमीन दडपीत हांका व चुडी कोल्हेडुंगीच्या पायऱ्यांपर्यंत आल्या व थाबल्या.

कोल्हेडुंगी ही एक निमुळती टेकडी काळ दरींतील खलाटीच्या बरोबर मध्यभागीं आहे. टेकडीवर पायथ्यापासून शिखरापर्यंत हिरवीचार गर्द

झाडी आहे. जेव्हां पावसाळ्यात एकतळी भाताची खलाटी टेबलावरील हिरव्या बनातीप्रमाणे लुसलुसते, तेव्हा ही टेकडी टेबलावरील टाचण्या ठेवण्याच्या हिरव्या गिरदीसारखी शोभू लागते. या टेकडीवर खूप जाळ्या माजल्या होत्या. वाघ या जाळ्यात शिरला आहे अशी लोकांची पूर्ण खात्री होती. पण रात्री जाळ्यात शिरणे धोक्याचें होतें. शिवाय एकेरीवर आलेला वाघ भिऊन जाळ्यात आश्रय घेण्याच्या ऐवजीं त्याला सतावलं तर हांक्याची कोंडी फोडून अंधारात पळून जाण्याचा संभव होता. तेव्हां दुसरे दिवशीं सूर्य चागला वर येऊन वाघाचे डोळे दिपू लागेपर्यंत वाट पाहण्याचे ठरले. लोक टेकडीभोवती परसे पेटवून निरनिराळ्या तऱ्हेचे आवाज करीत पहाऱ्यावर बसले. लोकाना तसेच जाग्यावर बसवून मनोहर घरीं परत आला. वाघ कोल्हेडुगींत कोंडला आहे ही बातमी आधींच आली होती. रात्र झाली होती तरी मोठ्या आईने अधूला मनोहरवरून नारळ उतरून टाकण्यास सांगितले. सुभद्रा पेंगतां पेंगतां झोंपीं गेली होती.

दुसरे दिवशीं पहाटे शेजारच्या सभू पाटलाचा कचरा कोंबडा आरवला अन् मनोहर उठला. त्याला झोंप लागली नव्हती. नुसती विश्रांति घेत तो पडला होता. वेळ न घालवता तो कोल्हेडुंगीवर येऊन दाखल झाला. त्याच्या गैरहजेरींत वाघ काहीं पळून गेला नव्हता किंवा त्यानें विशेष हालचाल केली नव्हती. उलट पहारेकरी शिकाऱ्याना आपले अस्तित्व दाखवण्याकरता तो बाणाच्या घावानें मधून मधून डरकळे. मग लोकाना वाटे ' आहे रं आहे. "

झुंजरूक वाघाची बातमी आजुबाजूच्या गांवांना पसरली व लोकांच्या झुंडीच्या झुंडी रानसराईच्या खलाटींत येऊं लागल्या. जणूं वाघोबाचा उरूस होता ! येणारे लोक रिकाम्या हातानें येत नव्हते. प्रत्येकाजवळ कुऱ्हाड, कोयता, सोटा, बडगा, भाला, बर्ची किंवा खोचेरा अशीं हत्याराच्या कायद्याखालीं न येणारीं हत्यारे होतीं. डोंगरगांव व आबाजूच्या कातोडवाड्या तीरकामठे घेऊन घसरले होते. जमाव इतका मोठा झाला कीं, वाघाचें भवितव्य ठरून गेलें.

मनोहरनें लोकांचीं तीन भरीव कडीं टेकडीभोंवतीं तयार केलीं; नंतर अंकुशाच्या हाताखालीं पंचवीस उमेदवार कातोडी गडी जाळकटाच्या

फांद्यावरून तीरकामठयासह चढवले. त्यांनीं वाघ कोणच्या जाळींत बसला आहे ते हेरलें. त्या कातोड्यानीं खुणांनीं वाघाची जाळी दाखविली. त्याबरोबर इतर कातोडी आपल्या भाली-कामठे सरसावून झाडाच्या खोडांचा, जाळ्या-झुडपांचा आश्रय घेऊन वाघाला घेरूं लागले. घेरून पुरें झाल्यावर अंकुशानें भाल ओढली. त्याचेच अनुकरण करून सर्व कातोड्यांनीं भाली ओढल्या. अकुशाच्या इशाऱ्याबरोबर सर्वांनीं भाली सोडल्या. वाघानें एक हृदयद्रायक किंकाळी फोडली व तो जाळींतून उठला. त्याबरोबर त्याचेवर कातोड्यानीं भालींचा वर्षाव केला. कातोड्याचेजवळ एक एक भालच शिल्लक राहिली तेव्हा अंकुशाने मारा थाबवला व कातोड्यांना वाघावर दगडी हाणण्याचा हुकूम दिला. तो मार असह्य होऊन वाघ ज्या बाजूनें जाळीला बोळ होता त्या बाजूनें जिवाची पर्वा न करता आधळ्यासारखा बाहेर पडला व सपाटीवर आला, तेव्हा बाहेरच्या कड्यातील लोक ‘ सायाळ रं सायाळ र ’ असे ओरडू लागले. अंकुशा बेंबीच्या देठापासून ओरडला,

“ अरं, वाघरू हाय रं वाघरू हाय रे. सायाळ नाय रं सायाळ ! ”

वाघाच्या अंगाला इतक्या भाली लागल्या होत्या कीं त्याच्या पिसामुळे तो एखाद्या अजस्र सायाळीसारखा लोकाना क्षणभर वाटला तर त्यात नवल नव्हते. भालींपैकीं एक भाल वाघाच्या डोळ्यात घुसली होती. त्याच्या वेदना वाघाला असह्य होत होत्या. तो पंजानें भाल काढण्याचा प्रयत्न करीत होता. पण चोहोंकडून भाले सरसावूं लागले तेव्हां तो निश्चयाने उठला व शक्तिपूर्ण पावलें टाकीत जबडा पसरून लोकाच्या अगावर चालून आला. त्या वेळीं सर्व बाजूनें त्याच्यावर घाव पडले. वाघाने उडी मारण्याचा प्रयत्न केला पण त्याच्या उडीबरोबर भालफळेंहि उंच झालीं अन् वाघ जमिनीवर लोळला. मग कुऱ्हाडी, दाडके याच्या माऱ्याला जागा मिळेना. थोड्याच वेळांत वाघाचें प्राणोत्क्रमण झालें. थोडी धुगधुगी होती, तरी मारा चालूच होता. वाघ मेल्यावर देखील कांहीं लोकानीं त्याला मारून, काहींनी आपली हौस व काहींनीं सूड फेडून घेतला. बज्या थरकुडा भला धिप्पाड गडी होता. त्यानें काठी उचलण्याच्या बैल्याने दाढ्या डुकर मारल्याची दतकथा रानसईत प्रचलित होती. त्या दंतकथेच्या आधारे थरकुडा वाघाला

नाचणीच्या बांडासारखा कुटणार होता. परंतु त्याची प्रतिज्ञा पुरी झाली नाहीं. कारण तिसऱ्या कड्यांत उभा असलेला ढप्पुस थरकुडा वर येईपर्यंत वाघ मेला होता. जेव्हा कातोड्यांनीं जाळींतले ससे होलपटून काढले तेव्हां मात्र त्याने आपला सोडगा सरसावला व एका सशाला होलपटून त्याचा चेंदामेंदा केला. त्या सशाचा कान धरून एका शेतकऱ्यानें उचलले, तेव्हां कातड्याच्या पिशवींत हाडाचा चुरा भरला आहे असे वाटले. जेव्हां कातोड्यांनीं जाळ्या तपासून पाहिल्या तेव्हा घायाळ वाघाने तशा परिस्थितींत देखील एक चुकार मेकर मारून अर्धे अधिक खाल्ले होतें ते कातोड्याना मिळालें.

मेलेल्या वाघाभोंवतीं लोकाचे मोहोळ जमा झाले. कोणी म्हणे, वाघ बारा गड्याचा आहे, कोणी म्हणे, सोळा गड्यांचा आहे; परंतु कातोडी मात्र गवतांत ससे भाजून खाण्याचे उद्योगांत गर्क झाले; इतकी त्यांना शिकारीच्या मेहनतीने भूक लागली होती. सर्व स्थिरस्थावर झालें, तेव्हा मनोहरने वाघाची लांबी मोजली. ती नऊ फूट भरली. गर्दींतील लोकाच्यांत वाघाच्या आख्यायिकांना ऊत आला.

इतक्यात ' वणवा रं वणवा र ' म्हणून ओरड झाली. कातोडी शिकार भाजीत होते त्याच्या हातून वणवा गेला. वाळलेल्या गवतांतून वणव्याची एक रेषा विजेसारखी फॉरेस्टांत शिरली व दुसरी खळ्यांच्या बाजूनें जाऊं लागली. लष्करी शिस्तीप्रमाणें जमाव हालूं लागला. या गोष्टी शेतकऱ्यांच्या इतक्या अंगवळणी होत्या, कीं कोणाला काय करावयाचें हें सांगावें लागले नाहीं. जो तो एकमेकाला मदत करून आपलें काम बरोबर करीत होता. लोकांनीं निरगुडीचे टहाळ, धावड्याचीं झिटें तोडलीं व ते आगीला झोडपून काढून आग विझवूं लागले. फॉरेस्टाचा बुरूज आगीपासून कासऱ्यावर आला नाहीं तों वणवा आटोक्यांत आला. तसेंच खालीं उडव्यांकडे वणवा गेला तो पण लोकांनीं विझवला. वणव्यानें होरपळलेले काळे माळ डोंगरावर ढगांची सावली पडावी तसे दिसत होते. आग विझवून लोक परत फिरले तेव्हां खिंडींत तुकाराम फारिस्टर खडकावर विड्या ओढीत बसला होता.

" इनामदार, रात्रभर जंगलांत नुसता दगा चालवला आहे तुम्हां लोकांनीं. जंगल काय तुमच्या शिकारीकरतां हाय नव्हं ! उजून वणवा

घालवतां जगलात. सरकारची नुकसानी करतां ! कां तर तुम्ही इनामदार. मोठे लोक ! मी करतो आतां रपोट. उद्या खटला झाला तर मी जबाबदार नाहीं. थांबा जरा, मला सगळ्या लोकांची नांव टिपून घ्यायची आहेत." मनोहरवर डोळे गुरकावीत बेवड्यानें मुसमुसलेला तुकाराम ओरडला.

"काय ! फॉरेस्टरला देखील आपण राजा आहोत असे वाटतें ! अरे, आम्ही राजाला भीत नाहीं. मग तुला कुठून भिणार ? अरे शिकार अन् वणवा इनामांत. वास्तविक नुकसानी झाली इनामदाराची ! अन् तूं का तखलीप करतोस ? जा, तुला काय करायचं असेल तें तू कर. दगा किसका सगा नहीं. गड्यांनो, चला तुम्ही आपल्या कामाला." मनोहरनें दम दिला.

"बर आहे इनामदार. एक दिवस पाहून घेईन." मनोहरकडे पाहून तुकारामानें दम दिला.

लोकानी एक गाडी. आणून वाघोबाचें धूड त्यांत टाकलें व लेजिम लावून वाजत-गाजत त्याला इनामदाराच्या वाड्यांत आणले. मोठ्या आईनीं सुभद्रेला ओवाळणीची तयारी करायला सांगितली. लाडी तेथें धांवत आली. सुभद्रेने मनोहरला कुंकुमतिलक व अक्षता लावून ओवाळलें, तेव्हां सलज्ज लाडी मनातल्या मनांत आपल्या पंचप्राणानीं मनोहरला ओवाळीत होती.

---

# प्रकरण १९ वें

## संकटें

सारगखिडींतील व काळ्या कड्यावरील हकीकत घडल्यापासून तुकाराम फॉरेस्टरचें समना गमनाजी व केसूतात्या याच्याकडले बसणें-उठणें वाढलें. तानक्या पण केसूतात्या व समना गमनाजी यांचेकडे खेट्या घालू लागला.

सारगखिडींतील हकीकतीनंतर तीनचार दिवसांनीं बाप्पाजींना राव-बहाद्दुराचें पत्र आलें कीं, 'तुमचा तीन हजाराचा आंकडा आम्हांला कबूल आहे. माघ महिन्यांतली तिथि मुलाला लाभते. तरी तिथि निश्चित करावी. पुढें मुलाला गुरु वाईट आहे.'

सुभद्रेचें लग्न लवकर होणार म्हणून सर्वांना आनंद वाटला. पण बाप्पा-जींच्या समोर खर्चाचा प्रश्न राक्षसासारखा उभा राहिला. समन्यानें एक साल दम खाल्ला तर सराईचें सगळे भात येईल त्या दरानें विकून बाप्पाजी रक्कम उभी करण्यास तयार होते. बाप्पाजींचा प्रश्न सुटण्याचे आंत मोठ्या आईनें लग्नाची तयारी सुरू केली. राजसबाई व सुभद्रा यानीं कवरा कसल्या. गावकरणी बायांनीं सोप्यांत भाताच्या जातणी सुरू केल्या व मोठ्या टास आवाजात त्या सुभद्रा व मनोहर याचेवर ओंव्या रचून गाणीं म्हणूं लागल्या. त्यामुळे बाप्पाजींचें डोकें फिरण्याची वेळ आली. माजघरात शेवया-बोटव्याचे कारखाने सुरू झाले. इनामदाराच्या वाड्यांत लग्नाची दंगल माजून राहिली.

मनोहर नापास झाल्याचें वृत्त आधींच आलें होतें. मनोहरचा उत्साह जाईल म्हणून बाप्पाजींनीं आपणांस वाईट वाटलें आहे असे तोंडावर दिसू दिलें नाहीं. उलट ते म्हणाले, " बी. ए. पर्यंत तरी आमच्या घरा-ण्यात कोण शिकले आहे? या वर्षी नाहीं तर पुढल्या वर्षी मनोहर खास पास होणार. यंदा कुठून पास होईल? मला गुरु वाईट होता ना? तो बदलल्यावर सुभद्रेचे कसें चटकन् जुळलें!"

मनोहर नापास झाला म्हणून सर्वजण खट्टू झाले होते. ते सुभद्रेच्या लग्नाच्या बातमीनें आनंदित झाले.

बाप्पाजी खर्चाचा प्रश्न सोडवीत आहेत, इतक्यांत समनाचें दिवाणी

कोर्टाचें समन्स बाप्पाजींना लागले. जी गोष्ट त्यांच्या हयातींत कधीं घडली नाहीं आणि जी गोष्ट टाळण्याकरितां आजवर त्यांनीं व्याजाचा, खर्चाचा, खोट्या मापाचा, खोट्या बाजारभावाचा भुर्दंड भरला ती गोष्ट घडली. अद्याप बेलीफ किंवा शिपाई गांवांत कुठे जेवणाची सोय लागत नाहीं म्हणूनच बाप्पाजींच्या घराची पायरी चढले. पण आज–आज बाप्पाजींचा तेजोभंग झाला. बेलिफाने नुसत्या दाव्याचे समन्स दिलें, एवढेच नव्हे तर सराईचें भात न विकता नेमलेल्या रिसीव्हरला हिशेब द्यावा, असा कोर्टाचा हुकूम बाप्पाजींवर बजावण्यांत आला.

काळ्या कड्यासारखे असलेले खंबीर बाप्पाजी बिलकूल डगमगले नाहीत. परतु लोकांच्या आनदाचा विरस झाला.

त्याच दिवशीं रात्रीं ठाकूरवाडीवर गोफणींच्या दगडाची झोड उठली. तानक्या आधींपासून ठाकराना दम देतच होता कीं ' तुम्ही इनामदाराला चुगली केली व आम्हांला मार बसवलांत. तुम्ही रानसईला कस राहतां तें पाहूं. एक दिवस आम्ही तुमचीं घरं पेटवून देऊं. त्या दिवशीं रात्रीं ठाकरांच्या झोपड्यांवर दगडी आल्या. त्या तानक्या व त्याचे साथीदार यानीं फेकल्या हें उघड होतें. स्वभावतः भित्रे व निरुपद्रवी ठाकूर घाबरले व त्यांनीं तानक्याचा त्रास चुकवण्याकरिता ठाकुरवाडी हालवून काळ्या कड्याच्या पट्टीला न्यायची ठरवले. बाप्पाजींनीं व कोयाने त्याचें रक्षण करण्याची पुष्कळ हमी दिली, पण ठाकूर दम धरीनात. बाप्पाजींची घरीं करावयाची सगळी शेती ठाकरांच्या जीवावर होती. आता यापुढें सगळी शेती त्यांना कुळाना मक्त्यानें द्यावी लागणार होती. बाप्पाजींवर हे दुसरें सकट. तरी बाप्पाजी डगमगले नाहींत.

"बाप्पाजी, ठाकूर गेले म्हणून घाबरण्याचें काय कारण आहे? आपल्या कातोडवाडींत काय कमी भरणा आहे? तुम्ही त्याना कधींच कामावर घेत नाहीं." मनोहरनें बाप्पाजींना धीर दिला.

"स्वतंत्र वृत्तीचे कातोडी शेतीचे काबाडकष्ट करणार! ते ठाकरानीं नि कुणब्यांनीं करावे. डुक्कर उठलें तर कातोडी नांगर सोडून पळेल; वळघणीचे मांसळीकरतां लावणी सोडून धूम ठोकील. मनोहर, तुला कातोड्यांचा स्वभाव माहीत नाहीं. त्याच्यासारखे स्वच्छंदी लोक दुनियेंत नाहींत."

ठाकरांनीं ठाकूरवाडी हालवली, ह्या गोष्टीला दोन दिवस झाले नाहींत, तो तुकाराम फॉरेस्टर सयाजी व बज्या थरकुड्याला घेऊन बाप्पाजीं-कडे आला व म्हणाला,

"मला तुमच्या परड्याची झडती घ्यावयाची आहे."

झडतींत सागवानाचीं दोन लाकडे परड्यात सांपडलीं. त्यांचा तुकारामनें पचनामा केला.

"मी तुमची फॉरेस्टाचीं लांकडे कशाला तोडीन? माझ्या इनामात सागवान भरपूर आहे. शिवाय हीं लाकडे इथे कोणीं तरी आणून टाकलीं असलीं पाहिजेत. हीं लाकडे आमचीं नाहींत!" बाप्पाजी भोळ्या भावाने तुकारामची समजूत करूं लागले.

"ते आम्हाला माहीत नाही. फारिष्टांत दोन बुडें तुटलीं आहेत. याचीं व ह्या लाकडाचीं वेढीं जुळलीं तर त्याची जबाबदारी तुमचेवर येईल."

मग तुकारामने पंचाच्या सह्या लांकडांवर केल्या व लाकडे जप्त करून चावडीवर ठेवलीं. नंतर पंचाना फॉरेस्टात नेऊन त्याने तुटलेल्या बुडाचा पचनामा केला. तेव्हा बुडाची व जप्त केलेल्या लाकडांचीं वेढीं बरोबर जमलीं. तुकारामने बाप्पाजींवर जंगलच्या कायद्याप्रमाणें खटला भरला. बाप्पाजींवर हे तिसरे संकट. तरी बाप्पाजी डगमगले नाहींत. मात्र सयाजी पचनाम्याला आलेला पाहून त्याचे पित्त खवळलें.

"सयाजी, गोड गोड बोलून माझी मान कापलीस! तुला माझी राज-पाटी पाहिजे आहे म्हणून तूं असला कावा साधलास!"

"बाप्पाजी, हें काय तुमचें बोलणे! सरकारी कामाला बोलावलं तर जायाला नको? उद्या माझ्यावर खटला झाला असता. मला तुमची राजपाटी काय करायची आहे? मी नसतों आलो तर तुकारामने दुसरा पंच आणला असता. मी आलों ते बर नाहीं झालं? कसा झालो तरी मी तुमचा माणूस आहे."

"ठीक आहे." दीर्घतम ठीचा उच्चार करीत बाप्पाजींनीं सयाजीला समजावलें कीं ते हे सर्व जाणून आहेत; ते सर्व पछानतात.

बाप्पाजी आपल्यावर संशय घेत आहेत म्हणून सयाजीला दुःख झालें; पण सयाजीनें तें तोंडावर दिसूं दिलें नाहीं. तो म्हणाला,

"बाप्पाजी, मी अस्सल मराठा आहें. मी निमकहराम होणार नाहीं. तुमची राजपाटी पाहून माझे डोळे भरतात. खोटं कशाला बोलू? कारण मी जातिवंत कुळबी आहे. मी जन्मांत तुमच्याशीं दगा करणार नाहीं."

पुढें रीतसर पंचनामा झाला. त्यावर सयाजी व दुसरा पंच यांनीं सह्या केल्या. सागवानांवर देखील पंचाच्या सह्या झाल्या. तुकारामनें जप्त केलेलें सागवान फॉरेस्ट चौकीवर नेऊन ठेवलें. पुढें बाप्पाजीवर फॉरेस्ट खात्याकडून खटला भरला गेला.

त्याच सुमारास रानसई विभागाला हार्टस्‌साहेब बदलून आला. इनामट रांच्या भिडेला दुसरा कोणी मॅजिस्ट्रेट बळी पडेल ह्या सबबीवर बाप्पाजींचा खटला फॉरेस्ट डिपार्टमेंटनें मि. हार्टस्‌कडे दाखल केला. खटल्याचें काम हार्टस्‌चा मुक्काम लवकरच रानसईला पडणार होता त्या वेळीं चालणार होतें. हार्टस्‌समोर खटला चालणार, हे कळल्यापासून तुकाराम अस्वस्थ झाला. कारण तो अंदरकी बात जाणून होता. त्याला पक्कें माहीत होतें कीं, साहेब विक्षिप्त आहे तसा तो न्यायी व निःस्पृह आहे; गुणाचा, दिलदारीचा चाहता आहे.

खटल्याची तारीख जवळ येऊं लागली तशी रानसईत [illegible] बचावाची तयारी जोरानें सुरू झाली. सुभद्रेच्या लग्नाची तयारी मागें पडली व रावबहाद्दुरांची मर्जी जाऊन लग्न पण मोडलें. बाप्पाजी वकील देण्याच्या विरुद्ध होते. ते कधीं कोर्टाची पायरी चढले नव्हते व त्यांनीं वकिलावर कधीं विश्वास पण टाकला नव्हता. सरकारचा चालू कायदा निराळा होता व रामायण, महाभारत वगैरे पोथ्या-पुराणे ऐकून बनलेला बाप्पाजींचा कायदा निराळा होता. पण या दोन्हीं कायद्याचे युद्ध होण्याचा प्रसंग अद्याप आला नव्हता तो आतां आला.

खटल्याचे दिवशीं साहेबापुढे आपला लेखी जबाब सादर करण्याचें बाप्पाजींनीं ठरवले. पाढरा बरू व हिरड्याची शाई यांच्या साहाय्यानें वळणदार अक्षरांत त्यांनीं जबाब पण तयार केला. "अग्रज न्यायी असतात. साहेबबहाद्दुरांनीं रानसईत चौकशी करावी कीं, हा बाप्पाजी कधीं असत्य बोलला काय? ज्यानें मुदतीच्या बाहेर गेलेलें कुणाचें कर्जदेखील बुडवलें नाहीं, तो बाप्पाजी प्राण गेला तरी खोटें बोलणार नाहीं. प्रत्यक्ष वडील

स्वर्गातून आले किंवा परमेश्वर पुढें उभा राहिला व त्यांनीं सांगितलें तरी असत्य भाषण त्याच्या तोंडांतून कदापि येणार नाहीं. तो बाप्पाजी सांगतो कीं, सरकारी हद्दींतील सागवान त्यानें तोडलें नाहीं व सरकारची चोरी त्यानें केली नाही. याउप्पर कोर्टानें वाटेल तसा निकाल द्यावा." खटला उभा राहिल्याबरोबर बाप्पाजी साहेबांपुढें हा जबाब सुपूर्द करणार होते.

पण त्यांचें म्हणणें मनोहरनें खोडून काढलें. तो म्हणाला, 'कोर्टांत दोन आणि दोन चार होतात, सूर्य उगवतो व मावळतो असल्या गोष्टी-देखील पुराव्याच्या कायद्याप्रमाणे शाबीत कराव्या लागतात. शिवाय बाप्पाजींना खटल्याच्या सुरवातीला आपलें म्हणणें कोर्टाला सांगता येणार नाहीं. फिर्यादीचा पुरावा संपेल तेव्हां कोर्ट बाप्पाजींना त्यांचा जबाब काय आहे म्हणून विचारील. तोंपर्यंत खटल्याचें काम पाहण्यास वकील न देणें म्हणजे इनामदाराच्या इभ्रतीस कमीपणा आणण्यासारखें होईल. बाप्पाजींचा वकिलावर विश्वास नसला तरी देशपांडे घराण्याच्या अब्रूकरता वकील देणें जरूर आहे. लोक काय म्हणतील? इनामदाराला भीक लागली! वकील देखील देण्याची ऐपत राहिली नाहीं! असा युक्तिवाद मनोहरने बाप्पाजींच्या डोक्यांत भरवून दिला. तेव्हां मोठ्या मुष्किलीने बाप्पाजींनीं वकीलपत्रावर सही केली. अद्याप बाप्पाजींना कोर्टाचे समन्स लागलें नव्हतें.

---

# प्रकरण २० वें

## वनचा राजा

अंधूनें बाप्पाजींची हलाखीची स्थिति सांगितल्यापासून मनोहरनें शेतींत खूप लक्ष घालण्याचें ठरवलें. तो जातीनिशीं शेती करूं लागला. बाप्पाजी त्याला मना करीत, पण तो ऐकेना. खटल्याची तलवार जरी डोकीवर लटकली होती तरी बाप्पाजींचीं शेतीचीं कामें थांबलीं नाहींत. बाप्पाजींनीं ठाकुरवाडीच्या खालच्या बेदा नीट करण्याचें काम सुरू केलें. बाप्पाजी डोक्याला उपरण्याची टापशी बांधून दिवसभर देखरेख करीत. एके दिवशीं मनोहर मोहाच्या सावलीला गड्याची घोंगडी हांथरून विसांवा घेण्याकरितां लवंडला. त्यानें सकाळपासून खूप काम केले होतें. कमलपुष्पावर जसे जलबिंदू तसे त्याच्या लाल चुटचुटीत हातांच्या तळव्यांवर खणण्यामुळें फोड उठले होते. त्याला अद्याप खणण्याची संवय झाली नव्हती. त्याच्या हाताला अद्याप घट्टे पडावयाचे होते.

समोर काळा कडा त्याला लाडीची आठवण करून देत होता. लाडीच्या आठवणीने त्याच्या श्रमांचा परिहार झाला. खालीं खलाटीला लाडीचा बाप टिकावानें शेतात चौकड्या टाकण्याचें काम करीत होता.

इतक्यांत खालच्याकडल्या कातोडवाडींतून रडण्या-इवळण्याचा आवाज ऐकूं येऊं लागला. खणण्याचें थाबवून गडी वळून कानोसा घेऊं लागले. बाप्पाजी ऊन्ह वारण्याकरतां जाड भिवयांच्या जवळ पंजा धरून कातोडवाडीकडे पाहूं लागले.

"कातोडवाडींत मौत झाली वाटतं?" बाप्पाजींनीं विचारलें.

"राती कोया मेलान्," पेटारीची परतण बाप्पाजींजवळ फिरली तेव्हां अंधूनें उत्तर केलें.

"काय? कोया मेला! कालच मीं त्याला मासे उपसतांना पाहिला." मनोहर आश्चर्यानें बोलला.

"कातोड्यांचा खरा नायक होता तो. शंभर उडव्यांमागें शंभर भाताचे भारे मी त्याला देई. पण त्रिशाद एक लोंबट हालेल तर!" बाप्पाजी सद्गदित होऊन बोलले.

" काय सागू बाप्पाजी कोयाची ताकद, तो उमेदवार होता तंव्हाची ?" बज्या थरकुडा शेतावरून आला, तो बेदेच्या बांधावर बसून सागू लागला. " धनगरांच्या तीन मेंढरांच्या टाळ्यांना पिंपळाचीं कोवळीं पानं लावावींत अन् दोन बकरीं दोन्ही काखोटीला अन् एक तोंडांत धरून कुपाणं उडावीं बघां त्यानं !"

" त्यांचा अंकुशाहि तसाच आहे. पण बाप्पाजी, कोयाचं वय काय होतं ?" मनोहर संभाषणांत सामील झाला.

" माझ्यापेक्षां वीस पंचवीस वर्षांनीं मोठा होता. तो म्हणायचा कीं, शंभर वर्षांपेक्षां त्याचं वय जास्त आहे. पण ऐशी-नव्वद वर्षांची उमर होती त्याची."

" तरी काय झालं ! येवढ्या म्हातारपणीं तो शिकार करीत होता !" मनोहर उद्गारला.

" म्हणून तर तो इतकीं वर्षं जगला." बाप्पाजी बोलले.

" तिगस्त सालची गोष्ट ! दोन साहेब शिकारीला आले होते रानांत. ताडाच्या झाडावर काय बसलं आहे म्हणून जुपल त्याच भांडण. एक म्हणे, 'ताडीचं गाडगं आहे,' अन् दुसरा म्हणे 'माकड आहे.' त्याची पैज लागली. एकानं आपली बदूक काढली, दुसऱ्यानें दुर्बीण काढली अन् कोयाला केला पंच. कोया म्हणाला, 'हा साहेबची खोटा अन् तो साहेबची खोटा. झाडावर घार आहे.' साहेब म्हणाले, 'झाडाखालीं जाऊन तिला उडव.' 'कशाला इतकं सायबा, तुझी बंदूक दे इकडं' कोया बोलला. कोयानें साहेबाची बंदूक घेतली अन् काड्दिशीं बार काढला. घार खालीं कोसळली. दोन्हीं साहेबांनीं बंदूक अन् दुर्बीण कोयाला बक्षीस दिली." बज्या थरकुड्यानें कोयाची एक सत्यकथा सांगितली.

" अजून आहे ती बंदूक त्याच्याजवळ ?" मनोहरनें विचारलें.

" हा नं. गेले सालीं डुक्कर मारला होता त्या बंदुकीनं त्यानं. चोराटी वापरतात कातकरी."

" गड्यांनो, काम बंद ठेवा. आपण कोयाच्या मौतीला जाऊं या." बाप्पाजी उद्गारले.

मग सर्वजण दांडाच्या नागमोडी वाटेनें कातोडवाडीच्या मसणवटींत आले. कोयाची मौत तेथे पडली होती. कोयाचे गणगोत, लेकलेकी, नातू, पणतू तेथें जमा झाले होते. त्यांचें एक गांव बसलें असतें इतका मोठा तो जमाव होता. आजूबाजूच्या कातोडवाडींतील कातकरी पण येथें गराडा देऊन उभे होते. सर्व कातोडवाड्या त्याच्या कोणी ना कोणी लागत होत्या. कातोड्यांचीं बायकामुले तालबद्ध कोमल आवाजांत रडत, इवळत होतीं. कोयाची बायको त्यांच्या प्रेताशेजारीं निर्विकार मनानें विडी ओढीत बसली होती. पलीकडे भिवरी एका पायावर उभी राहून गवताची काडी दांतांनीं तोडीत होती व कुर्‍यानें पहात होती. तानक्याला पाहून तिच्या कपाळाला आठ्या पडल्या. नाचात तानक्यानें किती तरी वेळां तिचा हात पकडण्याचा प्रयत्न केला होता. आज मौत होती म्हणून, नाहीं तर तानक्याला तिनें एक शिवी हासडली असती.

बापेगडी खड्डा घेत होते. खड्डयाच्या शेजारीं कोयाचा तीरकमठा, बाण, भाता, भाला, भाली वगैरे शिकारीचीं आयुधें पडलीं होतीं. बाप्पाजी आल्याबरोबर कातोड्यांनीं झाडाच्या सावलींत घोंगडी हाथरली. बाप्पाजीनें मागें वळून पाहिलें तो मनोहर पण तेथें आला होता. मसणवटींत मनोहरनें येणें ही गोष्ट बाप्पाजींना पसंत नव्हती. परंतु ते कातोड्यांच्या समोर मनोहरला काहीं बोलले नाहींत.

" काय झालं कोयाला ? " बाप्पाजींनीं कातोड्यांना प्रश्न केला.

" काय नाय बाप्पा. आवशीचा म्हातारा बेस होता. रातचं त्यानं समदं कातोडी जमा केलं अन् म्हणाला, ' आज मला दारू खायाची हाय. ' वाघाच्या गुहेंत शिळ मांस, तसं कातोड्यांच्या घरांत दारू कुठली ? पण अर्धी बाटली दारू माझ्या घरात मिळाली. म्हाताऱ्यानं ती खाल्ली अन् समदं कातोडी नाचायला लावले. नाच कोंबडा आरवसतों चालला. म्हातारा तस्सा बसून होता. मग त्यानं समद्या कातोड्यांना बजावलं कीं, ' माझ्या मागं अंकुशाला नायक करा. सराईची खलाटी राखा. ' सकाळीं आम्ही उठून पाहतों तों म्हातारा गमावला. " एका कातोड्यानें कोया कसा मेला तें सांगितलें.

" झाडाचं पिकलं पान गळून पडावं तसा म्हातारा मेला. त्याचं बेस झालं." एक कातोडी बाप्पा-जीशीं बोलूं लागला.

बाप्पाजींशीं बोलण्यांत कातोडी गुंतले आहेत ही संधि साधून भिवरीने अंकुशाकडे एक कटाक्ष फेंकला व ती गालांतल्या गालांत खुमारीने हंसली. अंकुशानें आपल्या फुगलेल्या दंडाकडे पाहिलें. भिवरीवर व अंकुशावर तानक्या तिरळी नजर ठेवून होता. त्याने जोरानें आपली काठी अ टली व अकुशाकडे पाहून तो खांकरला.

मनोहर मौतीचा विधि लक्षपूर्वक पाहत होता. कारण त्यानें अद्याप कातोड्यांची मौत पाहिली नव्हती. खड्डयाचें काम पुरें झाल्यावर कोयाचं प्रेत खड्डयांत ठेवण्यांत आलें. त्याच्या हातांत धनुष्य-बाण दिला होता, पाठीवर भाता आवळला होता व त्याचीं शिकारीचीं हत्यारें खड्डयात ठेवलीं होतीं. एवढें झाल्यावर सर्व कातोडी नेहमींची वहिवाट बाजूला ठेवून विव्हल स्वरांत गाणीं म्हणत फेर धरून कोयाच्या सन्मानार्थ कोयाभोंवतीं नाचूं लागले. नाचताना एक कातोडी मध्येंच थाबून कोयाला उद्देशून म्हणाला,

" बामणाच्या जन्मा जाशील तर शेंडी झटकून मरशील."

" परभाच्या जन्मा जाशील तर लिवून लिवून मरशील." दुसऱ्या कातोड्याने परभाना हिणवलें."

" कुळब्याच्या जन्मा गेलास तर काबाडानें मरशील." तिसऱ्या कातोड्यानें कुळब्यांची टिंगल गेली.

" कातोड्याच्या जन्मा आलास तर–तर ?" चौथ्यानें जोराने अभिनय करून प्रश्न विचारला.

" वनचा राजा होशील." सर्व कातोडी एकदम वीरश्रीनें ओरडले.

कातोड्यांच्या स्वातंत्र्याच्या उन्मादी कल्पनेने मनोहरचे डोळे स्फुलिंगित झाले. ' कातोड्याच्या जन्मा येरं, वनचा राजा होरं ', कातोडी आवेशानें गाऊं-नाचूं लागले. आपलें शक्तिसर्वस्व खर्च करून ढोल्या त्यांना अवसान देत होता. तालबद्ध साथ करून प्रचंड आवाजानें घुमणाऱ्या ढोलाचे व गाण्याचे प्रतिध्वनि काळ्या कड्यावर घुमूं लागले. तानक्या व अंकुशा प्रतिस्पर्ध्योप्रमाणें चढाओढीनें नाचत होते; पण मौतीचा प्रसंग ध्यानांत ठेवून एकमेकांना एकमेकांचा धक्का लागणार नाहीं अशी काळजी घेत होते.

नाच थांबला व कोयाला मूठमाती देण्याचा समारंभ सुरू झाला. कातोड्यांनीं कोयावर माती लोटली. मग प्रत्येकानें कोयाच्या मानेवर एकएक टांच रेगसून मूठ मूठ माती टाकली. प्रत्येक कातोडी कोयाला बजावीत होता कीं, ' कोया, कातोड्याच्या जन्माला ये हो. दुसरीकडे कुठं जाऊ नकोस !' शिकार गवसल्यावर कोयाचें तोंड जसे हंसरें होई, तसेंच मेल्यावर पण हंसरें दिसत होतें. मूठमातींत कोया हळूहळू नाहींसा होऊं लागला. ज्या मातींतून तो निघाला होता त्या मातींत तो गेला. बाप्पाजींनीं पण एक मूठवर माती उचलली. सद्गदित होऊन त्यानीं ती कोयावर टाकली व ते म्हणाले,

" कोया, सगळे कातोडी वनचे राजे आहेत. फुकट आम्ही पांढरपेशे ! कोया तूं कोणाच्याहि जन्माला जा, पण या पांढरपेशांच्या जन्माला येऊं नकोस."

कातोड्यांनीं खड्ड्यावर माती दाबली. कोल्ह्यांनीं खड्डा उकरूं नये म्हणून त्यांनीं त्यावर काटी लावली व दगडी ठेवल्या.

———— ——

# प्रकरण २१ वें

## खटला

मनोहर जिल्ह्याच्या गांवीं जाऊन तेथल्या एका नामांकित वकिलाकडे हेलपाटे घालूं लागला व सयाजीबरोबर खलबतें करूं लागला; तेव्हा बाप्पाजींनीं एक दिवस मनोहरला हटकले व बाजूला नेले.

"मनोहर, त्या सयाजीबरोबर कसलीं खलबते करतोस? सयाजी खरा असो खोटा असो. सरकारचा तो साक्षीदार आहे. त्याच्याबरोबर संबध ठेवणें योग्य नाहीं. उगाच खोटेपणा पदरी येऊन तोहमत यावयाची! सयाजीचा माझ्या राजपाटीवर डोळा आहे. तो तुम्हाला खड्डयांत घालील; तेव्हा त्याच्याशीं सावधगिरीने रहा."

हार्टस्‌साहेबाचा मुक्काम रानसईला आल्या दिवसापासून गांवांत शिपाई-प्यादे, पाटील-तलाठी, महार, मामलेदार याची व सरबराई करणाऱ्या लोकाची दंगल उडून राहिली. त्यात बाप्पाजींच्या खटल्यामुळे लोकात कुतूहल उत्पन्न झाले होतें. एक दिवस बाप्पाजींचा खटला आबराईतील तंबूंत उभा राहिला. कातोडी, ठाकूर, मराठे, महार यांची चावडीसमोर गर्दी उडाली. समना व तात्या आयत्या वेळीं चावडींत येऊन बसले. तुकारामाची फिर्यादी म्हणून पहिली जबानी झाली. बाप्पाजींच्या वकिलानी तुकारामाला बाहेर पडलेलीं लाकडें पाहून येण्यास सागितलें. तुकाराम लाकडे पाहून परत आला, तेव्हा वकिलांनीं त्याची उलट-तपासणी चालू केली.

वकील:—नीट तपासून पाहिलींत लांकड? त्यावरील पंचाच्या सह्या पाहिल्यात? बरोबर आहेत?

तुका०:—होय, बरोबर आहेत.

वकील:—तुम्हीं जप्त केलीं तीं हींच लांकडें?

तुका०:—होय.

बाप्पाजींनीं मनोहरकडे नापसंतीच्या मुद्रेनें पाहिलें व ते पुटपुटले,

"निरर्थक प्रश्न! कोर्टाच्या वेळेचा अपव्यय. पण या वकिलाना प्रश्न विचारल्याशिवाय पुढं पाऊलच टाकतां येत नाहीं."

एक दोन मामुली साक्षीदार झाल्यावर सयाजी जबानी देण्याकरितां पुढे आला, तेव्हा बाप्पाजीनीं त्याच्याकडे तिरस्कारानें पाहिलें. पांढऱ्या कापडाची कानटोपी व तिकोनी खिशाचा सदरा घातलेला म्हातारा सयाजी कांपत

कापत साक्षीदारांच्या पिंजऱ्यांत चढला. त्यानें सूर्याला नमस्कार करतात तसा साहेबाला हात जोडून नमस्कार केला व तो बावळटासारखा इकडून तिकडे डोळे फिरवीत पाहूं लागला. साहेबानें त्याला नीट उभें राहण्यास फर्मावलें, तेव्हां तर तो अगदीं गर्भगळीत झाल्यासारखा दिसला. सयाजीची सरतपासणी झाल्यावर बाप्पाजींचे वकील त्याची उलटतपासणी करूं लागले.

वकील:—जप्त केलीं तींच लांकडें बाहेर आहेत ना? पाहिजे तर बाहेर जाऊन पाहून या.

सयाजी:—वकीलसाहेब, तींच तीं लांकडें. आमच्यासमुत्र फारिष्टानं जप्त केलीं मीं निंगुत आंत येतांना पाहिलीं. त्याच्यावर आमच्या सह्या आहेत.

वकील:—मी म्हणतों तीं धावड्याचीं लाकडें आहेत; सागाचीं नाहींत.

सयाजी:—नाय हो, असं कस होईल? जप्त केल तें सागवान होतं.

वकील:—अहो, सागवान आणि धावडा सारखाच दिसतो.

सयाजी:—होय, पण वकीलसाहेब धावड्याचा वास नाहीं लपणार.

वकील:—वास घेऊन सांगा.

हा सवाल झाल्यावर हार्टस्‌साहेबानें लाकडें चावडीच्या आत आपल्यासमोर आणवलीं. सयाजीनें लाकडांचा वास घेतला व तो ' ऑ ' वासून मुखस्तंभासारखा उभा राहिला.

वकील:—अहो, ' ऑ ' वासून काय बघतां? उत्तर द्या.

सयाजी:—काय देऊं उत्तर? कर्म!

वकील:—कर्म द्या. तुम्ही जंगलांत रात्रंदिवस काम करणारे लोक! रोज तुम्ही झाडं तोडतां. आता वास घेऊन या लाकडाची जात सागा.

सयाजी:—धावड्याचीं लांकडं आहेत हीं.

सयाजीचें रडत रडत उत्तर आल्यावरोबर बाप्पाजी उठून उभे राहिले. ते इनामदार असल्यामुळे ते जरी आरोपी होते, तरी त्याना त्याच्या वकिलाशेजारीं बसण्याची कोर्टानें परवानगी दिली होती.

" नाहीं साहेब, यांत तुकारामाची चूक नाहीं. कोणी तरी—" बाप्पाजी वस्तुस्थिति कोर्टाचे निदर्शनास आणूं लागले. त्याबरोबर मनोहरनें त्याचा आंगरखा ओढून त्यांना खालीं बसवलें. तेव्हां ते मनोहरच्या अंगावर गुरगुरूं लागले व कोर्टांत थोडी गडबड उडाली.

" शातता ठेवा. " हार्टस्‌नें हुकूम फर्मावला.

" साहेब, मला कांहीं सागावयाचें आहे. " बाप्पाजी पुन्हां उठून बोलूं लागले.

" तुम्ही वकील दिला आहे. तुमची माहिती तुम्ही वकिलाला सांगा. मग ते मला सगळ समजावून देतील. तुम्हीं खालीं बसा. "

" नाहीं साहेब--" बाप्पाजी खालीं न बसतां बोलू लागले.

" पहिल्या प्रथम खालीं बसा, नाहीं तर कोर्टाचा अपमान केल्याबद्दल मी तुम्हाला दड करीन. " लालबुंद होऊन हार्टस्‌ ओरडला.

बाप्पाजी निरुपायानें खालीं बसले व सयाजीची उलटतपासणी सुरू झाली.

वकील:--मग पंचनाम्यात कस लिहिलत हीं सागवानाचीं लांकडे आहेत म्हणून.

सयाजी:--काय सांगू तुम्हाला. माझी ऐंशी वर्षांची उमर. मला काय दिसतं ? कीं मीं वास घेऊन पाहिला होता ? फारिस्टानं पंचनामा लिहिला सागवानाचा. मीं मुकाट सही केली त्यावर.

वकील:--बाप्पाजींच्या खालोखाल सरकारसारा भरतां तुम्ही ?

सयाजी:--होय. पाडुरंगाच्या कृपेनें भरतों.

वकील:--बाप्पाजींच्या राजवाटी नांवाच्या शेतावर तुमचा डोळा आहे. खरं सांगा.

सयाजी:--कल्पांतीं असली गोष्ट नाय व्हायची.

वकील:--म्हणून तुम्हीं खोटी साक्ष देण्याकरतां आलां आहांत !

सयाजी--फसलों खरा. आता लागेल तें बोला.

साहेबानें बाप्पाजींचा खटला तिथेंच थांबवला व बाप्पाजींना जबाबाकरतां उभे केलें. बाप्पाजींनीं लेखी जबाब केला, पण साहेबानें तो मागाहून द्या, असें सांगितलें. मग बाप्पाजींनीं जबाब दिला. बाप्पाजींनीं आपण कसें सत्यप्रतिज्ञ आहोत, आपला लौकिक काय आहे, आपलें ब्रीद काय आहे, देशपांडे घराण्याची अब्रु व मान्यता कशी असते, देशपांडे यांचे रक्त कसें आहे वगैरे गोष्टी साहेबाला सुनावल्या. साहेबानें यांतील एकसुद्धां अक्षर लिहून घेतलें नाहीं. आपला बाप वेडगळपणानें जबाब देत आहे व लोक त्यामुळें हंसत आहेत म्हणून मनोहर विरमून गेला. मनोहरची दृष्टि

चुकवण्याकरतां साहेब दुसऱ्या बाजूला पाहूं लागला. बाप्पाजींच्या जबाबांत विनोदी भाग आला कीं, तो हंसत हंसत आश्चर्यानें शीळ घाली. इतिहासाचा भाग पुरा झाल्यावर बाप्पाजींनीं पंचनामा खरा असून सागवानाऐवजी धावड्याचीं लाकडे गफलतीनें मुद्देमालांत कशीं आलीं व त्यांत तुकारामाची कसूर नसून त्याला कोर्टानें का मेहरनजर दाखवावी वगैरे मजकूर सांगण्यास सुरवात केली ! तेव्हां तर साहेब मोठमोठ्य ने हसू लागला. परतु बाप्पाजींचें गुऱ्हाळ लांबूं लागले तेव्हां त्यानें बाप्पाजींना पुन्हा खेचलें,

" आरोपी तुकाराम नाहीं; तुम्हीं आहांत. तुम्हीं तुमच्यापुरते सांगा. तुम्हीं फिर्यादीची वकीली कां करता ? तुम्हीं हीं लाकडें तोडलींत ? "

" नाहीं. "

" मग आतां तुमचें पुराण बंद करा. "

साहेबानें एक पिवळा कागद घेतला, त्यावर काहीं लिहिले व बाप्पाजींवर आरोप ठेवला. नंतर त्यानें बाप्पाजींना ती अपराधपत्रिका वाचून दाखविली.

" तुम्हांला गुन्हा कबूल आहे ? " साहेबानें बाप्पाजींना विचारले.

" नाहीं ! " बाप्पाजी चुकून किंवा त्राग्यानें होय म्हणतील म्हणून वकीलच ओरडले.

" खटल्यातील लोकांनीं कुठं जाऊ नये; मी पुकारीपर्यंत बाहेर बसून रहाव. " साहेबानें तात्पुरता खटला बद केला.

सर्वजण बाहेर आले. बाप्पाजींभोंवतीं चिंतातूर लोकाचा घोळका उभा राहिला ! मनोहरचें तोंड उतरलें. वकिलांचा उत्साह कमी झाला. बाप्पाजी मात्र स्वतःवर साहेबानें चार्ज ठेवला म्हणून प्रसन्न झाल्यासारखे दिसत होते. कारण वकिलाबद्दलचें त्यांचें भविष्य खरें ठरलें होतें.

" साहेबानं सोडून द्यायला पाहिजे होतं. कायद्याच्या नावान त्याच ज्ञान शून्य आहे. पंचवीस अलाहाबाद, सतरा कलकत्ता, तेरा मुंबई न् चौदा मद्रासचे निर्णय आपल्या बाजूचे आहेत. साहेबानं बाप्पाजींना शिक्षा तर देऊ द्या. अपिलांत फें फें करायला लावीन त्याला. मग पुन्हा नाहीं माझ्या वाटेस जाणार. "

वकीलसाहेब लोकांना कायदा समजावून देऊं लागले. परंतु लोक तिकडे दुर्लक्ष करीत होते. प्रत्येकजण साहेबानें चार्ज ठेवल्या कसा, आतां बाप्पाजींना

दंड किंवा शिक्षा होणार, खटला शेकणार, वकिलानें काय हुशारी दाखविली, वगैरे गोष्टींची चर्चा करूं लागले. त्याच वेळीं नांद्रुकीच्या झाडाखालीं तात्या, समना गमना वगैरे लोकांचें टोळकें चर्चा करीत उभें होते. झाडाच्या आड उभे राहून तुकाराम हातवारे करून बोलत होता. बज्या थरकुडा एका गाडीच्या आड उभा राहून त्यांचें बोलणें ऐकत होता.

"साहेब इनामदाराला सोडणार." तुकारामाने भविष्य केलें.

"छट्! हार्टस् आहे नांवाचा. सयाजी फितलेला साक्षीदार आहे. साहेब त्याच्यावर रुकार देईल. उलट पुरावा फोडला म्हणून बाप्पाला तीन महिने ठोठावील! त्याच्या मनांत सोडायचें असतें तर त्यानें चार्ज ठेवला नसता." तात्या तुकारामला धीर देऊं लागले.

"नाहीं हो, तुम्हाला साहेबलोकांची माहिती नाय. पंधरा वरीस मी डिटिक फिरलोय. मारतां शरत?"

हें ऐकल्याबरोबर लपलेला बज्या थरकुडा तेथून उठला व गुपचूप बाप्पाजींजवळ येऊन ओरडला,

"बाप्पाजी, आपला खटला सुटला!"

"छट्, अशक्य!" बाप्पाजी खंबीर राहिले.

"कशावरून?" मनोहरनें विचारलें.

"तुकाराम बोलत होता."

"अं:! त्यांत काय अर्थ नाहीं." बाप्पाजींनीं बज्याला मोडून काढलें.

इतक्यांत साहेबानें बाप्पाजींची केस पुकारली. सर्वजण चिंतातूर हृदयानें तंबूंत शिरले.

"इनामदार, खटल्यांतील मुद्देमाल माझ्यासमोर आलेला नाहीं. नजर-चुकीने धावड्याच्या लाकडांचा पंचनामा झाला, किंवा कोणीं तीं लांकडें बुद्धिपुर:स्सर तेथें ठेवलीं, किंवा फॉरेस्टरनें खटला बनावट केला याबद्दल संशय उत्पन्न होतो. म्हणून मला या मुद्यावर आस्तिपक्षीं किंवा नास्तिपक्षीं काहींच निर्णय देतां येत नाहीं. पण गुन्ह्याचें शरीर जीं सागवानाचीं लांकडे त्यांचा पुराव्यांत अभाव असल्यामुळें मी तुम्हांला निर्दोष सोडून देत आहे. मि. देशपांडे, व्यवहारज्ञानी लोक तुमचा भोळसट म्हणून उपहास करतील; पण तुमच्यासारखे लोक बहुसंख्याक झाल्याशिवाय

जगाचा उद्धार होणार नाहीं. मग या कायद्याची जरूरी राहणार नाहीं. मला तुम्हांला आधींच सोडून देता आले असतें. पण तुमच्याच हिताकरिता मीं तुमच्यावर चार्ज ठेवला! आता तुम्हीं घरीं जावा. नमस्कार."

सर्व मडळी हर्षभरानें बाहेर आली. तबूपेक्षा, हार्टसाहेबापेक्षां मोठा न्यायाधिश बाप्पाजींच्या हृदयात बसला होता. त्याला बाप्पाजींनी भक्तिभावानें नमस्कार केला.

"काय विक्षिप्त साहेब! चार्ज काय ठेवतो, सोडून काय देतो!" लोक जोराने बडबडू लागले.

"नाहीं, साहेब विक्षिप्त नाहीं. साहेब मोठा खोल बुद्धीचा दिसतो आहे. चार्ज ठेवून बाप्पाजींना सोडून दिले नसते तर सरकार बाप्पाजींवर दुसऱ्या कोर्टात हाच खटला भरू शकले असते. आता सरकारला अपीलाशिवाय दुसरा उपाय नाहीं. पण सरकार असल्या खटल्यात कधीं अपील करीत नाहीं व त्याला यश पण येत नाहीं." वकिलांनीं चार्जाचा उलगडा केला.

लोक गावाच्या वाटेला लागले. इतक्यात दबा धरून बसलेला सयाजी पुढें झाला व बाप्पाजींना कडकडून भेटला.

"काय बाप्पा, केसू तात्याचे न् समन्याचे कसे दांत पाडले? तानक्याकडनं लाकड टाकतो परड्यात बेटा! अन् खोटा खटला तयार करतो साला! आम्हीं तानक्याचा बाप शोधला. कसा बार उडवला? दे टाळी! मला राजपाटी पाहिजे होती ना? काय वेड लागल होतं बाप्पा तुम्हांला!" सयाजीला हर्षातिरेक झाला होता.

"पण फारिस्ट चौकींतील लांकडं गेलीं कशीं?" बाप्पाजींनीं विचारले.

सयाजी मिष्किलपणानें अंकुशाकडे पाहूं लागला. अंकुशा प्रेमानें सद्गदित झाला. आवढ्याने त्याचा गळा दाटून फुगला. त्यामुळें त्याने अलंकाराप्रमाणे गळ्यांत बाधलेली पेढ्याची काडी ताड्दिशी तुटली! काहीं एक न बोलतां अंकुशाने बाप्पाजींचे पाय धरले.

"सयाजी, तू वृद्धापकाळीं खोटं काम केलस!" बाप्पाजी खेदयुक्त वाणीनें हळहळले व निर्भर्त्सनेनें सयाजीकडे पाहूं लागले.

"आन् तुक्या फारिस्टानं मोठं खरं काम केलं? देहूचा रहिवासी पडला किनई! बाप्पा, याला म्हणतात गनिमी कावा. संतवचनच आहे, 'काट्यानें काटा काढावा'."

---

## प्रकरण २२ वें

# कातोड्याचें बंड

कोया मेल्या दिवसापासून तुकारामानें अंकुशाजवळ कोयाची बंदुक विकत देण्याबद्दल तगादा लावला. तुकारामानें ती बंदुक कोयाजवळ पाहिली होती व हत्यार नामांकित म्हणून त्याचें त्या बंदुकीवर मन बसलें होते. कोया जिवंत होता तोंपर्यंत तुकाराम कोयाकडून बंदुक काढून घेऊं शकला नसता. कारण एक तर ती बंदुक खुद्द एका बड्या साहेबानें कोयाला बक्षिस दिली होती व दुसरें म्हणजे कोया साहेबलोकांचा शिकारी असून त्यांच्या मर्जीतला माणूस होता. तुकारामानें बातमी दिली असती तरी पोलिसांनीं कोयाकडे कानाडोळा केला असता. आता मात्र तुकारामचा डाव साधला. पोलिसाकडून अंकुशाच्या ताब्यांतील बंदुक जप्त करावयाची व पुढें लिलावात ती विकत घ्यावयाची, असें तुकारामाने ठरवलें. तुकारामानें बंदुकीचें लायसन्ससुद्धा काढून ठेवले. तुकारामाने अंकुशाजवळ बंदुक मागितली.

"नाय बा, मला काय बी माहीत नाय म्हताऱ्याच्या बंदुकीची." अंकुशाने कातोडी पद्धतीप्रमाणें कानांवर हात ठेवले.

"मग रानात बार कसले काढीत होता?" तुकारामनें विचारलें.

"म्हाताऱ्यानं आणली असल कुणा साहेबाची ती बा; मला काय माहीत!" अंकुशानें तुकारामला उडवाउडवीचें उत्तर दिलें.

बाप्पाजींच्या खटल्यात अंकुशानें सयाजीच्या हिकमतीप्रमाणें, जप्त केलेलीं सागाचीं लाकडें लाबवून, तुकारामला फजीत केलें होतें. त्यानें तुकाराम फारच भडकला होता. बाप्पाजींच्या सुटकेप्रीत्यर्थ सयाजीनें अंकुशाला चांगलेंच पोस्त-दिले, तेव्हा अंकुशानें त्या आनंदात रान काढलें; ही बातमी तुकारामने पोलिसाना दिली. रानांत बार निघाल्याबरोबर पोलिसानीं छापा घालून अंकुशा व इतर कातोडी रानांत पळसांच्या पानांवर सागुतीचे वांटे घालीत होते त्यांना पकडलें व बंदुक जप्त केली. पोलिसांनीं बाकीच्या कातोड्याना सोडून फक्त अंकुशावर खटला भरला. अंकुशाला खटल्याची तारीख लागेपर्यंत मॅजिस्ट्रेटनीं जातमुचलक्यावर खुला केला. अंकुशाला

कळून चुकलें कीं, आपली बदुक सरकारजमा होऊन आपणांस शिक्षा होणार. खटल्याचे तारखेचे दिवशीं अंकुशानें कोर्टासमोरील बंदुक पळवली व तो फरारी झाला. एक-दोन दिवसात त्यानें रानांत पाळत ठेवून तुकारामवर बार काढला. बंदुक जरी चागली होती तरी अकुशाने लांबून बार काढल्यामुळें नेम बराबर लागला नाहीं. गोळी चुटपुटती तुकारामच्या पोटरींत घुसली व तुकाराम खालीं पडला. बदुकीला तेल देऊन स्वच्छ ठेवली नसल्यामुळें तिचा नेम हुकला.

पोलीस अंकुशाच्या पाठीमागें लागले, तेव्हां अकुशानें काळ्या कड्याचा आश्रय केला. अंकुशाला त्या रानभागाच्या तसूतसूची माहिती होती. तो रानांतून पोलिसाच्या हालचाली पाही. पोलिसाना मात्र तो त्या अफाट व किर्र रानात दिसत नसे. बंदुकीच्या साहाय्याने तो जगलचे प्राणी मारून खाई किंवा वेळ पडली तर माथ्यावरचा धनगरवाडा किंवा आघरतची ठाकूरवाडी यातून भाकरी मिळवी. शिवाय पोलिसाचा डोळा चुकवून भिवरी देखील मधून मधून त्याला अन्न पोंचवी. तशीच वेळ आली तर तो खालच्या गांवांना रात्रीं भेट देई व आपली गरज भागवी. वास्तविक रानांतून शिकार करणें व पोलिसांचा डोळा चुकवून भुरट्या चोऱ्या करीत हिंडणें हा तर कातोड्याचा जन्मसिद्ध हक्क होता. अकुशाला यात नावीन्य वाटलें नाहीं.

अंकुशाच्या भीतीनें रानसईतील व आसपासच्या खेडेगावांतील लोक टरारले. दिवा नाहीं लावला तर लोक कड्या लावून झोंपत. एकटा दुकटा इसम अंधारांत बाहेर पडत नसे. रानसईत रात्रीं घरांवरून दगडींचा मारा सुरू झाला व भुरट्या चोरांना ऊत आला. अर्थात् या सर्व गोष्टींना अकुशा जबाबदार नव्हता. इतर कातोडी अकुशाच्या नावनाटेपणाचा फायदा घेत. मात्र लोकानीं अंकुशाच हें करतो म्हणून दहशत घेतली.

स्थानिक पोलिसांना अंकुशा आटपेना, तेव्हां त्याला पकडण्याकरिता हत्यारबंद पोलिसांची पार्टी सुभानराव फौजदारांच्या नेतृत्वाखालीं रानसईला आली. तिनें रानसईला मुक्काम केला.

सुभानराव मोठा नाणावलेला, पट्टीचा फौजदार होता. तो अत्यत धाडसी व हुशार, अशी त्याची त्याच्या खात्यांत कीर्ति होती. तो वयातीत व

अनुभवी तर होताच; परंतु त्याचा मोठा गुण म्हणजे तो समरस होऊन सगळ्यात मिसळे. सुभानराव अंकुशाच्या कामगिरीवर आल्यामुळें रानसई-च्या लोकांना धीर आला व प्रथमच लोक बऱ्याच दिवसांनी रात्रीचे बाप्पाजींच्या अंगणात जमले. कारण सुभानराव तेथें चांदण्यांत बाप्पाजींशीं गप्पा मारीत बसले होते. इकडच्या तिकडच्या गप्पा सुरू झाल्या. सुभानरावची वाणी गोड व कथनशैली आकर्षक होती. लोक मुग्ध होऊन त्यांचे पोलिशींतील अनुभव ऐकूं लागले. इतक्यात सयाजीच्या पऱ्यावर 'धाड' दिशी धोंड पडली, कीं लगेच गज्या हरकुड्याच्या घरावर 'धाड' झालें, कीं त्याच्या पाठोपाठ सयाजीच्या घरावर 'धुडम्' झालें! दगडींचा वर्षाव जोरानें सुरू झाला.

"माझ्या गप्पा ऐकायला अंकुशा आलेला दिसतो आहे." सुभान-रावच्या विनोदाने सर्वजण हंसू लागले.

"जमादार, जरा कुंपणीकडून चक्कर मारा अन् काय भानगड आहे ती बघा पाहूं." सुभानरावनें दौलती जमादाराला हुकूम दिला.

थोड्या वेळानें दौलती, बज्या थरकुड्याच्या मनगटाला धरून त्याला बाप्पाजीच्या अंगणात घेऊन आला. त्याच्याबरोबर गज्या हरकुडा पण होता. त्या जोडीला पाहून अंगणात जमलेले सर्व लोक हंसूं लागले.

"साहेब, मोहाच्या झाडाखालीं उभा राहून हा इसम दगडी फेंकीत होता या इसमाच्या घरावर. हा इसम घाबरून 'मेलो मेलो' अस ओरडला कीं हा मोहाच्या झाडाखालीं हसे."

"शेजारी दिसताहेत जिवाभावाचे." सुभानरावांनीं आपला तर्क बोलून दाखवला, तो खरा ठरला.

"होय, आगोटीपासून सराईपर्यंत एकमेकाचें अगदीं हाडवैर असतें यांचे. मग पुन्हां एक होतात ते. याचे एकमेकावर भयंकर प्रेम आहे. याचं नाव बज्या थरकुडा अन् याच गज्या हरकुडा." बाप्पाजींनीं माहिती सागितली.

"व: ! शृंगीभृंगीची जोडी आहे. काय हो बज्याबा, काय चालवल होतं?"

"काय नाय साहेब. हा गज्या उगीच भेतो. त्याची गंमत करीत होतों."

"जमादार, आपण पोरं धरायला नाहीं आलांत; दरोडखोरांना पकडण्याकरता आलां आहांत. ह्या पोराना सोडून." गावकऱ्याना सुभानरावनें आपल्या विनोदाची पुन्हा चुणूक दाखवली.

सुभानरावचा बाणा पाहिल्यावर गाव निश्चिंत झाला; पण सुभानराव अंकुशाला पकडूं शकले न हींत. अंकुशाजवळ नाना तऱ्हेच्या युक्त्या हात्या. अंकुशा अंगाला टहाळ बांधून झुडपाच्या आड जाळकटातून दडून बसे; सायाळी–चिंमोण्याच्या गुरुळातून जादू केल्याप्रमाणें नाहींसा होई, आणि सुभानरावाला फसवी. पोलिसी युक्त्या व जमावाचें बळ याचा रानाची माहिती, स्वातंत्र्यप्रिय वृत्ति, वनवासाची मंवय याच्याशीं अटीतटीचा सामना सुरू झाला. या युद्धात अंकुशा एकटा होता. फक्त भिवगीची त्याला मदत होता. परंतु युद्धोत्सुक अशा या दोन पक्षात एक मोठा फरक होता– एक पक्ष मोलाचा होता व दुसरा बिनमोलाचा होता. अंकुशा जीवन आणि मृत्यू याना समान लेखी.

एके दिवशीं काळ्या कड्याच्या खालीं भैरवाच्या खोऱ्यांत उकीर निघाल्यासारखी धूळ उडूं लागली. रानसईचे लोक लक्षपूर्वक धुळीकडे पाहूं लागले. कोणी म्हणत, "घोरपड आहे." कोणी म्हणत, "अरं, घोरपड नसंल तर सायाळ असल; नाहीं तर दोन घोरपडी असतील." "आपण खोचेरे घेऊन जाऊं या." तेंडाला पाणी सुटलेला बज्या थरकुडा उद्गारला. कारण घोरपड मिळाल्यावर बजाच्या इथें मेजवानीचा थाट उडाला असता.

सुभानरावाला घोरपडीची बातमी मिळाल्याबरोबर त्यानें आपली दुर्बिण डोंगरात निघणाऱ्या उकिरावर रोखली. सुभानराव स्वतःशींच हसले. म्हातारपणापर्यंत टिकवलेल्या त्याच्या गुलाबी गालांवर लाली चढली. त्याच्या फाल्गुनरावी करड्या मिशा सरळ झाल्या व त्यानीं आपल्या पार्टीला रान वेढून उकिराचा कडा गाठण्याचा हुकूम दिला. 'घोरपडी-ऐवजीं अंकुशाची शिकार आहे' असें समजल्याबरोबर रानसईच्या लोकानीं आपल्या झोपड्या गाठल्या. कुणाला हींव आलें. कुणाच्या पायात काटा रुपल्याची कळ असह्य झाली. कुणाला भोंवऱ्या, तर कुणाला सधिवात निघाला. ह्या नाहीं त्या सबबीवर गाव मागें राहिला.

सुभानरावनें उकिराचा कडा गाठला. उकिर घळीच्या कपरींतून येत

होता. पोलिसपार्टी गेली, तेव्हां उकीर निघण्याचा थांबला होता. जिकडे तिकडे शांत झालें होतें. सुभानरावनें सगळी घळ तपासली, परंतु त्याना माणसाचीं पावले दिसलीं नाहींत.

" उंदीर-घुशींचें बीळ दिसत आहे. " जमादारानें आपलें मत प्रगट केलें.

" अरे जमादार, हा अंकुशा एक उंदीरच आहे. खालून तुला बीळ लहान दिसतें आहे; वर जाऊन पहा माणूस आंत शिरेल कीं नाहीं ते! " जमादाराची सुभानरावांनीं टर उडवली.

जमादारानें वर चढून खात्री करून घेतली.

" जमादार, झाली खात्री? " सुभानरावनें विचारलें.

" किती दिवस या घळींत अंकुशा राहाणार? या घळींत राहण्यापेक्षा वर्ष-सहा महिने जेलमध्यें जाऊन राहिलेलें काय वाईट! अंकुशा कशाला येवढा वनवास काढतो! "

जमादाराला अंकुशाची मनोवृत्ति जाणण्याचें ज्ञान नव्हतें.

" स्वातंत्र्य! " खालीं खोल खोल दिसणाऱ्या रानसईकडे पाहत सुभानराव उद्गारले.

" साहेब, आपण या भोंकांत काटी चेचून पेटवून देऊं या. "

जमादाराकडे रोखून पाहत सुभानराव रुंद हंसले.

" साहेब, ही कातकऱ्यांचीच विद्या आहे. आगटी करायची नसली तर आपण मिरच्यांची धुरी करूं, म्हणजे तो येईल आपोआप बाहेर! " सुभानरावला जमादार समजावूं लागला.

सुभानराव पुन्हां पहिल्यापेक्षां जास्त रुंद हंसले. त्यांनीं कड्यावरून लोंबकळणाऱ्या आग्या माश्यांच्या मोहळावरून सूचक नजर फिरवली व ते म्हणाले,

" दौलु, तुला जमादाराचा फौजदार व्हायचें आहे. पुढल्या वर्षीं मी पेन्शनमध्यें जाणार. मी कशाला मनुष्यवध करूं? शिवाय मला माझी आणि तुमच्या सर्वांची काळजी आहे ना? धुरानें आग्या माश्या चवताळल्या म्हणजे मारतील नांग्या. एक इंच लांब असतो त्याचा कांटा. आतां देऊं हुकूम आगटी पेटवण्याला? " सुभानरावनें दौलतीला विचारलें.

त्या वेळीं दौलती जमादाराचा चेहरा पहाण्याजोगा झाला.

"साहेब, अंकुशा घळींत उकीर काढून रंगमहाल बनवतो आहे?" कडा उतरून खालीं येता येतां दौलती जमादारानें प्रश्न केला.

सुभानराव विचारांत मग्न होते. त्यांनीं तंद्रींत दौलतीचा प्रश्न ऐकला व तंद्रींतच उत्तर दिलें!

"नाहीं. तो पावसाळ्याची तयारी करीत आहे." मग शुद्धीवर आल्यासारखे ते पुन्हां जमादाराशीं बोलूं लागले.

"दौलती, माझा होरा चालतो कीं, पावसाळ्याखेरीज अंकुशा आपणाला सांपडावयाचा नाहीं. तोंपर्यंत साधल्यास आपण कांहीं तरी युक्ति करून त्याला पकडण्याचा प्रयत्न करू."

सुभानरावनें आपला फोर्स परत बोलावला व ते रानसईत आले.

अंकुशा सुभानरावचा शत्रु नव्हता. उलट अंकुशाच्या युक्त्या व प्रसंगावधान पाहून ते खूष झाले होते. अंकुशानें दुसऱ्या कातोड्याच्या मार्फत रात्रीं डोंगरांत परसा पेटवावा व आपण दुसऱ्या गांवाला निघून जाऊन तेथें चोरी करावी. सुभानरावनें रात्रभर पायपीट करून तें ठिकाण गांठावें व उजाडेपर्यंत तेथें जागत बसावें, परंतु अंकुशाचें त्यांना नख दिसूं नये. दिवसा अंकुशानें दऱ्यात चूल पेटवावी. रानांतून धूर उठूं लागला कीं, सुभानरावला अंकुशाची बातमी यावी. मग त्यांनीं फोर्स घेऊन दबत दबत त्या ठिकाणापर्यंत जावें. तेथें त्यांनीं वरतून पहावें तर त्यांना घोंगडबुवा दिसावा, किंवा अंकुशा-भिवरी घोंगड्या पांघरून निजल्यासारखे दिसावें. रान वेढून ते जवळ आले कीं, त्यांना अंकुशाच्या विनोदी स्वभावाचा प्रत्यय यावा. तेथें दगडावर किंवा एखाद्या झुडपावर माणसाचा आकार होईल अशा तऱ्हेनें अंकुशानें घोंगड्या सजवलेल्या मिळाव्यात. एकदां तर त्यानें माणसाची कवटी बुजगावण्यावर ठेवून दिली होती. अशा तऱ्हेनें फसल्यावर सुभानराव इतक्या जोरानें हंसत कीं, त्यांचा व त्यांच्या फोर्सचा श्रमपरिहार होई.

सुभानरावच्या मनांत अंकुशाला कांहीं तरी करून वाचवावयाचें होतें. अद्याप तो काहीं निर्ढावलेला गुन्हेगार नव्हता.

"अंकुशाची अन् माझी एकदां भेट झाली तर मीं त्याला वाचवीन.

पण त्यानं माझं ऐकलं पाहिजे; सरकारच्या हवाली झालं पाहिजे. " बाप्पाजींच्या अगणांत सुभानरावनें आपला उद्देश जाहीर केला. लोकांना वाटलं ही पालिशी थाप आहे.

" तुम्ही विश्वास ठेवा अथवा ठेवू नका, पण मी अंकुशावर अगदीं खूष आहे. "

" मी करतो व्यवस्था. " बाप्पाजींनीं सुभानरावाला आश्वासन दिलें.

त्या दिवशीं त्यांनीं धवा ठाकराच्या मार्फत अकुशाला निरोप पाठवला.

अकुशाचा निरोप घेऊन रात्रीं धवा आला. ' आपणाला काहीं दगाफटका होणार नाहीं अशी बाप्पाजी हमी देत असतील व ते स्वतः एकट्या सुभानरावाला निःशस्त्र घेऊन येत असतील, तर उद्यां सकाळीं आपण त्याना काळ्या कड्यावर भेटू. मात्र या दोघानीं कड्याच्या खालीं उभं राहिल पाहिजे. ' असा तो निरोप होता.

दुसरे दिवशी सकाळीं सुभानराव व बाप्पाजी काळ्या कड्याची धस धरूं लागले. त्याच वेळा अकुशा कड्याच्या जाळींतून दुर्बिण घेऊन त्याचें निरीक्षण करीत होता. सुभानरावनें आपला शब्द पाळला आहे, अशी जेव्हा त्याची खात्री झाली, तेव्हा त्यानें त्या दोघांना कड्याखालीं येऊं दिलें.

"तिथच्च थांबा आणि बोला. " अकुशाचा फक्त आवाज आला.

लपलेला अंकुशा कुठून बोलतो आहे, हें त्या दोघांना कळत नव्हतें.

" अंकुशा, तूं माझा दुष्मन् नाहींस ! " सुभानराव बोलूं लागले, "आज ना उद्या तूं आम्हाला सापडणार, पण मग तुला जास्त शिक्षा होईल. अद्याप तूं काहीं मोठे गुन्हे केले नाहींस. तुझ्या ह्या गुन्ह्यांचें स्वरूप सौम्य करणें येवढेच माझ्या हातात आहे. त्याचा तू फायदा घे. उद्या मी बदललों म्हणजे तुझी ही संधि जाईल. "

" माझा तुरुंग टळेल ? " अकुशानें विचारलें.

" तुला थोडीशी शिक्षा होईल. "

" माझी बंदूक घेऊन मलाच शिक्षा ! अन् तो तुकाराम फुकट सुटणार ! "

" तूं लायसेन्स कां काढलं नाहींस ? "

" लायसीन का काढलं नाहीं? तुम्हीं कुठं काढलं आहे? म्हणे बंदुकीला लायसीन! शिकारीला लायसीन! पानतंबाखूला–ताडीमाडीला–दारूला लायसीन! जगायला लायसीन! मरायला लायसीन! शहरांत मेलं तरी लायसीन लागतं. आमाला नाय लागत लायसीन. आमाला नाय तुमची गोष्ट कबूल."

" अंकुशा उगाच डोकं फिरवूं नकोस. अद्याप विचार कर. तूं आमच्या स्वाधीन हो." सुभानराव खालून ओरडले.

" आमाला नाय कबूल. चालायला लागा."

" अंकुशा, तुझा कान पकडून थोबाडींत मारण्याचा मला अधिकार आहे" बाप्पाजींनीं गर्जना केली.

वरून एक दगड कोसळत आली. तें अंकुशाचें उत्तर होतें.

" अंकुशा, फुकट कातांडी-हेका धरूं नकोस." बाप्पाजी पुन्हां ओरडले.

दुसरी दगड कोसळली.

" हरामखोरा, तुझ्या बापाला फुकट लग्नाचे पैसे दिले. मला दगडी मारतोस?" बाप्पाजींनीं शेवटचें शस्त्र काढलें.

काळ्या कड्यावरून दगडींचा माराचा सुरू झाला. तेव्हां आतां थांबण्यांत अर्थ नाहीं असें समजून बाप्पाजी परत फिरले.



# प्रकरण २३ वें

## शिमगा

फाल्गुनाचा महिना उजाडला. गरिबांच्या झोंपड्यांतील सराई केव्हाच संपली हाती. आगोट जवळ येत चालली म्हणून शेतीचीं कामेंहि जोरांत निघालीं. उंबरे पिकण्याला व कैऱ्या वाजण्याला नुकतीच सुरवात झाली. कातोडणी पानांच्या द्रोणातून जाभळे, करवंदें विकावयाला घेऊन येऊं लागल्या. कातोड्याचीं पोरें हा जंगलचा मेवा खाऊन आपली भूक शमवूं लागलीं. त्याचीं मोठीं मुलें गळाला पिकलेलीं उबरे लावून मासे मारीत. बापेगडी रात्रभर डव्हऱ्यावर जागत बसून सावजाची शिकार करीत. रानातले पाणी आटल्यामुळे रानचीं जनावरें हटकून डव्हऱ्यावर येत व रान वाळून मोकळें झाल्यामुळे चटाचट दिसत. परतु चारआठ दिवसांनीं एखादे सावज मारून सबंध कातोडवाडीचे पोट कसें भरणार ! शेतातील सराई संपली. कोठारात साठवलेली सराई लोकानी विकली. खावटीचे व बियाचे कणगे शेतकरी जिवाच्या पलीकडे जपत होते. मग कातोड्यानीं चोरी कुठे करावयाची ? जीव कसा जगवायचा ? मासे मारावेत तर ओहोळ आटले. तळ्यांचीं डोबरें झालीं. काळ नदीला खाडी पडल्या ! कातोडी रामेठी नावाच्या झाडाची साल कुटून ती पाण्यात मिसळून डोह माजवूं लागले. माज डोहांत पडली कीं, त्या विषानें माशाचे डोळे सुजून ते पाण्यात झिंगूं लागत. मग कातोडी त्याना पकडीत. याप्रमाणें काळ नदीचे सर्व डोह संपले. तेव्हा कातोड्यानीं रानकंद, कडूकारंदे उकरण्याचा सपाटा चालवला. याप्रमाणें त्याचें जीवन चालूं लागलें.

होळी जवळ आली तशी उपासमारींत देखील कातोड्यांनीं नाच सुरू केले व ते पोस्त मिळवूं लागले. गावकऱ्यांनीं रोज गमतीगमतीचीं सोंगें काढावींत व त्या निमित्तानें लोकाच्या उखाळ्यापाखाळ्या, गावचे गुप्त राजकारण चव्हाट्यावर मांडावें. याप्रमाणें शिमग्याचे गमतीचे कार्यक्रम गावात होऊं लागले.

अखेर होळीचा दिवस उजाडला. शेतकऱ्यांनीं आदल्या दिवशीं समनाला वाटेल त्या दरानें भात विकलें व शिमग्याचा बाजार केला. होळीच्या दिवशीं त्यांनीं वाटेल ते करून गुळपोळी खाल्ली.

गांवांत सगळ्यांत मोठी व मानाची होळी बाप्पाजींची ! वेसकटीसमोर एरंडाचें झाड पुरायला अंधूने दर काढला. दरातून अंधू दरसाल नेमकी आधल्या वर्षी पुरलेली सुपारी, हळकुंड व पैसा काढी. अंधूनें होळी रचली. बाप्पाजी पुजेला बसले. होळी पेटल्यावर बाप्पाजी भक्तिभावानें बोंब कशी मारतात ते पाहण्यास गावातील पोरें होळीसमोर जमलीं. बाप्पाजींची होळी पेटल्यावर गांवातील इतर होळ्या पेटल्या.

त्या दिवशीं रात्रीं लोकानीं वाघ्यामुरळीचे सोंग काढलें. सोंगाच्या निमित्तानें लोकाना गांवातील कुलंगडीं बाहेर काढण्यास चांगलीच संधि मिळाली. सोंग प्रत्येकाच्या दारासमोर जाई. प्रथम पलित्यांच्या उजेडांत वाघ्यामुरळींचा नाच होई. त्यानतर खंडोबा वाघ्या झालेल्या सोंगाड्याच्या अंगांत येई. मग तमासगीर त्याला एकएक प्रश्न विचारीत व वाघ्या त्याचे गमतीदार उत्तर देऊन लोकाना हसवी. अशा तऱ्हेनें सोंगाडी खुबीदार रीतीनें प्रत्येक घरासमोर सोंग नाचवून विनोदी चिमटे घेऊं लागला.

सोंग झुरपाटलाच्या दारात उभें राहिले.

" देवा, या धन्याची बायको नादत नाय. काय करावं ?" नाच झाल्यावर तमासगिरातील एकानें प्रश्न विचारला.

" नागराला जुप." देवानें घुमून घुमून उत्तर दिलें.

" देवा, या धन्याची बायको आजारी आहे. काय करावं ?" बारकु पाटलाच्या घरासमोर देवाला प्रश्न विचारण्यात आला.

" सकाळीं हंडाभर चा द्या तिला." देवानें उत्तर दिलें.

" देवा, या धन्याची कोंबडी खुडुक बसली. काय करूं ?"

" पैशाची सुकट व्हा आणि कोंबडी अड्यावर आली कीं मला द्या." दीपाजीच्या घरासमार फार्स झाला. मग देव समनाच्या घरासमोर आला.

" समनाचं अंग दुखत देवा."

" अंकुशाला खारीक-खोबऱ्याचा रतीब लाव." देवाचें उत्तर आलें.

देव बाप्पाजींच्या घरासमोर आला. तमासगिराने प्रश्न केला,

" देवा, बाप्पाजींची नथ केव्हा मिळणार ?"

" समनाचें नाक अंकुशा कापील तेव्हां." देवानें भविष्य वर्तवलें. फरारी अंकुशा आडोशाला उभा होता. त्याचे डोळे चकाकले.

देवाच्या गर्दीत तुकाराम मुद्दाम कांहीं तरी कुरापत काढण्याच्या उद्देशाने आला. त्याकरता पूर्वतयारी म्हणून तो दारू पिऊन लास झाला होता. पलित्याच्या उजेडांत त्याचे डोळे गरगरा फिरत होते.

"तुझ्या अगांत खरा देव आला असेल तर लाडीचं लगीन कधीं होईल ते साग." तुकारामनें देवाला दारूच्या तारेंत प्रश्न केला.

"गावकऱ्याविरुद्ध खोटा खटला द्यायचे लोक थाबतील तेव्हां होईल तिचं लगीन."

"घालवून द्या या देवाला. खोटा हाय हा देव." तुकाराम दंगा करूं लागला. "मनुदादाबरोबर केव्हांच झालाय् तिचं लगीन. आतां दुसरं लगीन देव कुणाबरोबर लावणार?" तुकाराम देवाच्या बरोबर हुज्जत घेऊं लागला.

मनुदादाचे नाव ऐकून अधू टिकुरें घेऊन बाहेर पडला. राही त्याच्या मागें कडाडत आली.

"खेटारड्या, चालता हो इथून." बाप्पाजी ओटीवरून ओरडले. मनोहर माडीच्या खिडकींत उभा होता तो आंत गेला. राजसबाई पुरणाच्या पोळ्या करीत होत्या त्या देवखोलीच्या खिडकींत आल्या.

"कां म्हणून? आम्ही दारू प्यालों म्हणून खोटे? अन् तुम्ही इनामदार तेव्हा खरे? नाहीं जाणार आम्ही." तुकाराम बाप्पाजींना शिव्या देऊं लागला. त्याला लोक समजावून नेऊ लागले, तसा तो जास्तच अवसानात आला.

"बाप्पाजी, तुम्ही मला वडलाचे ठिकाणीं. मी तुमचं लेकरूं. दारू प्यालों मी सणाचीं, ते सोडून द्या. मनु अन् मी परका नाय. ते शिकलेले अन् मी नांगरगट्ट्या जंगली. पण तुमच्या चिरंजीवांनाच विचारा खरं काय तें!" दीड लहरी सापाप्रमाणें तुकारामने बाप्पाजींच्या कानात विष ओतलें.

लोकांनीं तुकारामला जबरदस्तीनें ओढून नेलें व देवाचें सोंग तसेंच राहिले.

दुसरे दिवशीं बाप्पाजींनीं मनोहरला स्पष्ट विचारलें. मनोहरनें उत्तर न देता मान खालीं घातली. बाप्पाजी मनोहरवर खूप रागावले, पण त्यानीं बाहेर वाच्यता होऊं दिली नाहीं. नंतर बाप्पाजी अन् राजसबाई याचें माडीवर हळू आवाजांत भांडण जुंपलें.

" माझ्या मनूचा काहीं अपराध नाहीं त्यांत. तीच कारटी द्वाड आहे. मनु माझा भोळा! तरी मी तुम्हाला सागत होते कीं, त्याला शेतावर पाठवूं नका."

" मोठाली मुलं झालीं तर त्याना डालून का ठेवायचं? शेती बघ म्हणून सागितल यात काय गुन्हा झाला माझा? आपलीं कुळं आपलीं लेकर. आपण त्याचे आईबाप. आपण त्याना तारणार मारणार! का असले धंदे करायचे आपण?"

" त्यात त्याचा काय अपराध? नापास झाला म्हणून त्यानें लग्न लांबवलेंत. बी.ए. झाल्याशिवाय करायचं नाहीं, सुभद्रेचं झाल्याशिवाय करायचं नाहीं, अस म्हणून मुलगा मोठा केलान्. अद्याप तो अळणी राहिला. आता त्याची काय चुकी?"

" तेवढी एक परीक्षा पास असता तर?" परीक्षेचा धिःकार करणारे बाप्पाजी वैतागानें बोलले.

" ते खर, पण आतां तो वयात नाहीं का आला?"

" तुला हुंडा पाहिजे, करणी पाहिजे, मुलगी सुदर पाहिजे. म्हणून तूं लग्न लाबवलंस. आता उगाच का माझ्या डोक्यावर खापर फोडता? आता जी मुलगी येईल तिच्याशीं मी त्याच लग्न लावणार. गरीबाची असली आणि रूपान कमी असली तरी चालेल." बाप्पाजींनीं प्रतिज्ञा केली.

बाप्पाजींनीं प्रतिज्ञा केली एवढेंच नव्हे, तर धुळवडीच्या दुसरे दिवशीं पागोटें देखील बाधायाला टाकले त्यांनीं.

" अंध्या, तूं मला सगळं खोटं सागितलंस. माझा संशय अगदीं बरोबर होता." धुळवडीचे दिवशीं बाप्पाजींनीं अधूला खूप दम दिला. अंधू कांपूं लागला. " जा, उंदराला माजर साक्ष ठेवल यांत माझीच चूक आहे."

धुळवडीचे दुसरे दिवशीं संध्याकाळीं बाप्पाजी व सयाजी राजपाटीच्या बांधावर जाऊन बसले. वर खोडयात दीपाजीनें दाढ पेटवून दिली होती. दाढीच्या जाळात व धुरात दीन झालेली दीपाजीची आकृति आग्या वेताळासारखी उजळली होती. बाप्पाजींनीं त्याला बांधावर बोलावून घेतलें.

" कळलं का तुला कां बोलावलं तें?" सयाजीनें त्याला विचारलें.

" कळलं तर ! न कळून कसं चालेल ? माझ्या गरिबाच्या तोंडाला काळं लागल हें कोण पुशील ? " आदबीनें बसलेल्या दीपाजीचे बोल बाप्पाजींच्या काळजाचें पाणी करूं लागले.

" आतां झालं तें झालं. कोळसा उगाळला तरी काळाच !" सयाजीनें तंबाखूनें कमावलेला चोरटा गनीमी आवाज काढला.

" मी कुठं काय म्हणतों ! पण थोरामोठ्याच्या लेकरांनीं असली गोष्ट करावी कशी ? "

" तूं का लेकीला मोठी केलीस ? " सयाजीनें दीपाजीलाच उलट फिरवला.

" तुम्ही माझं खर मानणार नाय; पण देजाच्या आशेनं काहीं मी लेक वाढवली नाहीं. म्हटलं नक्षत्रासारखी माझी लेक ! कुणाची धन करू ? म्हणून वाईच दम धरला. एवढाच माझा अपराध. तुमच्या पोरानं तिला नादावली. इथुन पाया चुकला. तुम्ही इरुध अन् मी कसा तिला सवतीवर देईन ? ह्या फारिस्टानं पन मस्त खटपटी केल्या, मधस्ती घातले, पाचशें रुपये देज अन् वर दागदागिना कबुल केला. पन मीं कबूल केला नाय. कां तर मुलीला पसंत नाय. अन् तो काळ्या मलाबी पसत नाय. एवढा मीं मोह सोडला तो काय याच्याकरतां ? "

" अच्छा तूं तिचं लगीन करून टाक. तुकाराम तर तुकाराम. " सयाजीनें सुचवलें.

" तिला या खोंडप्यात तरी कुनी पत्करनार नाय. तुकाराम म्हणतो ही आतां बाशी झाली. "

" मग लांब कुठं तरी दे. तूं हा गांव सोडून जा. मी तुला शेंदोनशें रुपये देतो. माझ्यावर तूं उपकार कर. मी तुझा अपराधी आहें, पण तूं गांव सोड. तुझं इथं काय आहे ? मक्त्याची शेती तुला कुठहि मिळेल. मी तुला दुसऱ्या गांवाला शेती मिळवून देतों अन् वर तीनशें रुपये देतों. चल !" बाप्पाजी दीपाजीला समजावूं लागले.

" बाप्पाजी, तुम्ही म्हनतां तें खरं; पन माझं वाडवडील इथं राहिलं, अन् इथंच त्यांना माती मिळाली. तवा मी कुठं जाणार ! मला कुठं चैन

पडणार? लहानाचा मोठा इथ तुम्हादेखत झालों. जान्याएवढा होतो तवा या डोंगराला तुमचीं जनावरं चारलीं अन् या खलाटीला भात पिकवलं. बाप्पाजी, मी गांव सोडून गेलो तर खलाटाचीं भुत माज्या मानगुटीला बसतील. बापुजी बुवा न् बहिरी मला पाढरी सोडूं देणार नाहींत."

"ते काय नाय चालणार. तुला काही तरी मारग काढलाच पाहिजे." सयाजी दीपाच्या अंगावर ओरडला.

"ते काय नाय. बाप्पाजी ब्रह्मदेवाच ऐकणार नाहीं. ध्यानात ठेव. माझ्याशी गाठ आहे." डोळ्यातलीं आसवें थोपवून बाप्पाजींनीं नेहमीं-प्रमाणे आविर्भाव आणला.

दुसरे दिवशीं दीपाजी एकदम गांव सोडून गेला. त्याने आपलीं गुरेंढोरें, कोंबडखाना गज्या हरकुड्याच्या ताब्यात दिला व आपल्या गाधड्या-पाधड्या, भाईकुंडीं घेऊन तो कुणाचाहि निरोप न घेता बायकामुलें घेऊन निघून गेला.

त्याला तशा स्थितींत जाताना पाहून बाप्पाजींचें हृदय विरघळले, पण पोटच्या पोराकरितां अब्रूकरिता किंवा जनलज्जेकरिता—नीतीकरिता म्हणा-पाहिजे तर—त्यानीं आपले अंतःकरण कठोर-कठोर केलें. बाप्पाजी डोक्या-वरून बोजे वाहून नेणाऱ्या त्या दीनदुबळ्या कुटुंबाकडे दुःखित दृष्टीनें पाहूं लागले. त्यानीं दीपाजीवर केलेला जुलूम त्याचा त्यानाच असह्य झाला. ते अपराध्याहून अपराधी झाल्यासारखे दिसूं लागले. त्या दिवशीं त्याना देवपूजा सुचली नाहीं.

लाडी व तिची बय पोरें घेऊन आडवाटेनें नदी उतरली व काळ नदीच्या कांठीं एका झाडाच्या सावलीला बसलीं. तें कुटुंब आडवाटेनें आलें. कारण कोणीं आपणांस भेटू नये अशी त्याची इच्छा होती. त्यांच्यासभोंवतीं त्याचें सामान अस्ताव्यस्त पडलें होतें. पलीकडे दमलेला दीपाजी त्याच्या प्रिय खलाटीकडे, त्याला परिचित अशा डोंगराकडे, रानाकडे आसवलेल्या डोळ्यांनीं पाहत होता. जणूं आपल्या जन्मभूमीचें रूप विसरलें जाऊं नये म्हणून शेवटचें दर्शन घेतांना तो तिचें रूप डोळ्यात सांठवीत होता, हृदयावर कोरीत होता. तो जणू तो देखावा पाठ करीत होता.

लाडीचा निरोप घेण्याकरितां मनोहर नदीवर गेला. लाडीनें दुसऱ्या बाजूला तोंड फिरवलें. आपल्याजवळ असलेले पैसे व सोन्याचीं बटणें त्यानें बयपुढें केलीं.

" यानं आमची अब्रू मिळंल का? " बयचा प्रश्न मनोहरचे काळीज फाडीत गेला.

" अब्रू तुम्हांला हाय अन् आमां गरीबांना नाय व्हय? " बयनें दुसरा प्रश्न केला.

मनोहर व्यथित अंतःकरणानें परत फिरला; कारण त्याच्या बसण्यानें त्या गरीबाच्या मानसिक यातना वाढूं लागल्या. वाटेंत त्याला अधू भेटला. अंधूला बाप्पाजींनीं पिटाळलें होतें.

मनोहरला न कळत, दीपाजीला भेटून गांवात परत फिरण्याबद्दल त्याचें मन वळीव, मी त्याला काहीं करणार नाहीं, मी त्याला राजपाटी वहिवाटीला देईन, असा माझा निरोप तू त्याला सांग, असें सांगून बाप्पाजींनीं अंधूला दीपाजीची समजूत करण्याकरता पाठविले होतें. कारण दीपाजीची केविलवाणी स्थिती पाहून ते व्यथित झाले होते; अगदीं गहिंवरून गेले होते. "येवढें करून दीपाजी परत फिरला नाहीं तर त्याला गाडीभर भात व लागतील ते पैसे घेऊन जा असें सांग. " म्हणून बाप्पाजींनीं अंधूला बजावलें होतें.

अंधूनें मनोहरला ही हकीकत सांगितली व नंतर तो दीपाजीकडे गेला व त्यानें दीपाजीची समजूत काढण्याचा प्रयत्न केला; तेव्हा दीपाजीनें गहिंवर गिळून अभिमानाने उत्तर दिलें.

" माझा मी स्वतंत्र आहे. माझी जिंदगानी फुकट गेली. आतां तुझ्या भाताला न् पोताला काय करूं? मला दुनिया मोकळी हाय. गरीबाला काय? त्याचं बिऱ्हाड विंचवासारखं त्याच्या पाठीवर! कुठंहि कष्ट करावेत न् कुठहि पोट भरावं! जा, बाप्पाजींना सांग, दीपाजी गरीब आहे, पण भिकारी नाय!"

---

# प्रकरण २४ वें

# लगिनसराई

दीपाजीच्या निघून जाण्यामुळें रानमईला कळा आली. गांवांतील प्रत्येक माणूस हळहळला. प्रत्येकाच्या हृदयांत दीपाजीबद्दल करुणा आणि सहानुभूति उत्पन्न झाली. बाप्पाजी कमालीचे उद्विग्न झाले. दीपाजी कुठें गेला त्याचा पत्ता नव्हता. नाहीं तर ते स्वतः त्या गावाला गेले असते आणि वाटेल तें करून त्यांनीं दीपाजीला समजावून आणले असतें. त्याच्याकरिता बाप्पाजींनीं वाटेल तो स्वार्थत्याग केला असता. त्यांच्या जुन्या बाळबोध मनात आंतरजातीय विवाह आला नाहीं. नाहीं तर त्यांनीं बाप्पाजींना लाडीबरोबर मनोहरचा विवाह देखील लावून दिला असता. धर्मामुळे ते कर्मठ झाले नव्हते; विचारी झाले होते.

मनोहरच्या पण मनाची स्थिति विलक्षण झाली. तो विषण्ण चित्तानें खलाटींतून हिंडे. त्याला सराईचे रम्य दिवस आठवून दुःख होई. लाडीच्या उजाड घरावरून तो एकदां तरी चक्कर मारी. गावातील उनाड कुत्रीं, उंदीर-घुशी यांचें तें निवासस्थान झालें होतें. लाडीच्या फुलबागेनें मान टाकली होती. एखाद्या पाखराचें घरटें एखाद्या द्वाड मुलानें मोडून टाकावें तसं तें झोपडें दिसत होतें. आणि या सगळ्या आपत्तीला तो स्वतः कारण होता, या विचाराने मनोहरचे अंतःकरण भडभडून येई. तो स्वतःच्या मनाला विचारी, ' मनोहर, तुझी शक्ति, तुझें सौंदर्य, तुझा पराक्रम याचा हाच का उपयोग ? तूं एका गरीब शेतकऱ्याच्या कुटुंबाचा सत्यानाश केलास. त्यांचे जीवन विषमय केलेस, त्याना समाजातून उठवलेस ! अभिलाषे-मुळें एका कुमारिकेला तूं फसवलेस आणि आपल्या वृद्ध मातापित्याना दुःख दिलेस ! हीच का तुझी विद्वत्ता ? हाच का शिक्षणाचा परिणाम ? हेंच का तुझें उदार मन ? हेच का तुझ्या आत्म्याचें पावित्र्य ? तूं दुबळेपणाने एका सुकुमारीला कुसकरून टाकलेस; कारण तारुण्याच्या उन्मादापुढें तू कमकुवत ठरलास. मनोहरनें आत्मसंशोधन करून हें असें कसें घडलें हें शोधून पाहिलें; परंतु त्याला हें कशामुळें घडले याचा ठिकाणा लागला नाहीं. इतकी आपत्ति भविष्यकालात वाढून ठेवली आहे, हें त्याला आधीं कळतें तर गोष्टी इतक्या थरापर्यंत आल्या नसत्या.

उतारावरचे पाणी मागें फिरत नाहीं. काल मागे येत नाहीं. जीवनाचा प्रवाह मागे हटत नाहीं. रानसईतील जीवन दीपाजीची फिकीर न करतां पुढे चालू लागले. थोड्याच दिवसात रानसईत एक आश्चर्यकारक गोष्ट घडून आली. तेथील पोस्टमास्तराकडे डॉक्टर अप्पासाहेब नांवाचे एक सद्‌गृहस्थ आपल्या मुलीसह तात्याच्या विनोबाना मुलगी दाखवण्याकरिता पाहुणे आले.

डॉक्टरसाहेबाच्या एका मित्राने तात्याचें स्थळ त्याना सुचविलें होतें. ते स्वतः हिंदुस्थान सरकारच्या मेडिकल खात्यात होते, पण पुढे त्याची नोकरी हिंदुस्थान सरकारने आफ्रिकेच्या मेडिकल खात्याला उसनी दिली होती. मुलीच्या लग्नाकारितां रजा घेऊन ते मुलाकडे मुंबईस येऊन राहिले होते. आफ्रिकेतील एका पोस्टमास्तरच्या ओळखीने ते रानसईच्या पोस्टमास्तराकडे उतरले.

आप्पासाहेबाच्या मुलीचें वर्णन करावयाचे म्हणजे ती सुंदर होती, पण सौंदर्यापेक्षा जास्त मोहक होती. तिला पुरुषाऐवजीं स्त्री-परिक्षकानें जास्त गुण दिले असते. तिच्यात उन्मादाऐवजीं प्रेम भरलें होतें, सौंदर्यापेक्षां सौ[illegible] प्रमाण जास्त होतें, कटाक्षाची जागा लज्जेनें घेतली होती. प्रणयिनीपेक्षा सहधर्मचारिणी होण्यास ती जास्त लायक होती. देवाला जाताना राजसबाईनीं तिला ओझरती पाहिली आणि त्या लुब्ध झाल्या. वात्सल्याने त्याचे मन भरून गेले. त्यातल्या त्यात तिला आई नाहीं असें जेव्हा त्याना कळले, तेव्हा तर सासू होण्याऐवजीं आपण तिची आई होऊ या, असे त्यानीं आपल्या मनाशीं ठरवले.

“ ऐकलं का ? अशी फक्कड आहे मुलगी. लाखात नाहीं मिळायची ! नाजुक नाजुक बाधा, तुरतुरीत कपाळातून निघालेलं नाक, केतकीसारखा रंग, हे हात अन् पोटऱ्या म्हणजे केळीचे खांब अन् काळेभोर केस. हा येवढा अंबाडा आहे तिचा ! कापाळपट्टी न् कान न् गळा नुसती मुखरण आहे. ”

“ हं ! ” जपाला बसलेल्या बाप्पाजींनीं हुकार दिला.

“ नुसतीच सुदर नाहीं तर सालस आहे पोरगी ! मीं तिची परीक्षा केली. ”

“ हं !” बाप्पाजी पुन्हां हुकारले.

" मला हुंडा नको, करणी न् मान-पान कांहीं नको, पण नग चांगला पाहिजे."

" लाडीइतकी सुंदर आहे का ?" परळीच्या वैजनाथाप्रमाणें बाप्पाजींचा नेहमींचा सिंहनाद झाला.

" हें काय भलतंच बोलणं ?"

" मग बोलू नकोस."

" स्वतः कशात लक्ष घालायचं नाहीं म्हणून तर ह्या असल्या भानगडी झाल्या."

" लाडीपेक्षा सुंदर मुलगी असल्याशिवाय का त्याचं मन रमेल ?"

" शेंकडोशा अशा गोष्टी घडतात; पण आपल्या मुलाचे आपणच अवगुण सागू लागलो म्हणजे काय होईल ? आपल्याला प्रेमाची पाखर नको का घालायला ?"

" अग, पण ती मुलगी विनोबाला सांगूत आली आहे. चोराची नजर बोचक्यावर असून उपयोग काय ? देणारानें दिली पाहिजे ना ?"

कुंठित राजसबाई उगी बसल्या.

त्याच दिवशीं अप्पासाहेबानीं कुसुमला तात्यांच्या येथें नेऊन विनोबाला दाखविण्याचे ठरवलें. पोस्टमास्तरांनी ' मुलीला दुसऱ्याच्या इथें कसें घेऊन जावयाचें ? आपणच त्या मंडळींना इथे बोलावू ' असा मोडता घातला. पण अप्पासाहेबानीं तो मोडून काढला. ते म्हणाले, " मला नाहीं वेळ बखेडे माजवायला. माझी रजा संपत आली आहे अन् मला परत आफ्रिकेंत परत जावयाचे आहे. तेवढ्यात सगळ उरकून घ्यावयाचं आहे. तुमच्या इथें कशाला गोंधळ माजवूं ?"

त्या दिवशीं विनोबाच्या बहिणी करवल्यासारख्या नाचूं लागल्या. जुना रेशमी कोट घालून व रुमाल बाधून तात्या लोडाजवळ हुक्याचा आकड्याचा विचार करीत बसले. विनोबांची आई नथीच्या दांड्याला रिठ्याचा फेस लावून ती नाकात चढवीत होत्या. विनोबा कोट-टोपी चढवून वडलांच्या हुकुमाची वाट पाहात माडीवर वाचीत बसले. काहीं तरी निमित्त करून अंधूजवळ गाडीच्या बैलांच्या गोष्टी करीत मनोहर वेसकटीजवळ टपून बसला. कारण कुसुमच्या सौंदर्याची कीर्ति त्याच्या कानांपर्यंत आली होती.

आणि असलें माणिक माकडाच्या गळयांत पडणार म्हणून तो हळहळत होता. इतक्यात रस्त्यानें येणाऱ्या अप्पासाहेबांच्या मागें चंद्रोदय झाला! कुसुमनें क्षणभर मनोहरकडे पाहिलें आणि मान खालीं घातली. एक क्षणभर दोघांची नजरानजर झाली. अप्पासाहेब देखील मनोहरला पहाण्याकरिता उभे राहिले व त्यांनीं बापूजींचा वाडा, परसूं, गाठा वगैरे गोष्टींच प्रथम निरीक्षण केलें. नंतर ते तात्याच्या बैसकटींत शिरले.

अप्पासाहेब तात्यांच्या शेजारीं बसले. विनोबांना तात्यानीं बोलावून घेतलें. नंतर कुसुमला पुढें आणली. कुसुम बराच वेळ विनोबाकडे पाहत राहिली. मग तिची आणि आणि अप्पासाहेबांची नजरानजर झाली आणि तिनें मान खालीं घातली. लाजून नव्हे, तर विनयाने मान खालीं घाला-वयास पाहिजे म्हणून.

अप्पासाहेब विनोबांना पाहून सर्दच झाले. विनोबांच्या चष्म्याच्या जाड काचा, बगळयासारखी मान, सरड्यासारखें पोंक, हातापायांच्या काड्या आणि गायवाणा चेहरा पाहून 'या माकडाला का आपण कन्यादान करणार' या विचारानें त्याना हसू कोसळलें; परतु त्यानीं ते महत्प्रयासानें दाबलें. त्यानीं कुसुमला घरात जाण्यास सांगितलें.

"आम्हाला मुलगी पसंत आहे. आता हुंड्याच्या ठरावाचा विचार करूं." तात्या अधीरतेने बोलले.

"मला आधीं मुलीला विचारलं पाहिजे. जसं मुलानं आता मुलगी पाहिली तसा मुलीने पण आताच मुलगा पाहिला. तिच्या आवडीनिवडी मला पाहिल्या पाहिजेत."

"म्हणजे? तुम्ही आधीं ठरवून आला नाहींत वाटतं? आता तुमची मुलगी मुलाला पसंत करणार? वा! हे सुधारकी चाळे आहेत!"

"तुम्ही काहीं म्हणा, मला सात मुलगे आणि एकच मुलगी आहे."

"विनायकराव, तुम्ही तें यदा मिळालेलं मेडल आण पाहू?"

आप्पासाहेब जावयास उठले.

"हीं पाहिलींत का आमच्या विनायकरावांचीं सर्टिफिकिटें?"

आप्पासाहेबांनीं तात्याना नमस्कार केला व कुसुमला घेऊन ते पोस्ट-ऑफिसांत परत गेले. तेथून त्यानीं 'मुलीला मुलगा पसंत नाहीं' असा लखलखीत निरोप पाठवला. गावच्या पोस्ट-मास्तरांना हें पसंत पडले नाहीं.

" यानें मुलीची अपकीर्ति होईल. दुसरी काहीं तरी सबब सागून आपल्याला आपलें कार्य साधतां येईल." पोस्ट-मास्तर म्हणाले.

" खरं सागण्याला काय हरकत आहे? असल्या दुटप्पी वागणुकीनें अखेरीला नुकसानच होतं. पण काय हो, केसूतात्याच्या समोरचा वाडा कोणाचा आहे?"

अप्पानीं मास्तरांजवळून सर्व माहिती काढून घेतली व मास्तरांना बाप्पाजींकडे निरोप देऊन पाठविलें कीं, " मुलगी घेऊन दाखवायला कधीं येऊ?"

तात्याना ही बातमी समजल्याबरोबर त्यानीं आपले हस्तक पाठवून अप्पाच्याजवळ बाप्पाजींची व मनोहरची खूप बदनामी करवली; त्याच्याविरुद्ध असलेल्या सर्व गोष्टींचा पाढा वाचवला. परतु अप्पा कसले खमंग! आफ्रिका खंड पालथे घातले होते त्यानीं. त्यानीं या गांवगुडाना आले तसे परत पाठविलें. नतर खुद्द केसूतात्या त्याच्याकडे आले.

" माझ्या विनायकरावाला कैक मुली सागून आल्या. दोन-दोन चार-चार हजार हुडा पण कबूल केला; परतु मुलगा एम्.ए.ची परीक्षा झाल्याशिवाय लग्न करीत नव्हता. आतांशीं झाला आहे कबूल. मी हुंड्याला देखील ताणून धरणार नाहीं. आमची ही असते संधिवाताने आजारी. तेव्हां म्हटल—"

" अहो, पण मुलीला मुलगा पसंत नाहीं."

" यदा होईल एम्.ए. तो फर्स्ट क्लासात."

" मला करायची काय विद्वत्ता! मला नवरा मुलगा पाहिजे आहे."

" अहो, तो देशपाड्याचा मन्या असा डाबिस आहे; नीतिबितीी काय नाय त्याला. एक पोरगी काढली नुकतीच त्यानें गावातली कीं हो!"

" तुमच्या मुलानें काढल्यात का कुणाच्या खोड्या?"

" छेः, फार सालस! धुतल्या तादळासारखा."

" मला नको असला जांवई. मनोहर लग्नाची परीक्षा पास झाला आहे."

" ह हंः काय नाय, काय नाय. आता काहीं बोलणंच राहिलं नाहीं. जातों मी आतां."

हताश तात्या घरीं परत फिरले. कुसुमकरितां त्यांनीं खूप लाळ घोटली, परंतु अप्पांनीं त्यांना दाद दिली नाहीं. नंतर अप्पा कुसुमला घेऊन बाप्पाजींकडे गेले.

"माझा जसा मुलगा तशी तुमची मुलगी. जन्माची जोड आहे ही. मला तुमच्यापासून कांहीं लपवायाचें नाहीं; नाहीं तर म्हणाल बाप्पाजी खोटं बोलला. माझ्याजवळ मुलाचा मुलाजा नाहीं, परमेश्वराचा नाहीं. तुम्हाला सगळ्या गोष्टी कळल्या ? गांवच्या लोकानीं तुम्हाला सांगितलच असेल ?" बाप्पाजी गंभीर आवाजात सांगूं लागले.

"कांहीं गोष्टी कळल्या." अप्पाजी तात्त्रिक बोलले.

"माझा मुलगा बी. ए. नाहीं."

"होईल."

"मला कर्ज आहे."

"फिटेल."

"माझा मुलगा बिघडला आहे."

"सुधारेल."

"माझा मुलगा एका मुलीच्या बाबतींत घसरला आहे. मी उघड उघड सांगून टाकतो."

"बाप्पाजी, असली चूक तरुणाच्या हातून होणार नाहीं तर काय म्हाताऱ्याच्या हातून होणार ? आणि उभ्या आयुष्यात एखादी चूक माणसाच्या हातून झाली तर त्याने काय मनुष्यजन्मातून उठून जावं ? क्षमा, दया, सहानुभूति हीं काय नीतीचीं तत्त्वे नाहींत ? पूर्ण शुद्ध असे हरीचे लाल किती आहेत पृथ्वीच्या पाठीवर ? बाप्पाजी, मला क्षमा करा. मला आपल्याबद्दल काहीं माहिती नाहीं; तेव्हा मला आपल्यावर घाणेरडा आरोप करावयाचा नाहीं. म्हणून तारुण्यातील चुका या सदरांतून मीं आपणाला वगळतों. पण माझे तारुण्य मीं आठवलें तर मनोहरपतांना एवढा दोष देतां येणार नाहीं. दुनिया हिंडून माझें हें मत झालें आहे. तरी मला बायकोची वेसण पडल्यावर मला सरनळ्यासारखे सात मुलगे आणि ही आठवी मुलगी झाली. मला जर संसारांतून त्या वेळीं कुणीं

उठवल असत तर माझी आजची स्थिति काय असती ? माझी मुलगी सालस आहे. मला तिच्याबद्दल आत्मविश्वास आहे कीं, ती तुमच्या मनोहरला सुधरवील. माझ्या मुलीला मुलगा आवडला. तुमच्या मुलाला मुलगी आवडली काय ? दरम्यान हुंड्यापाड्याचं काय ठरवता ? मला जरी पगार मोठा आहे, तरी परदेशांत राहून मी आठ मुलाचं कॉलेजचं, शाळाच शिक्षण केल आहे, हें ध्यानात ठेवा. तुम्ही स्पष्ट बोलता तसं स्पष्ट ऐका. ''

'' हें पहा अप्पासाहेब, तुम्ही खुल्या दिलान बोलता, मग मीहि सगळं सागून टाकतो. माझं नुसतं बडा घर आणि पोकळ वासा झाल आहे. ''

'' बाप्पाजी, मला माहीत आहे हा पोकळ वासा का झाला तो. कैक भुंगे लागले, तेव्हा पोकळ झाला असला पाहिजे हा. बाप्पाजी, यातील तुमच्या स्वतःच्या कारणीं किती लागल आहे ? आज नाहीं उद्या हा वासा भरीव होईल. ''

'' आप्पासाहेब, मला हुंडापाडा काहीं नको. मुलगी इतकी सुंदर आहे कीं दागिन्यामुळ दिला जास्त शोभा येणार नाहीं. मुलगी मनोहरच्या आईच्या मनात भरली आहे. मणीमंगळसूत्रानें मुलगी माझ्या हवालीं करा.''

अप्पा उठले व बाप्पाजींना कडकडून भेटले. इतक्यांत सुभद्रा फराळाचें ताटं घेऊन आली.

'' ही कोण ! मुलगी वाटत ? अगदीं कुसूसारखी सुदर आहे. '' अप्पा सुभद्रेच्या गळयातील हिरवी पोत न्याहाळीत उद्गारले.

'' हो, मनोहरच्या खालच्या नंबरची. ''

'' बाप्पाजी, तुम्हीं जसं माझं संकट निवारण केलंत, तसं मी पण तुमचं करतों; पण तुम्हाला कबूल असेल तर. माझा मधला मुलगा बी. कॉम्. होऊन मुंबईत बँकेंत नोकरीला लागला आहे; अकौंटन्सीच्या परीक्षेचा अभ्यास करीत आहे. तो खूप वाढेल. मॅनेजरची त्याच्यावर मर्जी आहे. तुमच्या मनोहरपेक्षां दोन वर्षांनीं लहान आहे. दिसण्यांत कुसुमसारखा दिसतो. मी त्याला तार करून बोलावतों. तुम्ही प्रत्यक्ष पहा, अन् मग

काय तें ठरवूं. एका कार्यांत दोन कार्यें उरकून जातील. मला पण हुंडा नको; चांगली मुलगी हवी आहे."

बाप्पाजींना आश्चर्याचा धक्काच बसला. त्यांनीं अप्पासाहेबांना लगेच रुकार दिला. मनोहरकडे ते विचारण्यास गेले तेव्हा मनोहरने चंद्रबळ करून प्रथम आढेवेढे घेतले. परंतु जेव्हा बप्पाजीनीं रुद्रावतार धारण करून आत्महत्त्या करण्याची धमकी दिली, नतर सुभद्रेचें कल्याण होऊन त्याचा प्रश्न कसा सुटतो हें समजावून सागितलें, तेव्हा तो नाटकी हावभावाने कबूल झाला. मनातून तो कुसुमच्या मीलनाकरिता अधीर झाला होता. तरी बळानें तो ओहटाच्या वेळच्या समुद्रासारखा नदीपासून मागे सरत होता. कुसुमचे सुकुमार सौंदर्य पाहून मनोहर क्षणभर लाडीला विसरून गेला !

कुसुमचा भाऊ पद्माकर मुंबईहून आला व दोन्हीं लग्नें मुकर झालीं. राजसबाईना अवसान चढले. बाप्पाजींना अवसान चढले. बाप्पाजींनीं खुषीनें राजपाटी समना गमनाला गहाण लिहून दिली व पैसे काढले. कारण त्याना थाटात लग्नें करावयाचीं होतीं. राजसबाईनीं पुण्यास जाऊन सोनें-चादी खरेदी केलीं, कापड खरेदी केलें व आठ दिवस त्या सोनाराचें डोकें धरून बसल्या. मनोहरच्या लग्नावर बाप्पाजींचीं कुळे व आजूबाजूच्या गावचे लोक टपून बसले होते, तेव्हा त्याना टाळणे बाप्पाजींना शक्य नव्हतें. जें होईल तें होईल ! परमेश्वराला काळजी ! त्याने सर्व जुळवून आणले आहे; संकटे टाळलीं आहेत. तेव्हा अन्नदान खूप करावयाचे हा संकल्प बाप्पा-जींनीं केला व ही त्यांची कैक दिवसाची मनीषा होती. बाप्पाजींनीं लग्नाचें सामान जोरात खरेदी केलें. बुंदीच्या कळ्या पाडण्याचे कारखाने उघडले; लाडवानीं कणगे भरले. सगळा गाव उत्साहानें त्याच्या मदतीला धांवला.

राजसबाई व बाप्पाजी लाडीला विसरले. मनोहर विसरण्याचा प्रयत्न करीत होता. तो एका नव्या स्वप्नाची, नव्या सुगंधाची, नव्या सौंदर्याची नव्या भावनांची वाट पाहत होता. तो दिवस उगवला. लग्नें झालीं. सरत्या फाल्गुनांत मनोहर–कुसुम, सुभद्रा–पद्माकर यांचीं लग्नें झालीं. सुगंधाच्या दर्याच्या तळाशीं बुडून नक्षत्रखचित आकाशाखालीं त्यानें लाडीच्या प्रणयाचा आस्वाद घेतला होता, परंतु जेव्हां मनोरमा–कारण कुसुमचें

सासरचे नाव मनोहरने मनोरमा ठेवले होतें--त्याच्याकडे हळुवार पावलें टाकीत आली, तेव्हां 'विधात्यानें चंद्रकिरणे जमवून ही मूर्ति घडवली काय?' असा मनोहरला प्रश्न पडला. तो तिला स्पर्श करण्यास भ्याला. त्यानें असलें सौकुमार्य कधींच पाहिलें नव्हतें. त्याला वाटलें, तिला स्पर्श केला तर परागांची वृष्टि होईल.

रानसईत लग्नाचा सोहळा कडाक्याचा झाला. महार, ठाकूर, कातोडी व गावकरी याना बाप्पाजींनीं पोट फुटेपर्यंत लाडू खायला घातले. तीन वेळा लाडू बाधावे लागले. लग्नाच्या आधींपासूनच बाप्पाजींनीं वाढणें सुरू केलीं व गांवकऱ्याना पचकडीनें दोन्हीं हातांनीं लाडू वाढले. बाप्पाजी लाडू उपसूं लागले कीं, राजसबाई त्याच्यावर लटक्याच रागवत व बाप्पाजी त्याना चोरून लाडू लाबवीत. गोठ्यात आणि पडव्यातून ठाकूर-कातोड्याची पंगत बसली, तेव्हा बाप्पाजींनीं अप्पांना बोटाला धरून तिकडे नेलें व सागितलें.

" हे, हे माझे खरे मानकरी ! यांना तुम्ही जपा. तुम्ही विलातचे लोक. यांना भिऊं नका हो ! हे तुमच्या केसांना धक्का लावणार नाहींत. आमच्या अंकुशानं जरी बंड उभारलं आहे, तरी तुम्ही दारं उघडीं टाकून निजा."

अप्पा कातोड्याना पाहून खूप खूष झाले.

" याचे बाप आफ्रिकेत आहेत, बाप्पाजी ! झुलू लोक म्हणतात त्यांना. असें सुदर नाचतात न् गाणीं म्हणतात ! माझ्याजवळ फोनोग्राफ्‌च्या रेकार्डस आहेत त्यांच्या. आपण उद्यां रात्रीं त्या लावू आणि यांचा नाच करूं "

अप्पांनीं बाप्पाजींना आफ्रिकेची खूप माहिती सागितली.

अप्पासाहेब बाप्पाजींसारखेच खर्चिक होते. लोक म्हणाले, अप्पा-बाप्पा खरे इवाई-इवाई आहेत. अप्पानीं रात्रभर कातोड्याचा नाच केला व त्यांना पंचवीस रुपये दारूला दिले. नाचूननाचून कातोड्यांनीं अंगणाला खळ्या पाडल्या.

याप्रमाणें रानसईत दोन्हीं लग्नांची दंगल उडाली.

सुभद्रा वऱ्हाडाबरोबर मुंबईस गेली व मनोरमा रानसईत सासरीं राहिली.

" सुभद्रा सासरीं गेली आहे असं कांहीं मला बाई वाटत नाहीं!" राजसबाई मनोरमेकडे पाहून बोलूं लागल्या.

आणि खरोखर मनोरमेचं वर्तन तसंच होतं. तिला दाखविण्याकरितां आणली, त्याच वेळीं तिनें चहाची आणि फराळाची अशी फक्कड आणि निर्मळ व्यवस्था केली होती कीं, राजसबाई अगदीं खूष होऊन गेल्या. वरातीच्या दुसऱ्या दिवसापासून, राजसबाई नको नको म्हणत असताना-देखील, मनोरमेनें कामाला कबर कसली. राजसबाईनीं तिच्या अंगावर कपाटाच्या, हडप्याच्या, पेट्यांच्या चाव्यांचा जुडगा फेकला. त्यांनीं संसाराच्या चक्रातून अंग काढून घेतलें व झाकढाळ, ठेवणे-रेवणे, वाढणे-घालणे वगैरे सर्व व्यवस्था आपल्या लाडक्या सुनेवर सोपविली. आपल्या सुविचारानीं, मधुर भाषणांनीं व सौजन्याने मनोरमेने मनोहरला पूर्ण वश केलें. त्या दोघाचे दिवस आनदांत जाऊं लागले.

काम संपलें कीं मनोहर आणि मनोरमा माडीवर एके ठिकाणीं बसत, विनोद-विलास करीत, फिरायला जात. त्याचा प्रणयविलास गंगेच्या प्रवाहात पोहणीस पडलेल्या हंसहंसीप्रमाणें विशुद्ध होता. त्यांत उत्तानता नव्हती. राजसबाई किंवा बाप्पाजी त्याना मना करीत नसत. कारण कसे तरी करून तो लाडी विसरो, अशी ते इच्छा करीत होते.

---

# प्रकरण २५ वें

## पंचाईत

कातोड्याचें बंड रानसईला चागलेंच माजूं लागलें. अंकुशाला आणखी फरारी कातोडी येऊन मिळाले. आतकरगावचा भोज्या, वरसईचा सित्या अन् टाकळीचा पाड्या. अंकुशा आपल्याला कातोड्याचा सरदार म्हणवून घेऊं लागला. कातोड्याचें रानांत राज्य स्थापन करावयाचे व खरोखरीचा वनचा राजा व्हावयाचे हें वेड त्याच्या डोक्यात शिरलें. त्याला आतापर्यंत आलेल्या यशामुळे त्याचे धाडस वाढले व तो चोऱ्यावरून दरोड्यापर्यंत आला. फरारी कातोडी अकुशाच्या हुकमतीखालीं वागत. ते सर्व निशाण-बाज आणि तरबेज गडी होते. अंकुशाने स्वतःवर पोवाडे रचले व सध्या-काळीं त्याला पकडण्यास आलेली पोलिसाची तुकडी त्याला न पकडतां हात हालवीत दमूनभागून खालून जाऊ लागली कीं, तो ते पवाडे कड्या-वरून भरदार आवाजात म्हणे व पोलिसाना खिजवी. ते पवाडे खेडेगांवच्या पोराबाळाच्या तोंडीं जाऊन बसले. याप्रमाणें डोंगरातील कडे, रानें, तिठे, गवंड याना, त्याचप्रमाणें करकरीत तिन्ही साजा, मध्यान्ह रात, आवस, काळोखीपाक, यांना रानसईत अद्‌भुत रम्यतेचा रंग चढला. कोणी म्हणत ‘ आम्हीं अंकुशाला इथें पाहिला, तिथें पाहिला. तो सकाळीं भेटला. तो दुपारीं दिसला. त्यानें वेषातर केले होते. ’ याप्रमाणें कंड्यांना ऊत आला.

कातोड्याच्या बंडाप्रमाणे रानसईत आणखी एक अद्‌भुतरम्य गोष्ट घडली. दीपाजी मुंबईला गेला होता तो परत रानसईला आला. येतांना त्यानें मुंबईच्या एका सहकामगाराच्या ओळखीनें रानसईच्या पलीकडील तीन-चार खोंडी टाकून जासई नावाचे गांव आहे, तेथील एका शेतकऱ्याच्या मुलाबरोबर लाडीचें लग्न लावले. पोरगा लाडीइतकाच वयाने होता; पण मुलगी सुंदर म्हणून पाटलानें कबूल केले व देज पण मोठा दिला.

दीपाजीला मुंबईस चैन पडत नव्हतें. तो रानसईस जाण्यास उत्सुक झाला. जासईला लाडीचें लग्न लावल्याबरोबर तो रानसईला आला. बाप्पाजींना दीपाजी परत आला आहे व लाडीचें लग्न लागलें आहे ही हकीकत कळली तेव्हां त्यांचा जीव खालीं पडला. त्यानीं अंधूबरोबर त्याला निरोप धाठवला कीं, ‘ तुझा राब तयार आहे. तूं आपली शेती कर. ’

दीपाजी आला त्याचे दुसरे दिवशीं संध्याकाळीं वळीवाची मोठी वावटळ

सुटली. आकाशांत धूळ उठली व डोंगर दिसेनासे झाले. झाडें मोडून पडलीं. आंब्या-जांभळींच्या झाडाखालीं फळाचा सडा झाला. आकाशांत उडालेली धूळ सध्याप्रकाशांत सोन्याच्या तापलेल्या चुऱ्याप्रमाणें लकाकत होती. त्या सोनेरी धुळींतून सोनेरी ढग कुबेराच्या वैमानिक काफिल्यांप्रमाणें जमा झाले होते व दरिद्री शेतकऱ्याच्या भूमीवर सोन्याचा वर्षाव करीत होते. त्यातून इद्र पर्वतावर वज्राचा मारा करीत होता. काळा कडा हें त्याचें अंतिम लक्ष्य होतें. काळ्या कड्यावर ढगानीं गर्दी केली. ढगात वीज चमकली कीं ती झाडावर, नाहीं तर कपारीवर कोसळे व पृथ्वीच्या गर्भापर्यंत टराटर आवाज करीत जाई. रानसईतील पेरिबाळे या कडकडाटानें भेदरून गेलीं. वारा कमी झाला व पावसाची जोरांत सर आली. काळा कडा अर्धा-अधिक धुक्यात गडप झाला. तेथे दरींतील डोंगराच्या अंगाअंगानें ढग सागाच्या पानावर टपोरे थेंब टाकीत व आवाज करीत काळ्या कड्यावर जमले व त्यांनीं विजा चमकवून व जलधारा सोडून प्रलय माडला. पाऊस थांबला तेव्हां सोनेरी उन्हांत ‘भैरव’ धबधबा काळ्या कड्यावरून प्रचंड जयघोष करीत खालीं काळ नदींत कोसळू लागला. त्याच्या सोंडेत पाणी मावत नव्हते. सोंड मोठी फुगल्यामुळे पाणी नीट पडत होतें. माथ्यावरील तांबडमाती वाहून आल्यामुळे सोंड लालभडक झाली होती. त्या लाल सोंडेवर सोनेरी ऊन पडून ती आणखी लाल दिसत होती. ‘भैरवाचे’ पाणी नेहमीं दुधासारखे स्वच्छ असावयाचें, परंतु यदा अवकाळ्या पाऊस एकदम झाल्यामुळें भैरव लाल दिसूं लागला. रानसईच्या आसपास बरेच डोंगर होते व त्यावरून पुष्कळ धबधबे पडत; परंतु पूर येईल असा जोराचा पाऊस फक्त काळ्या कड्यावरच पडला. हा चमत्कार पाहण्याकरिता रानसईचे लोक घराबाहेर पडले. काहीं माळावर आले. इतक्यांत दुसरा चमत्कार झाला.

अद्याप काळ्या कड्याच्या बाजूला झिमझिम पाऊस पडत होता. त्यातून काळ्या कड्यावर एक इंद्रधनुष्य तरगूं लागलें. पाऊस पडण्याचा थांबला. इंद्रधनुष्याच्या कमानींतून बरोबर माथ्यावर ‘भैरवा’ची सोंड पडत होती. मनोहरने मनोरमेला तें दृश्य पाहण्यास आगाशींत बोलावलें. बाप्पाजी व राजसबाई खालीं होत्या. मनोहरनें मनोरमेला जवळ ओढलें व तिचे

खांद्यावर बाहुपाश टाकला. मनोरमेनें पण त्याच्या वक्षःस्थलावर डोकें टेकलें. अशा तऱ्हेनें तीं दोघे ' भैरवाचा ' चमत्कार पाहूं लागलीं. इतक्यात आणखी एक चमत्कार झाला.

" पलाली रं पलाली रं पलाली रं. धरा धरा धरा." अशी गोंग झाली व काठ्या घेतलेल्या पंचवीस लोकाची राग ओरडत काळया कड्याखालून निघाली. त्याबरोबर भैरवाच्या धोधाणीजवळ बंदुकीचे बार झाले व पळत येणाऱ्या लोकाचें बेंड गोंधळून जागच्या जागीं उभें राहिलें. धोंधाणीच्या कड्यावर अंकुशा व त्याचे कातोडी उभे होते व त्यांनींच बार काढून त्या रागेला रोखून थोपवलें होते. बेंडातले लोक अंकुशाला काहींतरी ओरडून सागत होते. इतक्यात अकुशा व कातोडी पोट धरून हंसू लागले व कड्याच्या खालीं वाकून पाहू लागले. गंमत पाहणारे रानसईचे लोक पण त्या बाजूला निरीक्षण करूं लागले, तर काय? लाडी सायंताऱ्याप्रमाणें कर्वत-कड्याच्या सात पायऱ्यानीं ' भैरवा ' च्या शेजारून इंद्रधनुष्याच्या कमानींतून खालीं उतरत आहे व तिच्यावर सोनेरी उन्हाचा झोत पडून ती स्पष्ट दिसत आहे.

लाडी गावाच्या पादणीवर येईपर्यंत अंकुशानें बेंटाला थोपवून धरलें. नंतर त्याने थोपवून धरलेल्या लोकाना खालीं जाण्याची परवानगी दिली. लाडी घरीं आली तों तिनें थेट माळा गाठला.

लाडीच्या पाठोपाठ तिच्या सासरची मंडळी शिकारी कुत्र्याप्रमाणें गांवकऱ्यावर डोळे गुरकावीत रानसईत शिरली. प्रत्येकाच्या हातात डोकी-इतकी उंच काठी होती. हेलकावणाऱ्या त्या पंचवीस काठ्या ठोक ठोक आवाज करीत झोंपड्याच्या रांगेतून दीपाजीच्या घरासमोर येऊन उभ्या राहिल्या. सगळ्याच्या अग्रभागीं उपरण्यानें कंबर बांधून लटपट करीत करड्या कल्ल्याचा लाडीचा सासरा चालला होता.

" या, इवाई या." दीपाजीनें घोंगडी हंथरली.

बयनें ऊन्ह पाण्याचा तपेला-तपेली व पाय धुण्याकरितां पाट अंगणात मांडला. रानसईच्या लोकाची गर्दी आजूबाजूच्या झोंपड्यातून उभी राहिली. जासईचे लोक दीपाजीच्या अंगणांत गेले नाहींत. बाहेरच काठ्या उभ्या धरून ते रस्त्यावर कुंपणीच्या कडेला बसले. इतक्यांत गावातली वडीलधारी मंडळी दीपाजीच्या मदतीला धांवली.

" इवाई हारपाटील, झालं तें वाहिलं. वाहिली ती गंगा. घरांत चला. दमलात, चा–पाणी करा " दीपाजीनें हारपाटलासमोर हात जोडले.

इवाहींनीं रस्त्याच्या धुळींत दीपाजीला साष्टाग नमस्कार घातला.

" बाबा, लाब सोयरीक ठरवून मान कापलीस. तुझी लेक तूच संभाळ रं बाबा." हार पाटील तळतळू लागला.

दंडाला धरून सयाजीनें म्हाताऱ्याला उठवलें.

" सोन्यासारखी पोर ! जरा बाळबुद्धि हाय, रमली कीं रमली. भाकर-तुकडा खा, आजच्या रातीला इथं वस्ती करा अन् उद्याच्याला आपल्या घरीं सोन्याच्या पायीं लक्षुमी चालून आली तिला घेऊन जा." सयाजीनें म्हाताऱ्याला पुन्हां समजावलें.

" अवं, सोन्याची सुरी झाली म्हून काय उरात का घालायची ! हिरकणी चमकते म्हून खायची का आहे ? आम्हीं वऱ्हाड घॉलवलं अन् परात फिरलो, तर ही बया पाणोठ्यावर हडा टाकून पळाली. आम्हीं समद्या गावान बुड्या मारूनशानी समदं डव्ह तपासले. नाय हिची अन् नवऱ्याची गाठ ना भेट. ना बोलण न चालणं. मग आमाला वाटलं हिनं कशापायीं जीव दिला ? दमलों आमी बुड्या मारून. इतक्यात म्हारं आलीं साय-गावचीं. तीं म्हणालीं, ' पगता काय ? पोर पलाली. आमीं तिला आरवली, तर हरणीसारखं रान गांठलन् तिनं ! ' आज पंचवीस गडी दोन दिवस तिच्यामाग पलत हाव. बाबा, आता तुझी ही हिरकणी कीं गारगोटी तुझी तूं सभाळ. कुठं गेली आली तर म्हणशील, आम्हीं मारली."

" पाव्हण, नीट रीतीनं बोला. तुमच्या गोठ्यात गाय बांधली. ऑ. आतां तिचा समदा परतिपाळ तुम्हीं केला पाहिजे. ऑ. खरं कीं नाय, सयाजी बाबा ? काय व्हं गजाबा ? " बज्या थरकुडयानें एक बाजू माडली.

" थूः थूः बाबा, मला नग ही. ही काडी मोडली तुमच्या समद्याच्या देखत. " लाडीच्या नवऱ्यानें गवताची एक काडी उचलली.

" बारकू पाटील, टाका ती कारी. एकदम अशी घाई नाय पाहिजे." हार पाटलानें आपल्या मुलाला दाबलें.

" अरं, काडी काय मोडतोस मर्दा, गाडगं फोड लाडीच्या नांवानं. पन पंचायत झाल्याबिगार नाय. पचानीं पाह्यला पाहिजे कुनाचा अन्याव हाय तो." गज्या हरकुडयाला आवेश चढला.

"अरं जा पचायत भरवणारे. पंचवीस काव्या हायती जासईच्या. झोडीत नेऊं अवदसेला. काडीमोड मागते लग्नाच्या दुसरे दिवशीं! देज घेतलान् दागिने घातलेत, ते बापाचा माल! नाय देणार काडीमोड. तशी कुजत ठेवू. रानसईचं दाड तर जासईच बाड." बारकू पाटलाचा चुलत-भाऊ आरोळ्या मारूं लागला.

इतक्यात दीपाजीच्या झोंपडींतून दागिन्यांचे गठलें आलें तें बोलणाऱ्याचे तोंडावर फाड्दिशीं आदळले. लाडीनें ते फेकून मारलें होते.

"बघा बघा पाटील, तुमीच बघा." बारकू सयाजीला सागूं लागला. "आता पंचायतीबिगार ह्यो तटा मिटायाचा नाय."

हार पाटलाने दीपाजीच्या अगणात जेठा मारला.

काळणाच्या दारू-दुकानात त्वरेने मनुष्य गेला. चितई व दीपाजी यांच्या तावडींतून वाचलेले कोंबडे गज्या हरकुड्याकडे बयने साभाळण्या-करिता दिले होते, त्याना आणण्यात आलें. चा-पाणी झाल्यावर रात्रीं पंचायत बसली. पंचायत रात्रभर चालली. बेवड्याच्या पहिल्याच ठसक्याला हार पाटील जे आहेत्ते बोलते झाले. त्याचें पोट जरा गरम गरम झाले. मग ते इवाह्याच्या गळ्यात गळा घालून रडूं लागले.

पच आपसात भाडूं लागले; मारामाऱ्या करूं लागले. प्रत्येकजण 'तुमच राहू द्या, माझं ऐका' करून गोंधळ माजवूं लागला. पंचायतींत जासईच्या अन् रानसईच्या सर्व उखाळ्यापाखाळ्या निघाल्या. एकमेक वर्दळीवर आले; एक झाले. पुन्हां वर्दळीवर आले; पुन्हां एक झाले. लाडीची पंचायत संपायच्या आधीं पंचाच्या आपसातील मारामारीची एक पंचायत झाली. जासईच्या गोमीची झाली. रानसईच्या चिमीची झाली. सायगांवच्या धोंड्याची झाली. डोंगरगावच्या कोंड्याची झाली व पुढें सर्वानुमतें लाडीला पुन्हां सासरीं पाठवण्याचें ठरलें. पंचानीं हार पाटलावर पंचवीस रुपये दंड ठेवला. त्या निकालावर अपील नव्हतें. त्या निकालपत्रांत कारण नव्हते. त्या पैशाची लगेच दारू आणण्यात आली. दुसरे दिवशीं झुंजरूक पचवीस काव्याच्या माडवात लाडीची वरात काळ्या कड्याच्या वाटेनें जासईला परत गेली. त्या वेळीं काळ्या कड्यावरून अंकुशानें त्यांना दुर्बिणीनें हेरलें.

## प्रकरण २६ वें
# लाडीचा भाऊ

बाप्पाजींचा कर्जाचा डोगर किती का मोठा असेना, अद्याप बाप्पाजींच्या इथे भादव्यात भात आणि चैत्रांत ताक होते. उन्हाळ्या आगीमुळे घरो-घरच्या गाईम्हशी उडाल्या. 'बारा म्हशी तेरा गाई, अन्नशुद्धीला तूप नाही' अशी स्थिति प्रत्येक गोठ्यात आली. पण बाप्पाजींच्या इथं ज्येष्ठाच्या महिन्यात ताकाचा डेरा घुमत होता. पविऱ्यात पुढला पाय पुढे टाकून मनोरमा पदर कसलेली कंबर वाकवून रवीच्या दोऱ्या ओढीत होती. मनोहर पाटावर भगवद्गीता वाचण्याचे ढोंग करीत होता. त्याचे सगळें लक्ष मनोरमेच्या लवणाऱ्या व वाकणाऱ्या पुष्पमंडित अवयवाकडे होते. मनोरमेने आपल्या रूपगुणांनीं त्याला पूर्ण वश करून घेतले होतें. पुन्हां गावात लाडीचें पण विघ्न नव्हतें. त्यामुळे बाप्पाजी व राजसबाई पुष्कळशा निश्चित झाल्या होत्या. पायगुणाच्या त्याच्या लाडक्या सुनेनें मनोहरला माणसात बसवले म्हणून त्या अगदीं खूष होत्या. तें म्हातारे जोडपें या नवपरिणीत वधूवराना खूप स्वातंत्र्य देई.

" 'धर्माविरुद्धो भूतेषु कामोऽस्मि भरतर्षभ' खुद्द भगवंतांनींच हें म्हटलें आहे." डेऱ्याने केलें घुम घुम. मनोरमेने कसलेला पदर सोडला व त्यानें आपली घामाने भिजलेली कपाळपट्टी पुसली.

मनोहरने भगवद्गीता मिटली व तो गोड गळ्यानें गात पाटावरून उठला.

" तामनुसर सरसीरुहलोचन या तव हरति विषादम्."

मनोहर मनोरमेजवळ आला.

" म्हणजे तें काय ?" सलज्ज मनोरमेनें विचारलें.

" म्हणजे हें." मनोहरनें तिचें चुंबन घेतले.

" मोठ्या आई आंघोळील्या गेल्या आहेत. त्या आंत येतील ना ! " मनोरमा घाबरून बोलूं लागली.

" येऊं देत. असं प्रहरभर ताक करायचं नसतं आण पाहूं रवीच्या दोऱ्या इकडं. मी एका दमात ताक करून दाखवतो."

मनोहर जोरजोराने रवीच्या दोऱ्या ओढूं लागला. डेरा ' घाम् घुम् ' करून प्रचंड आवाज काढूं लागला. दहीं डेऱ्याबाहेर उसळून त्याच्या शितोड्यानीं आजुबाजूची जमीन पांढरी झाली. रवी इतक्या जोराने फिरू लागली कीं, ती फिरताना दिसेना. उघड्या अंगाच्या मनोहरचे कसदार स्नायू फुगू लागले. मनोरमा भिंतीला टेकून त्याच्याकडे प्रेमानिर्भरानें पाहूं लागली.

" एक हजार फेरे झाले. अझून कसं ताक झालं नाहीं ? " बाप्पाजी ओटीवर जप करीत बसले होते ते स्वत:शींच पुटपुटले. कारण त्याच्या अंदाजाबाहेर ताक लांबले.

" थांबवा, थांबवा आता. माझं ताक बिघडेल. आता पाणी घालायला पाहिजे. " मनोरमा मनोहरला थांबवूं लागली.

मनोहरने तिच्याकडे लक्ष न देता उलट रवी ओढण्याची गति वाढवली. रवीचा दांडा घर्षणाने खूप तापला. दोऱ्याच्या दशा उडून त्या बारीक झाल्या, तरी मनोहरने रवी सोडली नाहीं. इतक्यात दोऱ्या ताडदिशी तुटल्या व मनोहर पलीकडच्या भिंतीवर जाऊन आदळला. तेव्हा मनोरमा मनोहरची फजिती झाली म्हणून जोरजोरानें हंसूं लागली. त्याच वेळीं मागील दारानें राजसबाई व्यंकटेशस्तोत्र म्हणत ओलेत्याने माजघरात आल्या. त्याबरोबर मनोहरनें पलायन केले. मनोरमेला हसूं आवरेना. ती पण स्वयपाकघरात पळाली.

" पुत्राचे सहस्र अपराध । माता काय मानी तयाचा खेद । तेवी तू कृपाळू गोविंद । मायबाप मजलागीं ॥ मनोरमा ताक टाकून कुठं गेली ! अन् ह्या दोऱ्या कोणीं तोडल्या अन् ताक कुणीं साडल." राजसबाईनीं वांकून ताक झालें किंवा नाहीं ते पाहिलें.

अशा तऱ्हेनें मनोहरचे दिवस आनंदात जाऊं लागले. मनोरमेच्या सहवासांत त्याला पुन्हा रम्यता मिळू लागली. लाडी आणि सराईचे दिवस तो पूर्णपणें विसरून गेला.

बाप्पाजींनीं थाटानें मुलामुलींचीं लग्नें केलीं होतीं; कारण त्याच्या डोक्यावरचें मानसिक ओझें कमी झालें होतें; तथापि त्यामुळें त्याचें चांगलेंच सालटें निघाले व डोक्यावर कर्जाचा आणखी डोंगर वाढला. ज्या

दिवशीं राजपाटीचा कागद झाला त्याच दिवशीं समनाची आणि केसू तात्याची टाळी झाली. आता बाप्पाजी जाळ्यांत पुरे गुरफटले आहेत व त्यातून ते सुटणार नाहींत, अशी दोघांची खात्री झाली; परंतु समना गमनाच्या हुकूमनाम्याने बाप्पाजींवर एक उपकार केला. कोर्टानें कटमितीचें व्याज आकारून कर्ज कायम ठरवलें. त्याचप्रमाणे बाप्पाजीचे बींबियाणें व खावटी सोडून बाकीचे भात वसूलात घातलें. त्यामुळे आता मागील खात्याच्या जमाखर्चाचा मारवाडी गोंधळ राहिला नाहीं. गहाणाचें कर्ज लेखी असल्यामुळे त्याचा कांहीं गोंधळ होणे शक्य नव्हतें. बाप्पाजींची अडचण झाली ती निराळ्या कारणामुळे. दरसाल ते समनाकडून उधार सामान आणीत व आपल्या नावावर कुळाना उधार माल देववीत, तेव्हां बाप्पाजीची शेती लागून निघे. त्याचप्रमाणें शेताकरिता लागणारी पैसामजुरी ते पूर्वी समनाकडून आणीत व त्याला माफक व्याज असे. यदा समनाने तो व्यवहार बंद केला. दुसरीकडून पैसा आणावयाचा म्हणजे प्रॉमिसरी नोटीवर जबर व्याज देऊन आणला पाहिजे. अशा अडचणींत बाप्पाजी सापडले. त्यामुळें या वर्षी त्याची कैक कामे राहिलीं. घर शाकारावयाचे होतें तें तसेंच राहिलें. वाडा दुरुस्त करावयाचा होता तोहि तसाच राहिला. वावटळीनें वाडा पार झुकला होता. प्रत्येकाला चिंता उत्पन्न झाली कीं, वाडा जर रात्रीं पडला तर शेतीचीं सगळीं जनावरं खलास व्हावयाचीं. पुष्कळानीं मोघम–तर सयाजीनें स्पष्ट शब्दात–बाप्पाजींना सूचना दिली; पण बाप्पाजी काय करणार ! समनाने यापुढें कर्ज देण्याचे नाकारले. दुसरीकडे येवढें कर्ज मिळणे शक्य नव्हते. वाड्याला हात लावायची खोटी कीं, वाड्यानें पांचशें रुपये खाल्ले असते. शिवाय पाऊस डोकीवर असल्यामुळे वाडा उस्तरणें शक्य नव्हते. एकदम पावसाळा सुरू झाला तर काम अर्धेगीं रहावयाचें आणि पुन्हा वर फजिती. वाड्याला मेढीचे धिरे देऊन झुकलेलें वजन तोलणें शक्य नव्हते, इतका तो कलला होता. वादळाचे दुसरे दिवसापासून आगोटीचे ओले वारे अत्यंत जोरानें सुरू झाले, परंतु ढग कांहीं जमले नाहींत. वाऱ्याच्या जोरामुळें वाडा करंकरं करून सारखा वाजे. बाप्पाजी दैवावर हवाला ठेवून ओटीवर जप करीत बसत. मनोहरनें वाड्याबद्दल

प्रश्न केला कीं, "छुट्, काय व्हावयाचें असेल तें होईल" असें ते म्हणत व गप्प बसत.

केसूतात्या निजतांना देवाची प्रार्थना करीत कीं, वाडा पडल्याचा आवाज देवा आज रात्रीं ऐकूं येऊं दे. पण तात्यानीं झुंजरूक उठून पहावें तो वाडा शाबूत ! परतु कारकार वाजतो आहे. दिवसा त्यानीं दोनचार वेळा कानोसा घ्यावा, जरा कुठें कांहीं वाजल कीं, धडपडत बाहेर यावे पण त्याना वाडा जशाच्या तसा करकरताना दिसावा. "पाडुरगानें बाप्पाजींच्या-करिता वाडा झेलून धरला आहे," लोकानीं म्हणावे.

मनोहरनें वाड्याची नादुरुस्ती पूर्ण लक्षात घेतली व वाड्याच्या आतल्या बाजूस आढ्याखालीं दर काढण्याकरिता अधूला खूण करून दिली. त्या वेळीं बाप्पाजी अगणातून ओरडले, "मरूं दे तो वाडा आणि गुरढोरं, पण तू त्याच्याखालीं जाऊं नकोस."

मनोहरनें वाड्याची उंची व दराची खोली मापली व त्या मापाची सागाच्या मजबूत सोट्याची मेढ कापून आणली. बाप्पाजींना मनोहर काय करतो आहे तें कळेना.

"मनोहर, काय चालवलं आहे? वाडा पडायचाच."

मनोहरने अंधूला सोटाची साल काढण्यास सागितलें. तात्या उपहासानें टेहळणी-बुरुजावर चढले.

"ही येवढी लांबलचक मेढ वाड्यांत शिरणार कशी ?" बाप्पाजींनीं त्रासून विचारले.

"आपण वाड्याच्या छपराला आढ्यातून भोक पाडून वरून मेढ खालीं सोडूं, म्हणजे सबध आढ झेलील न ?"

"छुट्, कांहीं तरीच करता. तुम्ही वाड्याला हात लावला कीं वाडा खालीं येईल. नका त्या फदांत पडूं." बाप्पाजी वैतागले.

मेढीच्या सोटाची साल काढीपर्यंत सध्याकाळ झाली. दुपारनतर वाऱ्यानें आणखी जोर केला. ओटीवर जप करीत बसलेल्या बाप्पाजींचीं संकटें पाहून वाडा आणखी 'कारकार करकर' करत डुलूं लागला. पावसाची बुरबूर सुरू झाली. वाड्याचीं पाखीं भिजून जड झालीं. गावातील एकहि इसम वाडयावर चढायला किंवा आत जाऊन काम करायला

तयार होईना; तेव्हा मनोहरनें काचा मारला व शर्ट काढला. बाप्पाजी, राजसबाई व माडीवरून मनोरमा 'नको नको' म्हणून ओरडूं लागले. बाप्पाजीच्या हुकमावरून अधू बाजूला सरला. मनोहरनें हट्टाला पेटून एकट्यानें ती मेढ वाड्याच्या पारव्याला लावली. मग तो वाड्याचे आढ्यावर चढून गेला. केसूतात्याचे आशेला पालवी फुटली. ते मनांतल्या मनात देवाला नवस करूं लागले.

मनोहर बळ करून मेढ वरती ओढूं लागला. तेव्हां अंधू मेढ वर सरकवून मनोहरला मदत करूं लागला. पावसामुळे ओली मेढ बुळबुळीत झाली होती. धरतांसुद्धां येत नव्हती ती. ती हातातून केव्हा निसटेल याचा नेम नव्हता. वाडा कर्र कर्र करून डुलतच होता. त्याचीं पाखी प्रत्येक क्षणाला खालीं कोसळतील असा संभव होता; आणि आता तर आढ्यावर मनोहर आणि मेढ यांचें वजन वाढले. शिवाय मेढ ओढल्यामुळे वाड्याला हिसके बसत होते ते निराळेच. ही गंमत पाहण्याकरितां सगळा गांव जमा झाला. समना गमना पण आला. हा विक्रम करताना उघड्याबंब मनोहरचें सुंदर आणि रेखीव शरीर सगळ्यांचें लक्ष ओढून घेत होते. त्याचे स्नायु पूर्ण फुगले.

लोकाना कोडे पडले कीं, मनोहर या मेढीचें काय करणार ? आढ्याच्या भोंसक्यातून मेढ खालीं कोण सोडणार ? इतक्या अवकाशांत मनोहरनें मेढ आढ्यावर आपल्याजवळ ओढून घेतली व लेखणी उचलावी त्याप्रमाणे दोन्ही हातांनीं तिला उचलून आढ्याच्या भोसक्यावर आकाशात नीट उभी केली व खालीं दारांत सोडली. त्या वेळीं त्याच्या स्नायूंचा जी हालचाल झाली ती पाहण्याजोगी होती. क्षणभर भीम पारव्यावर उतरला आहे असा भास झाला. खालचे लोक आश्चर्यानें थक्क झाले. केसूतात्या व विनोबा घरात पळाले. इष्ट बाप्पाजी, राजसबाई व मनोरमा अभिमानाने प्रफुल्लित झाल्या. अंधूनें लोकांकडे तिरस्कारानें पाहून दंडाच्या बेडक्या फुगवल्या व तो वाड्यांत धावला. मग पुष्कळ स्वयंसेवक वाड्यात जाण्यास तयार झाले. त्या सर्वांनीं तो मेढ आढयाखालीं दरांत नीट बसवली व दगडगोटे घालून खचली. याप्रमाणें वाड्यानें सगळें वजन मेढीवर आले व वाडा हलण्याचा थांबला. मनोहर वाड्याखालीं उडी

मारण्याकरता जागा पाहू लागला तो त्याला आश्चर्याचा धक्का बसला. परसातल्या आंब्याखालीं लाडी उभी होती व तिथून प्रेमाने ती त्याच्याकडे पाहत होती.

गर्दी ओसरल्यावर मनोहर सर्वांचा डोळा चुकवून परड्यांतील आंब्याखालीं गेला. ती जागा एकाताची होती. त्याला पाहून सुकलेली लाडी रागेजली.

" लाडे, तूं केव्हा आलीस ? " मनोहरने विचारलें.

" आताच. तुम्ही वाड्यावर चढलात अन् मी आले. "

" कशी ? "

एक बहिरी पक्षी आपला चिमुकला पिसारा उभारून आंब्याच्या फांदीवर थुईथुई नाचत होता. त्याने मतसुराच्या रागदारीत गिरकीचा आलाप घेतला व डोळ्याचे पाते लवते न लवते तो भुर्रदिशीं हवेंत फिरकीचे रंगण मारले व तो पुन्हा आपल्या जागेवर येऊन नाच करीत आलाप घेत डौलाने नाचूं लागला. लाडी त्याच्याकडे पाहून हसली.

" अशी आलीस हो ? "

" हो. अश्शी आलें; पंख लावून आले; रानातून गात आले. "

" सासरच्या लोकानीं कांही नाही केलं ? "

" हे बघा. " लाडीने लुगड्याचा घोळ वर केला. तिच्या पोटऱ्यावर व माड्यावर डागलें होतें.

" लाडे, लाडे, कस तू हे सहन केलस ? "

धुद नजरेने लाडी मनोहरकड पाहू लागली. तिच्या डोळ्यात आलेले अश्रू परत फिरले. तिचा आवाज कठोर झाला.

" शंकराने हालाहल विष कंठात कस धारण केलं ? " लाडीनें धुंदींत प्रश्न विचारला.

मनोहरला पुराणाची फारशी माहिती नव्हती व सासरच्या मंडळीने लाडीवर उगवलेलें क्रौर्य पाहून तो इतका विव्हळ झाला होता कीं, लाडीच्या कोड्याचा विचार करण्याची त्याच्या अंगात ताकद उरली नव्हती.

" शंकराने चंद्रमा मस्तकीं धारण केला. मीं माझ्या हृदयात तुमचा मुखचंद्रमा धारण केला. " बेहोष लाडी बोलूं लागली.

" लाडे, झाल्या गोष्टी झाल्या. आता त्या विसर. "

" तुम्ही विसराल. मी कशी विसरेन? मीं माझी जिंदगी तुम्हांला वाहिली. तुमची सुभद्रा अन् मी एका शाळेत पाचवीपर्यंत शिकलो. फार झालं तर एखाद्या वर्षानं ती माझ्याहून लहान असेल. तुम्ही मला वागवलेत असे तिला कुणीं वागवले असते तर तुम्हाला चालले असते का? ही बघा माझ्या हातापायाची काय स्थिति झाली आहे ती ! "

लाडीचे हातापायावर दोराचे करकोचे उमटले होते.

" तुला बाधून ठेवल होत? "

" हो, मला सासरी नेल त्या दिवशीं मला गुराच्या डागण्यानीं डागलं. नतर माझे हातपाय बाधून रात्रीं मला गुरासारखे खाम्राला बाधून ठेवू लागले. शिवाय माझा एक पाय सासू आपल्या पायाला बाधून निजे. प्रत्येक दारावर कुऱ्हाड घेऊन माझे दीर पहारा करीत निजत. सगळ्या गावाची माझ्यावर पाळत राही. पाणोठ्यावर मला कासरा बांधून नेत. काम करतांना पण मी सुटी नसे. दिवसा काम संपल कीं, मला पुन्हा बाधून टेवीत. ही कशी नादत नाय ती आम्ही पाहतो म्हणून सगळ्या गावाने पण केला. सासरच्या लोकाना इकडची सर्व हकीकत कळली आहे. जाच करुन मला ठार मारण्याशिवाय त्यांचा दुसरा काहीं उद्देश नाहीं. "

" येवढ्या बदोबस्तातून तू निसटलीस कशी? "

" त्या डोगरावर माझा पाठीराखा आहे. त्याने मला सोडवल. "

" कोण देव?" मनोहरला वाटले लाडी संत सखूप्रमाणे देवभोळी झाली आहे.

" नाहीं, अकुशा. माझा तो भाऊ झाला. मला सासरच्या मंडळींनें नेलं ते त्याने दुर्बिणींतून पाहिलं. मला जाच होईल असा त्याला संशय आला. तो जासईला माझ्या मागोमाग समाचाराला आला व पाणोठ्यावर माझी वाट पाहत बसला. मला गुरासारखी बांधलेली त्यानें पाहिली. मग त्यानें मला खूण केली. जासईच्या कातोड्यांकडून त्याने माझी सगळी माहिती काढली, घर पाहून ठेवलं व एके रात्रीं सधि साधून तो व त्याचे साथीदार आढ्याला भोसके पाडून आमच्या घरांत उतरले व आम्ही भोसक्यातून पसार झालों. "

विचारकात मनोहरनें वर पाहिले. आंब्यांच्या झाडांवर पाडाला आलेले फळाचे घड तोरणाप्रमाणे लटकले होते या असल्या गाढ प्रेमाला, निष्पाप उन्मादाला काय म्हणावें तें मनोहरला समजेना. त्यानें लाडीचा उष्ण व निरोगी रक्ताने रसरसलेला भरीव पण कोमल हात आपल्या हातांत घेतला. लाडीचा रुसवा जाऊन तिची कळी खुलली. त्याने तिची हनुवटी वर केली. आशेनें विस्फारित झालेले डोळे मनोहरवर रोखून ती स्त्रीच्या कोमल भावनेने पाहू लागली.

मनोहरने आपल्या चित्ताचा संयम केला.

" लाडे, मनोरमा नाजुक आहे. तिला हें सहन होणार नाहीं."

" अन् मी रानवट, डोंगरी अन् राकट. असच ना ?"

" लाडे, मोठे बाबा, मोठी आई प्राण देतील. "

" अन् मी ?"

" तूं आणि मनोरमा दोघी मराल, सगळ्याचा सत्यनाश होईल ! "

" मग ही वाट का धरली ?"

" अविचार ! "

बहिरीची मादी त्याच्या शेजारीं येऊन बसली. त्याचे पलीकडे कुपणाचे फटींतून अन् आंब्यांच्या पालवींतून संध्याप्रकाश कडवसला.

" मनहरणा, मी तुझा वाडा झाडीन, राब भरीन, गुरं सांभाळीन; परतु मला जासईला पाठवूं नकोस. मी दुरून तुझी नेत्रभेट घेईन. तेवढ चकोरलेणं मला पुरे."

मनोहरनें लाडीचा हात सोडला, डोळे पुसले व तो घराकडे परत फिरला. लाडी आंब्याखालीं रड रड रडली. नरबहिरी भुर्रर्र करून उडून गेला.

---

# प्रकरण २७ वें

# गरीबांचा वाली

अंधार पडूं लागला. अद्याप लाडी आंब्याच्या झाडाखालीं बसून रडत होती.

" लाडे, का रडतेस ? " आंब्याच्या ढोलीमागून अंकुशाचा आवाज आला. लाडीने वळून पाहिलें. आडव्या फांदीखालून अंकुशा निघाला. त्याचे हातात साहेबाची बंदुक होती त्याचे मागोमाग भिवरी पण रान-कोंबडीप्रमाणें निघाली. भिवरीच्या हातात भाला होता. लाडी कांहीं न बोलता रडतच राहिली.

" बय, मीं तुला बहीण मानली. आता तुझं दु:ख तू भावाला सांग णार नाहींस का ? तुला दीपाजीन घरात घेतल नाहीं ? "

" मी अद्याप घरीं गेले नाहीं. "

" तुझं सासरचे लोक आल्यात ? "

" नाहीं. "

" चल, मी तुला तुझ्या बापुसाच्या घरीं पोंचवतो. "

" तो मला घरात घेणार नाहीं. "

" कसा नाहीं घेत तें पाहतों. आतां या अंकुशाशीं गाठ आहे. चल, चल माझ्याबरोबर. तुला दीपाजीन घेतल नाहीं घरात, मग तुला मी सासरहून आणल त्याचा काय उपयोग ? "

अंकुशा लाडीला दीपाजीच्या घरीं घेऊन गेला. अंकुशा व भिवरी भोकरीच्या झाडाखालीं उभे राहिले. लाडी आत गेली.

दीपाजीच्या घरीं शेजारच्या शेतकऱ्याचा व त्याच्या बायका-मुलांचा घोळका जमला होता. कारण छातींत कळ निघाल्यामुळे दीपाजी घाबरा झाला होता. आजारीपण, दारिद्य, भूक, हालअपेष्टा, मुंबईची सफर, लाडीमुळें झालेला अपमान यांनीं दीपाजी थकून गेला होता. लाडी त्या गर्दींतून घुसली.

" बाबा, बाबा, माझ्या बाबा ! मीं माझ्या बाबाला मारलं. " लाडी

दीपाजीच्या अंगावर पडली. तिनें मोठा गळा काढला. लाडीला पाहून दीपाजीनें डोळे पांढरे केले.

" सुंठीचं कुडं उगाळून घाला डोळ्यांत. वात झाला दीपाजीला. " एकजणानें सुचवलें.

" सुंठ कुठली घरात ? " बयची स्थिति केविलवाणी झाली.

शेजारीपाजारी घरोघर धांवले; पण त्या दरिद्री शेतकऱ्यांच्या गांवात कुणाच्या इथे सुंठीचे कुडें मिळालें नाहीं.

" बय, पैसा दे. मी मारवाड्याकडन आणतें. " लाडी बोलली.

" घरात ताबडा पैसा नाय. "

" माझं देजाच पैस इतक्यांत खलास झाल ! "

" पंचाईत कशाची झाली ? "

" जा जा, भाडू नका. बाप्पाजींकडून मात्रा आणा कुणीं. " दुसरा एक शेतकरी बोलला.

इतक्यांत दीपाजीने डोळे उघडले व तो क्षीण आवाजांत म्हणाला.

" माझे लाडूबाई ये, ये. अशी जवळ ये बाई. "

लाडी दीपाजीजवळ जाऊन बसली. त्यानें आपला अशक्त हात लाडीचे पाठीवरून फिरवला.

" बय, म्हाताऱ्याला येव्हढं दूध पाजा. " एका शेजाऱ्यानें तामली भरून गाईचें दूध आणून दिलें. गाय विकल्यापासून दीपाजीच्या घरात दुधाचा थेंब नव्हता. पोटात गाईचे दूध गेल्यानंतर दीपाजीच्या आवाजात जोर आला.

" लाडूकबाई, सासरच्या लोकांनीं तुला पोंचवली कीं तूं पळून आलीस ? " दीपाजीनें लाडीला प्रश्न केला.

" मी तशीच आलें. "

" अग आई ! आता मी काय करू ! लाडके, लाडे, माझे चिमणे, तूं आलीस तर आजच्या रातीला रहा, आन् उद्या सासरीं जा. "

" मी नाहीं जाणार. बाबा, जाचान मी मरेन. "

" असं नको करूस माझ्या पुते. माझ्याकडं पहा. माझे मरते दिवस झालेत. माझ्या तोंडाला काळ लावूं नकोस. "

" हा, हा. म्हातारा गैरवाजवी नाहीं बोलत. आज लहानाचा मोठा झाला या गावात. पण कुणाचा 'ब्र' म्हणून घेतला नाहीं त्यानें. तूं लग्नाच्या नवऱ्याची बायको. पचानीं तुला सासरीं घालवली. त्यांच्या हुकमाविरुद्ध तूं कशी आलीस? पंच म्हाताऱ्याला वाळींत टाकतील." जमलेल्या घोळक्यांतील एकजण बोलू लागला.

" कां म्हणून ? " बंदूक घेतलेला अकुशा झोंपडींत आला. तीक्ष्ण नजरेने टेहळ ठेवीत तो गरगरा सगळीकडे पाहत होता व कान टवकारून बाहेरची चाहूल ऐकत होता. भिवरी झोंपडींत आली नाहीं. पोलिसांचा इशारा देण्याकरिता ती बाहेरच उभी राहिली होती.

बाहेरच्या लोकांची तारातीर झाली. आतील लोक आत कोंडले गेले. नाहीं तर ते देखील पळून गेले असते. पळालेल्या लोकानी माळा गाठला.

का म्हणून पच वाळींत टाकतील ? त्यांच्या बापाच मी काय लागतो? लाडे, तुला भाजले ते डाग दाखीव तुझ्या बापुसाला. "

लाडीनें बापाला भाजल्याचे डाग दाखवले. बाहेरचे लोक पळाले होते ते देखील आता भीति जाऊन आत काय चालले आहे तें डोकाऊन पाहू लागले व आतील भाषण ऐकू लागले.

" लाडे, लाडे, माझ्या लाडक्या, तुझ्या निहार अंगावर मी पुटकळी येऊ दिली नाहीं, कीं लागल्याचा वण राहूं दिला नाहीं. का तर माझ्या बाईच अग किती गोरंपान, गुळगुळीत न् चकचकीत. अन् निर्दयानीं माझ्या गोजरीला डागलं कीं हो ! मीच मीच पापी चाडाळ. मीच माझ्या सुकुमारीला कसाबाच्या हातीं दिली. "

" एव्हढ्यान काय झालं. तिचे हातपाय पहा, गुरासारख बांधलं व्हतं तिला. लाडी पळून नाय आली. गरीब गाईची कानी मीं उडवली, आन् आगींतून मी तिला घेऊन आलों. दीपाजी, तू आता लेकीला साभाळ. पचांची काय माय व्याली आहे तुला वाळींत टाकण्याची ! या बंदुकीच्या दस्त्यानं त्यांची डोसकीं फोडीन. गोळ्या घालून त्याना ठार मारीन."

" येव्हढी लहानाची मोठी केली ती कशाला? टाकून द्यायला ? " दीपाजी शोक करू लागला. " लाडी लहान होती तवा लाडीच्या पायांत कुसुळ बोचलं कीं ती मला वरडायची अन् मग मी धावत जाऊन

तिचं कुसुळ काढायाचा. मी गरीब, पन पांखरं तोंडात चारा आणतात पिलाना तसा चारा आणून घातला तिला. आन् माझे तान्हे, तुला हा वनवास कसा आला ! या बाप्पाजीनं माझी राजपाटी घेतली तरी माझ्या डोळ्यात पाणी आलं नाय; पन त्याच्या पोरान मातुर माझा सत्यानाश केला. महान् महान् पातकी मी पूर्वजन्मींचा. देवा ! आता या दुनियेत तूच माझा वाली ! ''

'' या दुनियेत गरीबाचा कुनी वाली नाय. '' एक शेतकरी बोलला.

'' मी हाय. मी अंकुशा, वनचा राजा. कुनाच्या बाला नाय भिगार. मी जिवत हाय तोपोतर मी हाय गरीबाचा वाली. ध्यानामदी ठेवा. मनु दादा लाडीला कसा नाय वागवीत ते मी बघतों. ''

जमलेल्या लोकांना गुरकावीत व त्याच्यावर डोळे फिरवीत अकुशा घाईने दीपाजीच्या झोपडीच्या बाहेर पडला. त्याला सुभानरावाची डर होती.

मोकरीच्या झाडाखालीं अधार हालला. भिवरी पुढ आली.

'' या बोचक्यात काय हाय ? '' अकुशानें भिवरीच्या कारवोटीचे बोचके चापसले. ते ओले होतें.

'' कोबड्या ! '' भिवरीने हर्षाने उत्तर केलें.

'' वलं फडकं टाकून पकडल्यास ? कुठं चोरल्यास ? '' कोबड्या ओरडू नयेत म्हणून भिवरीने ओलें फडके टाकून दोन कोबड्या पकडल्या होत्या.

'' तुला काय करायच ? त्या व्हळींत आगटी करू अन् भाजून खाऊ. ''

मला घर दाखिव आन् तिथं कोबड्या सोडून दे. आजपासून गरीबाच्या वस्तूला हात नाय लावायचा. मी गरीबाचा वाली झालो हाय. आता फकस्त शिरिमताचे पोटले फोडायाचे, कोथळे कापायाचे. ''

'' तुला काय व्हत ? मी तीन दिवस उपाशी हाय आन् भटकत हाय तुझ्या माग गर्द्धारशी रानावनातून. मी नाय माझी शिकार सोडणार ! ''

'' बंदुकीन डोसक फोडीन, मला घर दावल नाहीस तर ! '' अंकुशाने दम दिला. तेव्हा भिवरीन त्याला शेतकऱ्याची झोपडी दाखवली. अकुशाने कुडाचे दार किलकिले करून त्या कोबड्या झोपडींत सोडल्या व भिवरीच्या हाताला स्पर्श करून तिला चलण्यास खूण केली.

'' कुठं ? गावात ? '' भिवरीनें विचारलें.

" हो. " अंकुशानें उत्तर केले.

" तुला भ्या नाय? "

" नाय. रातचा या खलाटीचा मी राजा हाय. मी वनांतून अन् खलाटींतून हिंडणार. मला कोन आडवील? "

मग तीं दोघेजण बाप्पाजींच्या वाड्यात स्वयंपाकघराजवळ गेलीं. मनोरमा मनोहरला वाढीत होती.

मनोहरचें जेवण झाल्यावर तिनें अधूचे जेवण वाढून दिले व स्वतःचे पान वाढून घेतले. बाप्पाजींना व मोठ्या आईना उपास होता. आतां फक्त ती व अंधू येवढींच जेवावयाचीं राहिलीं होतीं. अकुशा व भिवरी तिच्या हालचाली निरीक्षण करू लागलीं. त्या हालचालींत कोणत्याहि प्रकारची आत्यंतिक उत्कटता नव्हती. देवघरांतील समयांप्रमाणें तिचा प्रकाश पडला होता. तिचें सौंदर्य तेजस्वी होते. अंकुशानें भिवरीला चिमटा घेतला. भिवरीनें त्याला चापट मारली.

" वहिनीबाय." मनोरमा जेवण्यास बसणार तो स्वयपाकघराच्या दारांतून अकुशानें हाक मारली.

" काय रे अंधू ? तुला आणखी आमटी पाहिजे? "

" नाहीं वहिनीबाय. मी अंकुशा हाय."

" अंकुशा ? तो फरारी कातकरी ? तुला काय पाहिजे ?"

" वहिनीबाय, मी तीन दिवसाचा उपाशी आहे.

" थांब जरा." मनोरमेनें एक पत्रावळ घेतली व त्यांत आपल्या पानांतील सर्व जिन्नस घातले. नंतर तपेल्यांतील सर्व भात उकरून वाढला; त्यावर टोपांतील आमटी ओतली; भाजीचे पातेलें रिकामें केलें; कपाटांतील भाकरी-पोळ्या काढल्या; डब्यांतले दोन लाडू घातले व ते सर्व त्या पत्रावळींत वाढले अन् ती पत्रावळ अकुशाच्या हवालीं केली.

" वहिनीबाय, तुम्हीं आपल्याला कायबी ठेवल नाय? " अंकुशाने विचारलें.

" माझं घर भरलं आहे ! मी कांहीं तरी खाईन. पण बाबा, तूं रानांत अन्नावांचून हिंडतोस. तुला कुठून खायला मिळणार? तुला हें दोन तीन दिवस पुरेल !"

"मला अन्न देणं गुन्हा हाय."

"असूं दे. विचारणाला मी त्याचा जबाब देईन! कुणी पाहण्याच्या आत तू इथून निघून जा."

अकुशा तेथून निघाला तो भिवरी बसली होती तेथें आला.

"हे घे. तूं खा आणि राहील तें माझ्या कातोड्यांना दे."

"तुला नको?"

"नको! माझं पोट भरलं."

"तूं तर तीन दिवसांचा उपाशी हायस! आन् खाल्लंस कधी?"

"वहिनीबाईला पाहून माझं पोट भरलं. मला वहिनीबायला जवळून बघायची होती. लगिनघाईत ओझरती दिसली होती ती."

"मग बघितलीस?"

"बघितली. माझे नेत्र दिपले!" अंकुशा उटला. "आन् मन तरी काय गंगाजळावाणी निर्मळ! पुढ्यातलं वाढलेलं ताट दिलं मला तिनं! भिवरे, तुला खरं सांगतों कीं, दीपाजीच्या घरीं मनुदादा न् बाप्पाजी याच्या करणीमुळें माझं माथं फिरलं; पन या मावलीला पाहून माझं डोकं थंड झालं. नाहीं तर आज मनुदादाला मी दावलं असतं. पन भिवरे, हा काय चिमित्कार हाय! हा बाप्पाजी सराईला समद्या कुळांना लुबाडतो, आन् अखेर समना मारवाड्याची भर करतो. जें भात राहिलं तें आगोटीला पुन्हां कुळांना खायला देतो, लोकाची भर करतो, आन् पुन्हां समनाकडे गळा गुतवतो. समना समद्यांच रगत पितो, समद्यांना लुबाडतो. चिक्कू मारवाडी मर मर कष्ट करतो, कवडी कवडी जमवतो, वह्या लिहितो, आन् आपून काय बी खात नाय. ह्या लोकाना नाय चालत दारू, नाय करीत हे शिकार. नाय कधीं मासं मारायला जायचं. नाय कधीं रानात हिंडायचं. यांना गंमत तरी कशांत वाटते? यांचा जन्म तरी कशाकरितां हाय? हें कोडं तरी काय हाय?"

"तें काय बी मला समजत नाय. मी हाय कातकरीण, अंकुशाची बायको! तूं मला इचार भेकर कसं ओरडतं, चितळाचा माग कसा असतो, भुईफोड कुठं गावतात आन् कोनच्या झाडाला जांभळं, करदं जास्त

येतात तीं ! मातर बाप्पाजी चागला हाय. हा मारवाडी लबाड हाय. माझ्या रतिबाच्या दिडक्या बुडवल्या यान. ''

'' आन् भिवरे, मला दुसरं बी कोडं हाय ! मनुदादा इतका चागला हाय मग त्यानं लाडीला फसवलं कसं ? किती दुःख झालंय लाडीला ? समज, मनुदादासारखं मी तुला फसवलं असतं तर तू काय केलं असतंस?''

'' मी ? पायतणानं मारलं असतं तुला ! ''

अंकुशा खूष होऊन हसूं लागला.

'' भिवरे, चल आपण जाऊ. ''

'' कुठं ? ''

'' मारवाड्याकड. ''

'' कशाला ? ''

'' तुला डोहळे पडत होते तेव्हा तुला काय बी दिला नाय; तुझं कोड पुरवलं नाय. आता मारवाड्याकड बेदाणा, बदाम आन् खारका पोत्यातून आल्या आहेत; तुला पाहिजे तितकी देईन. चल, चिंभोरासारखी तुरुतुरु माझ्यामागं. भिवरे, एक दिवस समनाच मी काम काढणार हाय. बाप्पाजीला त्यान लई छळलय. त्याला काय अधिकार हाय छळायला ? ''

मग तीं दोघेजण मारवाड्याकड गेलीं. तेथें केसूतात्या दुकानाच्या गादीवर समनाबरोबर खलबत करीत होते व खालच्या बाजूला तानक्या व तुकाराम बसले होते. अकुशाने गडबड सुरूं केल्यापासून समनाने तानक्याला रखवालीला ठेवले होते. अकुशा, भिवरी अडून ऐकूं लागली.

'' हे बघ केसुबा, तुला राजपाटी पाहिजे तर तू माझं गहाणखत बेचन घे. मी काल जमीन गहाण घेतली अन् आज कोर्टात जाऊ ? मला यात काय फायदा ? '' समना बोलू लागला.

'' पण गहाणखत बेचन घेऊन मला कस कोर्टात जाता येईल ! आम्ही मोठ्या घराचे शरमिंदे आहोंत ना ? '' केसूतात्यानीं समनाला आपली अडचण दाखवली.

'' मग सोडून दे नाद राजपाटीचा. नाहीं तरी कोर्टाच्या लिलावात तुला बोलावें लागेल ना पुढं ! त्या वेळी काय करशील ? ''

'' तो मी दुसऱ्याच्या नावावर घेईन. ''

" पण इतकी घाई कशाला ?"

" आतां बाप्पाजी नडींत आहे. पुढं तो गहाण सोडवील. आज ना उद्यां मनोहर बी. ए. होणार. मग त्याला नोकरी लागेल. "

" पण यांत माझा फायदा काय?"

" मी तुला कोर्टाचा खर्च देतो, आणि व्याजाच्या नुकसानीबद्दल हजार रुपये देतो. पण बाप्पाजींचा नकशा उतरूं दे. भारी गर्व करतो राजपाटीचा. सारंगखिंड ध्यानांत ठेव. "

अंकुशानें भिवरीला एक मोठा चिमटा घेतला तरी भिवरी ओरडली नाहीं.

" आन् तुम्ही पण लगिनाचा कसूर काढा तात्या, सोडू नका. त्याच्या लेकाने माझा गुन्हा केला आहे. " तुकारामनं तात्यांना प्रोत्साहन दिलें.

" अंकुशा पण त्याच्या सोरामुळे शेफारला आहे. माझी भिवरी अकुशाने उपटली. " तानक्यानें आपला अपमान सागितला.

समनाच्या लक्षात सारगखिड पक्की होती; पण केसूतात्याला देखील चागलें पाहून ठेवले होते समनानें.

" हे बघ केसूबा, पाच हजार माझें मुद्दल. सहाशें रुपये दरसाल व्याज होतें. बारा वर्षांत बहात्तरशें रुपये खातों मी. "

" तें खरं, पण राजपाटीची किंमत होईल आठ हजार रुपये. मी तेव्हढे तुला देतो. तूं लिलाव आपल्या नावावर घे. सध्या हे घे कोर्टाच्या खर्चाचे पैसे. "

केसूतात्यांनीं पांचशें रुपये समनाच्या हवालीं केले.

" किती दिवसांत दावा दाखल करतोस ? "

" ती तर मोठी पंचाईत आहे. अंकुशा मारवाड्यांचीं नाकं कापतो आहे सारंगाखिंडींत. त्यानं गाडी आडवली तर ? "

" तानक्याला बरोबर घ्या. " तुकारामनें सुचवले.

" मी एकटा गडी काय करणार ? त्याचेजवळ पांचसात कातुडी आहेत. सगळ्याचे जवळ हत्यार आहेत. "

" मी देतों तुला सात कातोड्यांची सोबत. आन् तुम्ही आवशीची

गाडी जुपूंच नका. मधरातला सोडा कीं, कोंबडा आरवायला तुम्ही सारंगखिंड गाठाल. मग नाय तुम्हाला भीति. वाटत दोन गेटं ठेवल्यात बंदोबस्ताला. ”

“ मग समनाशेट वेळ घालवू नका. उद्याची तयारी ठेवा. ”

समना फाशीं द्यायला काढावे त्याप्रमाणें तोंड करून बसला. परंतु फुकटांत दोनचार महिन्याचे आंत तीन हजार रुपये खायला मिळणार ही आशा त्याला चैन पडू देत नव्हती.

“ त्याचा विचार उद्या करूं. ” समना बोलला.

केसूतात्या उठले. त्याचे मागोमाग तुकाराम पण उठला.

“ तानक्या, तेव्हढा कंदील दाखव घरापर्यंत. किडीकाटक फार निघतात हल्ली. ” तात्या अंकुशामुळे एकटे जायला भीत होते.

तुकारामाची पण तीच स्थिति होती. अंकुशाने त्याला गोळी घातल्या-पासून त्याने रान सोडलें. हल्लीं तो फॉरेस्ट चौकी सोडून गावात येऊन राहिला होता.

तात्या वगैरे समनाच्या घराबाहेर पडल्यानतर भिवरी समनाच्या दुकानात शिरली.

“ समनाशेट, माझं पैसे देऊन टाक तेव्हढ. ”

“ तूं कोण? हा! ती पिंपराची पान आणीत होती माझ्या गाईला तीच ना कातकरीण? ”

“ हॉ, तीच. ”

“ तू आता कसाला आलीस? आम्हीं समदा जमाखर्च लिहून टाकला आहे. ”

“ शेटजी, गाय उठवणीला आली होती ती सुधारली, म्हणून आता पैशाकरिता खळ करतोस? मी भिवरी हाय नावाची, अंकुशाची बायको! ”

“ ऑ! तू कधीं झालीस त्याची बायको? ” समना घाबरून ओरडला.

“ तुझे पैसे घेऊन जा. अन् तुझ्या नवऱ्याला साग तुझा आमचा भाडण नाय. तुला दोन आणे चार आणे लागले तर घेऊन जात जा कर्जाऊ. ”

“ तू बाप्पाजींचा खोटा जमाखर्च लिहिला तो मिटवून टाक, अन्

राजपाटीचा दावा लावू नकोस. नाय तर मी तुझं नाक कापीन, असा माझ्या नवऱ्याचा तुला निरोप हाय. तुझ्या पिंपराच्ये पानाचे पैसे मी एक दिवस वसुल करीन. " भिवरी दुकानांतून उडी मारून निघून गेली. अंकुशाचे डोके ऐकलेल्या संभाषणाने गरगरूं लागलें. भिवरीचे डोहळे पुरवण्याचे देखील तो विसरला. तो भिवरीबरोबर निघाला.

" तो मारवाडी कसलीं पान म्हणत होता ! " लांब गेल्यावर अंकुशाने भिवरीला विचारलें.

" पिंपराचीं. "

" म्हंजी ? "

" पिंपळाचीं. मारवाड्याना ' ळ ' म्हणता येत नाहीं. "

"पिंपराचीं पानं ! पिंपराचीं पानं ! ! " अंकुशा पोट धरून हंसूं लागला.

---

## प्रकरण २८ वें

## पिंपळाचें पान

समनानें केसूतात्याचे पाचशे रुपये घेतले, पण सारगखिंडींतून तालुक्याच्या गावाला जाऊन कोर्टांत दावा दाखल करण्याची त्याची हिंमत होईना. भिवरीनें त्याला दम दिला होता कीं, त्यानें बाप्पाजींचा हिशेब मिटवला नाहीं तर अंकुशा त्याचं नाक कापणार आहे. भीतीनें तो दुकानात तसाच मुरी मारून बसे. दरम्यान अंकुशाच्या पुंडाव्याच्या रोज रोज नव्या नव्या व जास्त भयंकर बातम्या येऊ लागल्या. अंकुशानें दोन तीन गारवाड्याना सारंगखिंडींत लुटल्याची बातमी आली. अंकुशानें सावकार, गुजरमारवाडी याच्यावर शस्त्र उपसलें होते. समनाचा जीव खालींवर होऊ लागला. तात्यानीं त्याला दावा दाखल करण्याचा लकडा सुरू केला, तेव्हा समना म्हणाला,

" केसूबा, हे तुझे पैसे घेऊन जा. तुझा काय भरवसा कीं, तू बाकीचे पैसे देशील म्हणून. पाचशे रुपयाकरितां मी माझं नाक घालवू ? "

" तुला किती पैसे पाहिजेत बोल. " केसूतात्याचे डोके बाप्पाजींमुळे कमालीचें फिरले होते. ते रागाने बोलले. लेकाला सागून आलेली नवरी बाप्पाजींच्या कारस्थानें उपटली हे शल्य त्याना सारखें बोचत होतें. ते वाटेल ते करायला तयार होते; वाटेल तेवढा पैसा खर्चण्यास तयार होते.

" मी पाच हजार रुपये आगाऊ घेईन. "

" तूं पावती लिहून ठेव. मी पैशाची तयारी करतो. "

तात्यानीं कबूल केल्याप्रमाणें समनाला पाच हजार रुपये आणून दिले. मग मात्र त्याचा जीव चुळबुळ करूं लागला. तेव्हा त्यानें तालुक्याच्या गावी जाण्याचे ठरविलें.

" पण जायचें कसे ? सारगखिंडींत तो यम बसला आहे ना ! " समनाची भीति कायमच होती.

" समना, भिऊन आपण काहीं आपले व्यवहार बद ठेवीत नाहीं. आपण सुभानरावचा सल्ला घेऊ. " तात्यानीं सुचवलें.

संध्याकाळीं ते सुभानरावाकडे गेले व त्यानी सुभानरावला अकुशाची प्रतिज्ञा सागितली.

" फौजदारसाहेब, अकुशा माझ नाक कापणार आहे. मीं बाप्पाजीला पैसे दिले हा काय माझा गुन्हा आहे?" समना बोलू लागला.

" वः समना शेट, ही तर सोन्याची सधी आली आहे. तुमची गाडी केव्हां निघणार ?"

" तुम्ही सागाल त्या वेळेला काढू. पण दिवसा बैल घाट चढत नाहींत."

" ठीक. आम्हाला देखील रात्रीची वेळच सोयीची होईल. कारण दिवसा आपला बेत उघडकीला येईल अन् अकुशा फसायचा नाही. तुम्ही उद्या अवशीची गाडी सोडा. गाडींत मी मारवाडी पागोट बाधून तुझा वेष घेऊन बसतो. मी माझ्याजवळ चार पोलीस छपवून ठेवीन आणि बाकीचे घाटात ठिकठिकाणीं बसवीन. तू आज गावात पुकार कर कीं, आज तू निघणार म्हणून. तुझा तानक्या आणि दुसरे दोन कातोडी माझ्या गाडीबरोबर चालतील. म्हणजे अकुशाला वाटेल तुझीच गाडी चालली आहे. तू मधल्या वाटेन सारगखिंडीचा माथा गाठ, म्हणजे तू निर्धास्त जाशील. वाटल्यास दोन कातोडी सोबत घे. घाटात अंकुशा गाडी लुटायला आला कीं आम्ही पाहून घेऊ."

" साहेब, दोन पोलीस माझ्या रखवालीला द्या ना!" समना गयावया करून बोलला.

" छट्, इतके कुठं आहेत पोलीस माझ्याजवळ बदोबस्ताला ?"

" मीं दोन पोलीस कमी केले कीं माझा घाटातील डाव फसेल. उद्या अवशीला तूं घाटाचे तोंडाजवळ गाडी घेऊन ये. तेथे तू खालीं उतरून मधल्या वाटेने जायचेंस व आम्ही तेथून तुझी गाडी ताब्यात घेऊ."

" आन् अंकुशा अलिकड पायरस्त्याने जाणाऱ्या गरीब लोकाच्या वाटेला जात नाहीं. फक्त तो हमरस्त्याच्या गाड्या लुटतो व श्रीमंत लोकाचे-वर दरोडे घालतो. तो गरीबांचा वाली झाला आहे." केसूतात्यानीं समनाला धीराची गोष्ट सागितली.

दुसरे दिवशीं समनानें एक मारवाडी पागोटे व बाराबंदी सुभानरावाच्या-कडे गुपचिप पाठविली व एका पोत्यात दुकानातील दागदागिना, जड-

जोखीम, सोने-नाणे, रोकड गल्ला व नोटाचीं पुडकीं बांधलीं. याप्रमाणें तो तालुक्याच्या गावीं जाण्यास सज्ज झाला. तालुक्याचे गावीं त्याचा सगा मोटा श्रीमत बेपारी होता. त्याचे दुकानावर मोठा बंदोबस्त असे. तेव्हां अकुशाच्या भयाने समनाने आपली मौल्यवान चीजवस्त त्या दुकानांत सुरक्षित ठेवण्याकरता बरोबर घेतली.

नंतर गाडींत बसून तो घाटतोंडाजवळ आला. सुभानराव व त्याची पार्टी वडाच्या झाडाखालीं आधींच येऊन बसली होती. समनाने गाडी उभी केली व तो गाडींतून उतरला. त्याने सुभानरावला रामराम केला. सुभानराव आश्चर्यानें चकित झाले व त्यानीं आपला रिव्हॉल्व्हर सरसावला. त्याना आश्चर्य वाटले आपली बातमी फुटली कशी ? कारण मारवाड्या-एवजीं एक मावळी पागोटें घालून टिळेटोप केलेला शेतकरी त्यांच्या समोर उभा राहिला होता. त्याना वाटले हा अकुशा नाहीं ना ?

" कोण रे तूं ? " सुभानरावानीं दरडावून विचारलें.

" जय गोपाळ फौजदारसाहेब ! " समनाने फौजदारसाहेबाचा उलगडा केला.

" वः समना. मारवाडी डोक म्हणतात ते हे. माझ्यापेक्षाहि सोंग बेमालूम केलस. आता मधल्या वाटेनें तू एकटाच जा. तुला कोणी ओळखणार नाहीं. तुझ्या कातोड्याना तू रजा दे. पण तुझे कातोडी कुठं आहेत ? "

" त्याना मीं पुढल्या लवणात उभे रहाण्यास सांगितलें आहे. कारण त्याना सुद्धा आपला बेत कळायाला नको. " समना सुभानरावला थाप मारू लागला.

वास्तविक समनाचा कोणावरच विश्वास नव्हता. त्याला कुळंबी-शेत-कऱ्याचा वेष घेण्याची युक्ति सुचली तेव्हा त्यानें सोबतीला कातोडी घेण्याचा बेत फिरवला होता. त्यानें सुभानरावला सांगितले त्याप्रमाणे कातोडी वगैरे कोणी लवणात उभे नव्हते. घाटातील मधली वाट त्याच्या पायाखालची होती. फक्त त्याला डर होती एका गोष्टीची. वाटेच्या मध्य-भागावर एक पिंपळाचे झाड होते. त्यावर खवीस बसलेला असतो, असा रानसराईच्या लोकाचा समज होता. परंतु खविसाची समनानें तरतूद करून ठेवली होती.

हातात त्यानें पांढरीच्या लाकडाचा सोडगा ठेवला. शिवाय खारीक, खोबरे, बदाम, नारळ याचा खविसाकरिता उतारा घेतला. याप्रमाणें तो निश्चित होता. त्यानें आपलें पोते डोक्यावर उचलून ठेवले व तो सुभानरावचा निरोप घेऊन मधली वाट वेधू लागला. सुभानरावची गाडी खडखड खडखड करीत घाटानें जाऊ लागली. घाटाची चढण नीट होती व बैल उरात भरले होते म्हणून गाडी हळूहळू चालली.

समना पायरस्त्याच्या निम्यावर आला. तेथे ते प्रसिद्ध पिंपळाचें झाड रानच्या किर्र शांततेंत सळसळत होतें. समनाने लांबूनच खविसाची खडणी ठेवली व तो वाट चालू लागला.

" थाब तिथं. नाही तर मरशील. " एक कर्कश आवाज आला.

समना पिंपळाच्या पानापेक्षा जास्त कांपत जागच्या जागीं उभा राहिला.

हातांत बंदूक घेतलेली एक काळीकभिन्न आकृति पिपळाच्या छायेतून बाहेर आली. प्रथम समनाला वाटलें खवीस आला. पण खविसाच्या हातांत बंदुक दिसल्यावर त्यानें ओळखलें कीं, आपला यम आला आहे.

" कोण चाललाय् ? " अंकुशानें आवाज काढला. सुभानराव ज्या घरात उतरला होता तेथें माचाखालीं भात पाखडण्यास भिवरी गेली होती. तिनें समनाचा बेत ऐकला होता व अंकुशाला बातमी दिली होती.

" मी शेतकरी आहे बाबा. " समनाने उत्तर दिले.

" कुठं चाललास ? "

" वेहरच्या जत्रेला. "

" जरा इकडं तोंड कर पाहूं ! " अंकुशा समनाकडे बारीक नजरेनें पाहू लागला; परतु त्याला समनाचें वेषांतर ओळखूं आले नाहीं.

" तुला कुणी मारवाडी भेटला ! रस्त्यात दमून बसला असंल बघ. "

समनाच्या जिवात जीव आला. कारण त्याला कळून चुकले कीं, अकुशानें त्याचें वेषांतर ओळखलें नाहीं. परंतु समना बुचकळ्यांत पडला कीं, अंकुशाला उत्तर काय द्यावें. ' मारवाडी भेटला ' म्हणून म्हटलें कीं, अंकुशा त्याची वाट पाहत बसेल व आपल्याला माथा गांठण्यास अवकाश मिळेल.

" मधल्या वाटेला बसलाय् थकून. " समनाने विचार करून उत्तर दिलें

हा शेतकरी विचार कसला करीत आहे म्हणून अंकुशाला संशय आला.

" तुझ्या पोत्यांत काय आहे ? " अंकुशानें विचारले.

" काय नाय कांबरुणं. " इतक्यात अकुशाच्या डोक्यांत एक विचार आला व तो हंसला.

" समोर हें झाड कसलं दिसत हाय ? " अकुशाने दरडावून विचारलें. समना उत्तर देण्याचे टाळू लागला.

" मला दिसत नाहीं. "

" चल त्या झाडाखाली. "

अंकुशानें समनाला पिपळाचे झाडाखालीं नेलें. तरी समना ते झाड कसलें आहे ते सागेना.

" मला नाय ओळखत. " समना झाडाचें नाव सागेना.

" खोट बोलतोस. कुळब्याला हे झाड ओळखत नाहीं ? यात गोम हाय. बोल, नाय तर गोळी घालतों. " अकुशाने बदुकीचा घोडा उघडला.

" नाहीं नाहीं. सागतो, मला मारू नकोस "

" मग कसल हाय झाड हे ? "

" पिंपराच. "

" पिपराचं ! पिपराच ! माझे बये ! " अंकुशा हसू लागला. पण लगेच त्याने हसें थांबवलें.

" समन्या, मला फसवतोस. उतर ते पोत खालीं. पोत्यांत काय हाय ? सांग. "

" माझ काहीं नाहीं. केसूतात्याचे पैसे आहेत. अन् गहाणवट दागिने आहेत "

" हें कुठं घेऊन चाललास ? "

" माझ्या सग्याकड ठेवायला. इकड जरा चोरट्याचा बोभाट आहे. "

" चल. हें सगळं माझ्याजवळ ठेव. कुणी नाय चोरणार तुझा माल माझ्याजवळून. "

" यात बाप्पाजींची नथ आहे. तू बाप्पाजींची चोरी करीत नाहींस. "

" काहीं हरकत नाहीं. हे सगळं देतोस का मार पाहिजे ? "

" हॉ, घे हें सगळं, पण नाक कापूं नकोस. "

अंकुशानें समनाचे नाकाची बोंडी पकडली आणि कमरेचा कोयता काढून असा फटका मारला कीं नाक सफा उडाले. समना विवळत खालीं बसला.

" बाप्पाजींच घर खाल्लस ! आतां नथ खातोस ! तुला काय वाटलं अकुशा चेष्टा करतो होय ! बघ, बाप्पाजीचा हिसाब बराबर झाला कीं नाय ? "

अंकुशाने शिटी मारली. त्याबरोबर दोन काळ्या सावल्या पुढें आल्या. त्याच्या डोक्यावर पोतें देऊन अंकुशा रानात पसार झाला.

" समन्या, तुझं नाकधन गेल. आता तू निर्धास्त जा. कोणी तुला आडवणार नाहीं." जाता जाता अकुशा ओरडला.

अकुशा गेल्यावर समना सारगखिंडीच्या माथ्यावर गेला. बऱ्याच वेळानें सुभानरावची गाडी आली. त्याला घाटात चिटपाखरूसुद्धां भेटले नाहीं.

" समना, तोंडावरून पदर कशाला बाधलास ? तुला घाटात येवढा गारठा वाटतो ?" सुभानरावने विचारले.

" साहेब, तुमच्या मसलतीपायीं माझ नाक गेल, धन गेल !" समनाने गळा काढला.

" अकुशानें तुला अधारात ओळखले ? " सुभानरावने आश्चर्याने विचारले.

" मला पिंपराच्या पानान फसवल."

मग समनाने सुभानरावला पिंपळाच्या पानाची हकीकत सांगितली. सुभानरावच्या मनात जोराने हसावे असें आले, पण त्याने आपले मन आवरलें.

त्याच रात्रीला अकुशा बाप्पाजीच्या घरी गेला व त्यानें त्याना उठवलें.

" बाप्पा, हे धन घ्या आन् समनाचे करज द्या, आपला गळा सोडवा." अकुशाने बाप्पाजींसमोर नोटांची पुडकी ठेवलीं व पोत्यातील दागिन्यांची रास ओतली.

" अंकुशा, दरवडा घातलास तू ? "

" नाय. मला हें पिंपराच्या पानान दिल."

" नाहीं, नाही. अंकुशा तूं घातपात करून कुठ तरी डाका मारला आहेस. तू हें विष उचल. एक क्षण देखील हे माझ्या घरात नको."

" बाप्पाजी, जन्मभर तू किती काळजी करणार पैशाची? तू समन्याच्या कर्जातून मुक्त हो. तूं आमच्यासारख्या गरीबांचा बाप होऊन आमचा प्रतिपाळ केलास. तू हें घे. हे मला कोण पचू देईल? पुन्हा अशी संधि येणार नाय."

" पोरा, तूं तुझ्या बापासारखाच आहेस. तुझी बाप्पाजीवर माया आहे म्हणून तू आलास. पण परक्याचे धन बाप्पा विष समजतो."

" बाप्पाजी, यात तुझी नथ आहे. तेव्हढी तरी घे."

" ती नथ मीं समनाला गहाण दिली आहे. मी त्याचे पैसे दिल्याशिवाय नथ कशी घेणार? "

" बघ बाप्पा, पस्तावशील." अकुशाने निर्वाणीचा दम दिला.

" नाहीं, नाहीं. आजवर असं झालं नाहीं. हीं हाड आणि कातडीं वडिलार्चीं आहेत. रक्त देखील माझ्या कष्टाचं आहे. मी कष्टाच्या जिंदगीवर जगलो. तीच मला प्रिय आहे. रात्रीं उशीवर डोकं ठेवल कीं बाप्पाला झोप लागली पाहिजे. कळिकाळाच्या भयाने देखील बाप्पाजीच काळीज अद्याप कापलं नाहीं, चल उचल हे इथून; आणि पुन्हा असली भानगड माझ्या इथ आणू नकोस, समजलास? पुन्हां माझ्या घरीं येऊं नकोस."

अकुशा पोते उचलून घराचे बाहेर पडला. आरसा असलेल्या पितळी डबींत तावड्या आलवानाच्या तुकड्यात मोठ्या आईची नथ गुंडाळलेली असे. अंकुशाने नथीची डबी काढून उघडली व नथ त्याने ताऱ्यांच्या उजेडात न्याहाळली. नथीसारखा दिसणारा सात्याचा नक्षत्रपुज धारईवर लोंबत होता. त्याकडे अकुशाने पाहिलें व नथ डबींत ठेवून ती डबी त्याने मनोहरच्या खोलींत फेंकली.

दुसरे दिवशीं मनोहरला ती डब्री सापडली. मनोहरनें डबी बाप्पाजीं-जवळ दिली. बाप्पाजींनीं नथ ओळखली व ती अंकुशाने आपणांस मिळावी म्हणून जाता जाता फेकली हें ताडले. बाप्पाजींनीं लगेच ती नथ सुभानरावकडे हजर केली व आधल्या रात्रीची हकीकत सागितली.

"माझ्या हयातींत असला मनुष्य मला आढळला नाहीं." सुभानराव बाप्पाजी गेल्यावर बोलले.

"अहो, तुमची भीति होती ना त्याना? नथीचा मारवाड्याकडे जमाखर्च झाला होता." केसूतात्याना बाप्पाजींचा गौरव सहन झाला नाहीं.

"मोती सुटे करून विकले असते तर? आणि नोटांचे कुठ नंबर टिपले होते? दुसऱ्या कोणाच्यहि तोंडाला पाणी सुटले असतें. पुढल्या परिणामाची कुणीं फिकीर केली नसती." सुभानरावानीं बाप्पाजींची बाजू घेतली.

समनाचे नाक कापल्या दिवसापासून अकुशाने मारवाड्यांचीं नाकें कापण्याचा सपाटा उडवला. त्यानें आपल्याजवळ पिंपळाचे पानाची एक फादी कायमची ठेवली. दरोड्यात पकडलेल्या लोकाना तो पिंपळाचे पान दाखवी व 'हें कशाचें आहे' म्हणून विचारी. या युक्तीने वेषांतर केलेला मारवाडी तो बरोबर शोधून काढी. कुणी 'ते पान पिंपराचें आहे' म्हटलें कीं, अकुशा त्याचे नाक तात्बडतोब उडवून टाकी.

---

# प्रकरण २९ वें

## पावसाळा

लाडी रानसईला येऊन राहिली तेव्हां बाप्पाजींचे मनाची पुन्हा चलबिचल झाली. त्यांनीं मनोहरला अभ्यासाकरिता पुण्यास पाठवले. मोठ्या नाइलाजाने तो पुण्यास गेला. लाडीच्या करुणमय हकीकतीमुळे त्याचे अंतःकरण द्रवून त्याला पुरा पश्चात्ताप झाला होता. यापुढे तिच्या हालअपेष्टास आपण कारणीभूत व्हावयाचे नाहीं, असा त्याने कृतनिश्चय केला.

लाडीला दीपाजीच्या नावाने थोडी जमीन घेऊन दिली म्हणजे त्या कुटुंबाचे हाल कमी होतील, असे त्याने मनाशीं ठरविले व आपला बेत त्याने मनोरमेला बोलून दाखवला. त्याकरिता मनोरमेजवळ त्याने तिच्या स्त्रीधनाची याचना केली. कारण त्याच्याजवळ स्वतःचा असा पैसा नव्हता व जमीनखरेदी बाप्पाजींना न कळत व्हावयास पाहिजे होती. मनोरमेने आपला दागिन्याचा डबा मनोहरपुढे ठेवला व 'जे जे माझे आहे ते सर्व तुमचे आहे' असे सागितले. परतु विकाऊ जमीन मिळाल्याशिवाय काहीं करणे शक्य नव्हते. सबब तो विचार तसाच राहिला.

त्याचप्रमाणें रूपवान्, शीलवान् अशा नाजुक मनोवृत्तीच्या मनोरमेलाहि यत्किंचित् दुखवावयाचे नाहीं, असा पण त्याने आपल्या मनाशीं संकल्प केला. त्या सकल्पाप्रमाणे त्याने अद्याप लाडीची भेट घेतली नव्हती. बाप्पाजींनीं त्याला पुण्यास जाण्याची आज्ञा केली, तेव्हा त्याचे सुखस्वप्न भग पावले; परतु अखेरीस बाप्पाजींचे म्हणणे बरोबर आहे असे त्याला वाटले. तो पावसाळ्याच्या तोडाला पुण्यास निघून गेला.

पहिला पाऊस झाला. त्यावरच शेतकऱ्यानीं पेरे केले. लोक पावसाकरिता चिंतातुर झाले. कसलेले कुळंबी मात्र खबीर राहिले. ते म्हणत, "पावसाने रोहटी रुजवली ती रोहटी तो मारणार नाहीं." त्या शेतकऱ्यांचें भविष्य खरें ठरलें व पाऊस जोरानें पडू लागला. आकाश काळेंभोर झालें व पावसाचें सात्रें बसलें.

ठायीं ठायीं हिरव्यागार चौकोनी दाढी गालिच्याप्रमाणें वर आल्या.

त्यातील भाताचें आवण पृथ्वीच्या पोटातून पाचूचीं किरणें बाहेर पडावींत असें शोभिवंत दिसूं लागले. जणूं हिरवे भाले हातांत पेलून हिरव्या शिलेदाराचे घनदाट सैन्यविभाग दुष्काळावर हल्ला करण्याकरितां परमेश्वराच्या आज्ञेची वाट पहात आहेत! सह्याद्रीवर त्याच्यापेक्षां प्रचंड असे ढग लोंबकळूं लागले. पाठीमागे उठलेल्या ढगामुळें काळा कडा कैक वेळां हिमालयासारखा उच्च दिसला. याप्रमाणे पश्चिम घाटातील पावसाचे चमत्कार सुरू झाले. पा·य·.·मन डोंगरमाथ्यापर्यंत हिरवा समुद्र पसरला. घराच्या, देवळाच्या भिंताडावरून वनस्पति उगवली. आठ महिने झोपलेली शेवाळ झाडाच्या शेंड्यावरूनदेखील जागी झाली. जिकडे पहाल तिकडे हिरवेगार! रानसईच्या आसपास असा एकहि रंग शिल्लक राहिला नाहीं, कीं तो डोळ्याना खुपला असता. या हिरवळींतून पाण्याचे पांढरे शुभ्र असंख्य प्रवाह पाऱ्याची खाण लागल्यासारखे वाहूं लागले. जणूं अनंत नागकुळें वासुकीच्या भेटीकरितां पाताळाकडे निघालीं आहेत. भैरव धबधबा प्रचंड जलघोष करूं लागला. भैरवासारखे आणखी किती तरी लहानमोठे धबधबे रानसईच्या डोंगरावरून जलतरंग वाजवीत होते. त्याची शोभा किती वर्णावी! असल्या नयनमनोहर देखाव्यात लावणीचें काम सुरू झालें. शेतकरी भूमितिशास्त्राबरहुकूम आखून घ्यावें अशा तऱ्हेनें भाताचे चूड लावीत होते. त्यातील काहीं भात उठून उभे राहिले.

मनोरमेने असले पावसाळी देखावे जन्मात पाहिले नव्हते. भाताची लागवड कशी करतात हे तर तिला बिलकुल माहीत नव्हतें. तिला ही गंमत पाहण्याची तीव्र इच्छा झाली. राजसबाईनी राजपाटीच्या लावणीच्या दिवशीं अधूला सांगितलें कीं, मनोरमेला शेतावर नेऊन लावणी कशी करतात ते दाखव. शिवाय अद्याप मनोरमेनें लाडी जवळून काळी दिसते का गोरी हे पण पाहिले नव्हतें. काळ्या कड्यावरून सात पायऱ्यानीं उतरताना तिने लाडीला लाबून पाहिलें होते तेवढेंच त्या दिवसापासून लाडी कधीं गावात हिंडली नाहीं किंवा वाड्यावर पण आली नाहीं. त्यामुळे लाडीलादेखील मनोरमेला पाहण्याची तीव्र उत्कंठा होती. त्या दिवशीं लाडी कामावर आहे ही बातमी अधूनें मनोरमेला दिली. मनोरमा न्याहारीच्या वक्ताला शेतावर जाऊन पोहोंचली.

राजपाटी अफाट तळ्याप्रमाणे तुडुंब भरली होती. त्यांत इरलीं घेऊन लावणीचें काम सुरू झाले होतें. दारव्यांत कातोडणी यंत्राप्रमाणे भरभर हात चालवून आवण उपटींत होत्या व त्याच्या मुठींत मातील येवढ्या लहान लहान पेंड्या ऊर्फ मूठ बांधीत होत्या. मूठ तयार झाले कीं, एकजण त्यांचीं मुळें धुऊन लावणीकरितां शेतांत ठिकठिकाणीं फेंकून देत होता. उलटा मूठ हातात ऐटीने धरून कामकरी इरल्याखालीं गप्पा मारीत मारीत लावणीचे काम गुण्यात करीत होते.

मनोरमा शेतावर आली तेव्हा तिला वांकलेल्या इरल्यांशिवाय काही दिसलें नाहीं. इतक्यांत 'वहिनीबाय आली' म्हणून कोणी तरी बोलले. पचवीस तीस इरल्यानीं तोंडे फिरवलीं व त्यात पुष्पविकासाप्रमाणे लाडीचा मुखडा हसतमुख असा तिला दिसला. तिचे हातात अर्धामूठ होता तो तसाच घेऊन व डोकीवरले इरले हाताच्या कोपरावर रोमन ढालीप्रमाणे वरचेवर पेलून ती राजपाटीचे पाणी कापीत एखाद्या हसीप्रमाणे मनोरमेच्या रोखाने आली. स्वच्छ पाण्याने भरलेल्या शेतोड्या आरशाच्या तुकड्या-प्रमाणें चमकत होत्या. त्यातून कडेचे हिरवे बाध आरशाच्या मखमाली चौकटींप्रमाणे प्रतिबिंबित झाले होते. त्यातून काळा कडा व इतर गिरि-शिखरे याच्या पडछाया तरंगत होत्या. बाधावर मनोरमा नगरदेवतेप्रमाणे छत्री घेऊन उभी होती. तिला रानसईची वनदेवी भेटण्याला आली. एकाच ठिकाणीं दोन कमलें फुललीं. त्याचेवर मेघमडळातून गाळून आलेला सूर्याचा निळा प्रकाश झोताप्रमाणे पडला. त्या दोघीजणी हिरव्या मख-मलीच्या गादीवर ठेवलेल्या दोन मोत्याप्रमाणे ढळाळल्या.

"वहिनीबाई, मी ओळखलं तुम्हीं का आलात शेतावर ते. सांगूं?" लाडीने आपले डोळे विस्फारून हसत हसत प्रश्न केला.

मनोरमेला हीच लाडी हे सांगण्याचे कारण नव्हते. तिने ते ओळखले होते. ती लाडीकडे दिङ्मूढ होऊन पाहू लागली. तिला लाडी गांधील-माशीप्रमाणे वाटली. कारण तिच्या रूपसौंदर्यामुळे मनोरमेला दशासारख्या वेदना झाल्या. तिनें असले सौंदर्य कधीं पाहिलें नव्हतें. उघड्या हवेत काम करून टवटवलेली लाडीची कांति गवतावर परिवर्तित झालेल्या प्रकाशानें रागेजली होती व ती नव्या नाण्याप्रमाणें चमकत होती. आपला पति या

असामान्य सौंदर्यावर उगीच भुलला नाहीं, हा मनोरमेच्या मनातील पहिला विचार होता. आपला पति रसिक आहे ही तिची खात्री झाली; परंतु लगेच तिच्या मनांत दुसरा विचार आला कीं, असल्या सौंदर्याची, असल्या गाढ प्रेमाची अशी दुर्दशा कां व्हावी? लाडीचें मनोहरवर प्रेम बसलें यांत तिचा कांहीं मोठा अपराध नव्हता. तिच्या मनांत लाडीबद्दल सहानुभूति उत्पन्न झाली; परतु लाडीपेक्षा आपण कमी रूपवान् आहोंत ही कल्पना तिला सहन होईना. आकुंचित डोळ्यानीं ती लाडीचे निर्दोष शरीर-सौष्ठव पाहू लागली. मनोरमेला लाडींत कुठेंहि न्यून दिसलें नाहीं. तिच्या पोटऱ्यावर भाजल्याचे डाग अजून दिसत होते. मनोरमेची त्या डागावर नजर जाण्याचे आत लाडीनें वर केलेल्या निऱ्याचा घोळ खाली सोडला व ठसक्यात मानेला हिसडा मारून डोईवरला पदर खालीं खाद्यावर आणला. मग ती आपले लाल चुटचुटीत ओठ वाकवून कुदकळ्यासारखी दतपाक्ति चमकवीत गोड आवाजात म्हणाली, "बघा, दिसतो का आम्ही तुमच्या-वाणी? आहे कांहीं नखरा आमच्याजवळ? वेणीफेणी, कपडा, पावडर?" आपल्या हाताच्या निघोट पोटऱ्या दाखवीत लाडीने आपले उन्नत वक्षः-स्थळ पुढे काढलें.

"खरच लाडे, तू सर्वांगसुंदर आहेस. लावण्य म्हणतात ते हे! पण लाडे, तू माझ्याकड येत का नाहीस?" मनांतील मत्सर न दाखवता मनोरमा बोलली.

"खरच मला बोलवता? येऊ मी तुमच्याकड? तुम्हीं बोलवलं तर येत जाईन." भाबड्या लाडीला आनंद झाला.

"मनापासून मी बोलवतें तुला. तुझ्या मनात काहीं किंतु असला तर काढून टाक. यात कोणाचाच अपराध नाहीं. पण खरच तू नाचतेस आणि खेळतेस चागली; आणि तुझा गळा म्हणतात अप्रतिम आहे! येत्या मंगळागौरीला सुभद्राताई येणार आहेत. येशील तू?"

"हो, येईन. रानांतून हाराभर कचोऱ्याचीं फुलं पण आणीन तुमच्या गौरीला."

भोळ्याभाबड्या त्या रानच्या पाखरानें तें आमत्रण ताबडतोब स्वीकारलें.

मनोरमा स्वभावानें दुष्ट नव्हती; पण स्त्रीधर्माला अनुसरून तिला लाडीची पूर्ण परीक्षा करावयाची होती; म्हणून तिने लाडीला आमंत्रण दिले.

नतर लाडी पुन्हा शेतात शिरली व तिने लावणीचें काम सुरू केलें. मनोरमा बाधावर उभी राहून ती गमत पाहू लागली.

लावणीचें काम जिवावरचे. त्यातून सईसलामत बाहेर पडले म्हणजे शेतकरी नशीब समजतो. लावणीस निघण्याचे आधीं शेतकरी पुण्यवान् लोकाचे आशीर्वाद घेऊन व त्याच्या पायां पडून मग लावणीकरिता रडत रडत घराबाहेर पडतात. तरी असले बिकट काम ते शेतकरी डोंगराच्या पावसाळी शोभेत गप्पागोष्टींच्या नादात आनदाने करीत होते. पाण्यात डुंबणाऱ्या भाताच्या चुडाच्या पाती समातर रेषेत चारहि बाजूंनीं शेताच्या मध्यभागाकडे येऊ लागल्या. तेथेच बाधावर मनोरमा उभी होती. लावणी करणारे लोक सारख्या अंतरावर चूड चिखलात रोवीत रोवीत पाठीमागे सरकत होते. लाडी कामाच्या नादात होती. तिला शेतात चारहि बाजूनीं आलेल्या पातींत कोंडण्याचे कामकऱ्यानी ठरवले. त्यानीं अशा चतुरचपळाईने लावणी आटपली कीं, शेताच्या मध्यभागीं आलेल्या पातींनीं लाडी वेढली गेली.

लाडी आज विशेष आनदात होती; कारण मनोरमेनें तिला खुल्या दिलाने वागवले होते. आपल्याच नादात ती गात गात लावणी करीत होती. भाताचा शेवटचा चूड लावून झाल्यावर ओणव्याने लावणी करणारी लाडी काम सपल्याच्या आनदाने उभी राहिली, तेव्हा तिला चौफेर कोंडून आडवणारे शेतकरी स्त्रीपुरुष तिच्याकडे पाहून हसू लागले. लाडीनें त्याचा डाव ओळखला व ती त्या कड्यांतून निसटण्याचा प्रयत्न करूं लागली; तेव्हा त्या धूर्त शेतकऱ्यानीं व त्याच्या बायकानीं एकमेकाना हातांनीं धरून साखळी बनवली.

"लाडे, आमी तुला नाय जाऊ देणार!" एका शेतकरणीनें लाडीला आडवलें. मनोरमेला असला ग्रामीण विनोद, असली गंमत नवीन होती. ती पुढें काय होतें ते उत्सुकतेनें पाहूं लागली.

"मग मी काय करू?" लाडीने हंसत हंसत विचारलें.

"नाव घे." लाडी लाजली.

" कुणाचं घेऊं ? " मनोरमेकडे हंसून पाहत लाडीने विचारले. त्या वेळीं लाडीला हर्षाच्या उकळ्या फुटत होत्या. परतु लाडीच्या मर्मभेदक विनोदाने मनोरमा खिन्न झाली व तेथून घरीं निघून गेली.

पहिल्या मंगळगौरीला सुभद्रा आली. उजडत लाडी कचोऱ्यांच्या फुलाचा हारा घेऊन मनोरमेकडे आली. भडक जाभळ्या–हिरव्या फुलाची शींग लाडीच्या डोक्यावर लहानशा फुलबागेप्रमाणे दिसली. लाडीला पाहून राजसबाईनीं कपाळाला आठ्या घातल्या

" कुणी ग तुला सागितल फुल आणायाला ? " राजसबाई लाडीच्या अगावर खेकसल्या.

" वहिनीबाईनी ! "

" हे ग बाई काय लक्षण ! काहींच्या बाहींच करते मनोरमा ! " लाडी गेल्यावर राजसबाई उद्गारल्या.

माझी पतिभक्ति, माझ अगाध प्रेम यानीं माझ्या पतीच्या हृदयात क्राति झाली नाहीं तर विवाहाच्या पावित्र्याचा काय उपयोग, असा पण मनोरमेने केला आहे हे कुठे राजसबाईना माहीत होते ! परतु मनोरमा श्रीमताची, पुन्हा सुस्वभावी, सुदर आणि मनोहरला मोहून टाकलेली; तेव्हा तिचे मन दुखेल म्हणून राजसबाई काहीं बोलल्या नाहींत.

दुपारीं मनोरमा-सुभद्रेजवळ माजघरातील झोपाळ्यावर बसून टास आवाजात लाडीनें गोड गोड गाणीं म्हटलीं. तिच्या पहाडी आवाजापुढें मनोरमा-सुभद्रेचे आवाज किनरीसारखे फिके पडले. लाडीला गाणीं तरी किती येत होतीं ! तिने गाण्यात सर्वांना हरवले. झोपाळ्याच्या काडकाड झेपा घेऊन उच्च आवाजात लाडी गाण्याचीं कडवी म्हणू लागली. गौळणी, शबरी, कालियाडोह, भिल्लीण अशीं तिचीं अनेक गाणीं झालीं. तिचें सगीत म्हणजे पावसाळ्यात फोफावत वाहणारी सर्प जशी यमुनाच ! ' नंद-गृहाच्या जवळ मुलींनो रथ दिसतो दुसरा ' म्हणून जेव्हा तिनें कठ फोडून अक्रूर सुरू केला तेव्हा ओटीवरच्या बाप्पाजींच्या डोळ्यांत अश्रू उभे राहिले व क्षणभर आपल्या मुलाचा नैतिक अधःपात करणारी मुलगी ती हीच हें ते विसरले; कारण त्यांचा आत्मा लाडीच्या प्रेममय संगीतांत

बुडाला होता. लाडी हे गाणें म्हणत आहे ह्या सवेदनेला त्यांच्या हृदयांत जागा नव्हती.

गार्णी सपल्यावर अंधूनें झोपाळा खालीं काढला व फुगड्या, झिम्मे वगैरे नाच सुरूं झाले.

" पैशाला लवंगा किती ? " लाडीनें विचारले.

" इस. " एका मुलीने उत्तर दिलें.

" इस बाई इस. दोडका किस " म्हणून लाडी बेहोष नाचू लागली. तिचें अंग क्षणभर ठरत नव्हते. तिचा स्नायू आणि स्नायू व त्यातील अणुरेणू नाचात सामील झाला. कपाळावर, हृदयावर, कमरेवर हात ठेवून ती घुमसुला घालू लागली. तिच्या नाचातील अगविक्षेपात मुसावलेलें लावण्य व उन्मादकारक यौवन भरून ओसडलें. तिला दम असा ठाऊक नव्हता. श्रमाने तिचा मुखचद्रमा घर्मबिंदूंनीं तारकाखचित रात्रीप्रमाणे डवरला, तरी तिने नाच सोडला नाहीं. मनोरमा आणि सुभद्रा लाडीकडे टकमक पाहत राहिल्या. एका दिवसात लाडीने मनोरमेचे हृदय जिकले. लाडी मनोरमेला पाठीराखिणीसारखी वाटू लागली.

सुभद्रेने मुलींच्याकरिता कॉफीचें आधण ठेवले. तेव्हा मनोरमेने लाडीला माडीवरच्या आपल्या खोलीत नेले. मनोरमेला माहेरीं सगीतमास्तर ठेवून गायन–वादन शिकवले होते. मनोरमेनें त्या कलेचे प्रदर्शन लाडीसमोर करण्याचें ठरवले व आपली बाजाची पेटी उघडून ' आनबान ' करण्यास तिनें सुरवात केली. तेव्हा लाडी भेदरलेल्या हरणीसारखी गप्प बसून राहिली. मग मनोरमेने पेटीच्या साथीवर तिला गायला सागितलें. लाडी गाऊ लागली. मनोरमा पेटी वाजवू लागली.

' तुम्ही आकाश मी भूमिका, तुम्हीं सागर मी द्वारका... '

लाडीच्या आवाजांत भावना उचबळत होती. तिचा करुण रसानें दाटलेला कठ भरून आला व ती ओक्साबोक्सीं रडू लागलीं. कारण हें गाणे ती मनोहरला उद्देशून म्हणत होती. मनोरमेनें तिचे दोन्ही हात आपल्या हातात घेतले व तिला उठवून खिडकीजवळ नेले. तिनें आपल्या शालूच्या पदराने तिचे अश्रू पुसले व ती म्हणाली, " लाडे, रडूं नकोस."

मनोरमेनें कपाट उघडून एक सुंदर शालू काढला व तो लाडीला

नेसवला, आपले अलकार तिला घातले व तिचा आधुनिक साजशृंगार केला. नतर कपाटातील आरशासमोर नेऊन तिने तिला तिचे रूप दाखवले. त्याच वेळी ती आपल्या प्रतिबिंबाकडे तुलनात्मक दृष्टीने पाहत होती. मग लाडीला खुर्चीत बसवून ती कॉफी आणण्याकरिता खालीं गेली.

इतक्यात खोलीचे दार उघडलें व कातडी हॅंडबॅग हातात घेऊन मनोहर आत शिरला. लाडीला तसल्या वेषभूषेत पाहून तो आश्चर्याने स्तंभित झाला.

"लाडे, तू इथ कशी? आणि तुला हा पोषाख कोणीं चढवला?" मनोनिग्रहाने लाडीपासून लाब अंतरावर राहून मनोहर उद्गारला. लाडी आज किती तरी जास्त सुदर दिसत होती. मनाने त्याने लाडीला बाहूपाशात केव्हाच धरले होते! त्याचा प्रेमसागर उसळला होता.

"मी." हसरी मनोरमा कॉफीचा ट्रे घेऊन मागोमाग उभी होती. मनोहर पुण्याहून आला हे तिनें खालींच पाहिलें होते.

"मनोरमे, तूं हे काय करतेस?" लाडी तेथून उठून गेल्यावर मनोहरने मनोरमेची निर्भर्त्सना केली.

"काहीं नाहीं. माझं मन खबीर आहे आणि माझा माझ्यावर विश्वास आहे."

"नाहीं. लहान मूल विस्तवाशीं खेळते तशी तू खेळत आहेस."

"ज्यात भीति आहे असें प्रेम मला नको आहे. मी आपली पत्नी आहें. माझें पद कोणी हिरावूं शकत नाहीं."

सुदर वेषभूषा केलेल्या लाडीचे अचानक दर्शन आणि लाबच्या प्रवासाच्या दगदगीनंतर गरम व सुवासिक कॉफीचें पान आणि हें सगळें समाधान मनोरमेमुळे. मनोहर प्रसन्न झाला. मनोहर मनोरमेच्या साहसानें थक्क झाला. तिच्या आत्मविश्वासाबद्दल त्याला अभिमान वाटला. त्याने पण आपला मनोविजय कसोटीला लावण्याचा निश्चय केला.

"हा कसला कोट घालायचा! हा कोट मुळींच शोभत नाहीं स्वत:ला."

मनोहरच्या कोटाची कॉलर उलटी करीत मनोरमा लडिवाळपणानें मनोहरचे केस उकलूं लागली.

"कोणचा कोट मला चागला दिसतो?"

मनोरमेनें मनोहरची हॅडबॅग उघडली व त्यांतून नेव्हीब्ल्यूच्या सर्जचा कोट काढला.

"हा! गोऱ्या माणसाला निळा कपडा खूप खुलतो."

तिने कोटाची घडी नाकाजवळ नेली. मग ती उद्गारली!

"अहाहा! काय सुंदर वास येतो याला. कसला सेंट लावला आहे?"

"सेंट्स नाहीत हे; कारवीचा सुगंध आहे!" सराईच्या आठवणी येऊन मनोहर प्रेमार्त झाला. काळ्या कड्यावर प्रणयाच्या बहरणात त्यानें हा कोट घातला होता. त्या वेळीं कारवटात त्या कोटाला चिकटलेले मधु-पराग अद्याप जिवंत होते. काळ्या कड्यावरून मुकुटने त्याचा कडेलोट केला, तेव्हा देखील हाच कोट त्याच्या अंगात होता. लाडीच्या आठवणींनीं तो विमनस्क झाला.

"कारवि? कारवि म्हणजे काय?" मनोहरच्या अंगात कोट चढवीत मनोरमेनें विचारलें.

"अधूच्या कुडाला कडब्यासारखीं ताट लावलीं आहेत ना? तीं कार-वीचीं आहेत. रानात यांचें भुरटे जंगल असते."

"सुंदर असतात याचीं फुलं? गुलाब, शेवतीसारखीं?"

"छे:! रानटी झाड ते. कारवी जशी बेढब तशींच तिचीं फुले ब्राऊन पेपरसारखीं खडबडीत असतात. तिला वास मात्र सुंदर येतो."

"केव्हा फुलते ही?"

"सराईला."

"मग पुढल्या सराईला मी खूप खूप फुले आणीन रानातून, आणि पेट्यातून, कपाटातन सगळीकड साठवून ठेवीन. बकुळीच्या फुलासारखं अप्पासाहेबाना पण त्याच पार्सल पाठवीन."

"पुढल्या सराईत कारवी फुलणार नाहीं. कारवी सात वर्षांनीं फुलते. कुणास माहीत सात वर्षांनीं ती फुलेल कीं नाहीं?" कोट काढीत काढीत मनोहर उदासपणानें बोलला.

"छे गडे! काढला का?"

"मनोरमे, मला हा कोट घालण्याला आग्रह करूं नकोस. कां म्हणून मला विचारूंहि नकोस."

मनोरमा करुणामय नजरेनें मनोहरकडे पाहत राहिली. तिला मनोहरच्या बोलण्याचा गूढार्थ कळेना. परंतु त्याला त्रास होईल म्हणून तिनें जास्त प्रश्न विचारले नाहींत. मनोहर खुटीवर कोट ठेवण्यास गेला तेव्हा लाडी मनोरमेची वेषभूषा उतरून आपल्या गरिबीचे लेणे घेऊन जड पावलांनीं पावसांतून चालली होती. संध्येचा गहिरा रग ढगाढगांवर पडला होता व कुपणांतून गुलबशीचीं फुले गोंडाळत होतीं. त्या बालेनें असा काय अपराध केला होता! मनोहर सकरुण झाला. त्याच्या वृत्ति प्रक्षुब्ध झाल्या. रानसईला दोनतीन दिवस राहण्याच्या इराद्याने आलेला मनोहर दुसरे दिवशीं पुण्यास पसार झाला.

श्रावणाच्या तापींत सराईच्या आठवणीने रानसईतील भात हिंवरें भरल्याप्रमाणे कापूं लागलें. ऊन्ह-पावसानें व वाऱ्याच्या सळसळण्यानें भाताचे चोथे फुगू लागले. रिकामे झालेले शेतकरी ढोल वाजवून नाचू लागले. दीपाजी व त्याचें कुटुंब मात्र शेतात टिंगून लावणी करीत होते. यंदा कोणी गावकरी त्याच्या मदतीला गेला नाहीं; कारण आजूबाजूच्या गावानीं दीपाजीला वाळींत टाकले होते.

———

# प्रकरण ३० वें

# भादवा काळ

मनोहर मगळागौरीचे दुसरेच दिवशीं पुण्यास निघून गेला. निघून गेला म्हणण्याऐवजीं बाप्पाजींनीं त्याला घालवले. लाडीला मनोरमेने घरीं बोलावले हे राजसबाईप्रमाणें बाप्पाजींना देखील आवडले नाहीं; परंतु ते आपल्या सुशील व लाडक्या सुनेला नाराज करण्यास तयार नव्हते. लाडी घरात असताना जेव्हा मनोहर आला तेव्हा त्याना तिचा मनस्वी राग आला; परतु बाप्पाजी न्यायी होते. लाडीच्या अपराधापेक्षा मनोहरचा अपराध फार मोठा आहे, तरी ते मनोहरला काहीं शासन करू शकत नाहींत, हें शल्य त्याच्या अतरमनाला बोचून राहिलें होतें. अब्रू गेली गरीब बिचाऱ्या दीपाजीची. तो कसा–तर सर्वस्वीं निराधार व आपल्यावर अवलंबून राहणारा ! नुकसान झालें निष्कपटी आणि अल्लड लाडीचे, ही गोष्ट बाप्पाजींच्या मनात पूर्ण होती व त्याच्या करारी स्वभावाला अनुसरून त्यानीं रूढि असती तर लाडीचें मनोहरशीं लग्न पण लावण्याला कमी केलें नसतें. परतु पुत्रप्रेमामुळे ते सज्ञान मनोहरपेक्षा अज्ञान लाडीला जास्त दोषी समजले. पुत्रप्रेमामुळें त्यानीं लाडीचा राग केला.

दीपाजीच्या पडित काळात दीपाजीला मदत करण्याचा त्यांनीं पुष्कळ वेळा प्रयत्न केला; पण मानी दीपाजीने त्याची भीक कधीं घेतली नाहीं. लाडी व बय बाप्पाजींच्या मजुरीवर जात, पण यात ते कामाचा दाम घेत. भीक नव्हे. यात त्यांची मानहानि काहीं नव्हती. बाप्पाजींनीं त्याला बैल देऊ केला, पण त्याने घेतला नाहीं. एरव्हीं त्याला बाप्पाजींची मदत घेण्यात कमीपणा वाटला नसता; परतु लाडीच्या भानगडीमुळें बाप्पाजींच्या मदतीचा निराळा अर्थ होत होता.

आगोटीला दीपाजीनें नवे नागर भरले. टोणग्याच्या जोडीला त्याने बैल विकत घेतला. पण बैलाला टोणगा रेटूं लागला; तेव्हा टोणगा विकून त्याच्या बदलींत त्यानें दुसरा बैल घेतला. परंतु टोणग्यानें थकवलेला जुना बैल ताज्या दमाच्या नव्या बैलाच्या बरोबरीनें चालेना; तेव्हा त्यानें जुना

बैलहि विकला व वाफेने दुसरा बैल आणला व लावणीच्या चिखलाचें काम सुरू केले. रानसईचे शेतकरी दरसालप्रमाणें यदाहि बाप्पाजींच्या पाया पडून लावणीला निघाले. परतु दीपाजी दरसालप्रमाणें यदा बाप्पाजींच्या पाया पडण्यास आला नाहीं.

आषाढात गावची लावणी सपली. अर्ध्या श्रावणांत दीपाजीची लावणी खुट्टरुटु चालली होती. दरसाल दीपाजी असाच मागे राही व गाव त्याला काढी. यंदा कोणी गांवकरी दीपाजीच्या मदतीला गेला नाहीं; कारण आजूबाजूच्या गावांनीं त्याच्यावर बहिष्कार पुकारला होता. अकुशाचे भीतीनें रानसईचे लोक पचायत भरवणे शक्य नव्हते. तेव्हा लाडीच्या सासऱ्याने आजूबाजूचे गांव उठवले व दीपाजीची स्थिति करुणास्पद केली. लावणींत फक्त भिवरी त्याच्या कामावर आली. भर लावणींत ती लावणीचें काम करताना शेतांत बाळत झाली; तरी ती हटली नाहीं. नाळाभरलें मूल लुगडें फाडून तिनें त्या फडक्यांत गुंडाळलें व इरल्याखालीं भर पावसात बाधावर ठेवलें व लावणी पुरी केली. तिनें माघार घेतली नाहीं. कातोड्यांची जात अशी कट्टी असते.

श्रावणांत दीपाजीची कालवड बुधवारली नी ती त्याला येईल त्य किमतीला विकावी लागली. याप्रमाणें भादव्या काळांत त्याच्या घरचें दुभतें संपले. दीपाजी पेंढा विकून मुंबईस गेला होता. म्हणून त्याला आगोटीला घरावर पेंढसा घेतां आला नव्हता. जुन्या कैंबळीवर त्याने भागविण्याचें ठरवलें. जुन्या कैंबळींतून घर गळू लागले. दीपाजीनें सागाचीं पानें कैंबळीवर दडपून पावसाचें थोडेसे निवारण केलें; परतु अखेर कैंबळींतून घर गळलें. जमिनीला ओल आली व घरांतील सर्व मंडळी हिंवतापानें आजारी पडली. मूळचा दुखणेकरी दीपाजी हिंवानें पुन्हां आजारी झाला, तेव्हां तो चिडखोर बनला. मनोहर व बाप्पाजी आपल्या सत्यानाशाला कारण असतांना लाडीची मनोहरबद्दलची आसक्ति कमी होत नाहीं, हे पाहून तो लाडीवर खूप संतापे. मनोहर घरीं असतांना लाडी मंगळागौरीला गेली हे जेव्हा त्याला कळलें तेव्हां त्यानें घरीं शिव्यांचा सपाटा सुरू केला व डोकें फोडून घेतलें. लाडीला घराबाहेर हाकलून देण्याची त्यानें वेळ आणली, तेव्हां बय मधीं पडली. बयचें आणि दीपाजीचें कडाक्याचें भांडण झालें.

" जवां तवां माझ्या पोरीचीं तुमी अब्रू घेतां तें मला नाय पतकरणार. माझी लेक ल्हान. तिला काय कळतं? तिला फसवली. मी तिच्यावर पाखर नाय धरणार तर कोन धरील? कावळ्याप्रमाणें तुम्ही तिला टोचता सदोनूदित ते ?"

" तेंच मी म्हणतों. उठल्यासुटल्या ती का म्हणून जाते तिकड?"

" का नाहीं जाणार ? वहिनीबाई लक्षुमीवानी ! त्यानीं तिला जेवायाला बोलावलं. घरांत नाय भाकर, नाय तुकडा. म्हणूनशानी म्हटलं पोरीला कीं तूं जा म्हणून. मोठ्या आईना तरी कुठ आवडल ? आम्हाला काय माहीत तो वादी आज येणार ! मोठ्या घरचं अन्न आपण आतापर्यंत खाल्लं. त्या अन्नाला पाठ कशी दाखवायाची ? म्हणून पोरीला म्हटलं तूं जा म्हणून."

" मोठ्या घरच आन माझ्या घरीं आणलंस तर उडवून देईन. टवळी मझ्या तोंडाला काळ फासते, आणि वर मला दिमाख दावते."

" खबरदार, माझ्या पोरीला कोणी बोललं तर ! मी जीभ हासडून पराण देइन त्याच्यापुढं. माझ्या पोरीन काय केल तिची येव्हढी विटबना करायला ? घरोघरीं हेच चाललय."

बयने त्रागा केल्यावर गरीब दीपाजी कढत बसला.

श्रावणाच्या सरीवर सरी पडूं लागल्या. वाऱ्यानें डुलून डुलून भात मोठे होऊ लागले. हिरवेगार भाताचे चोथे फुगले. जो ढग येई तो काळ्या कड्याला अडके व पावसाची जकात दिल्याशिवाय पुढे जाण्याचे नाकारी.

सबध दिवसभर पावसाची अंधेरी येई. टापटाप करून पाऊस रात्रदिवस पडे. पानावरून पावसाच्या सरी ताड ताड आवाज करीत. रात्रीं ओढे, धबधबे धों धों करीत. दीपाजी पोटाशीं पाय घेऊन दिवसभर झाल्या गोष्टीची खती करीत बसे. ओल्यात काम करून पाय सुजलेली दुखणाईत बय तशीच काबाडकष्ट करी. लाडी खोपीच्या आढ्याला टक लावून मनोहरचे चिंतन करी.

शेतकऱ्याचीं शेतीचीं सर्व कामे आटपलीं. लावणीनंतर बेणणी झाली. शेतीचे काहीं काम उरलें नाहीं, तेव्हा वेळ घालवण्याकरिता शेतकरी व त्यांचीं बायकामुले फेराचीं गाणीं म्हणू लागलीं. ते ढोलावर नाचूं लागले.

हळवार भाताचीं कणसें पोटरींत आलीं. सराई भादव्याच्या महिन्यात डोकावूं लागली.

माजलेल्या गवतावर जनावरे तयार होऊं लागलीं. गरीब शेतकऱ्यांच्या घरातील दाणा पार संपला. एक महिन्याकरिता कर्जाऊ भाताची दिढी घालण्याचे कबूल करून भात नेण्याकरिता कुळाचे जमाव सावकाराच्या ओटीवर बसूं लागले. भातशेतीच्या प्रदेशातील भादवा काळ म्हणजे हिरवा दुष्काळ. याच प्रदेशात ज्या वेळीं अपरपार पाऊस पडून सगळीकडे हिरवेगार झालेले असते त्या वेळीं भुकेने शेतकऱ्यांचे चेहरे उदास होतात. ज्या वेळीं कणसातील भात दूध घेत असतें त्या वेळीं घरातील दाणा खलास होतो. ज्या वेळेस विपुल गवत खाऊन जनावरे तयार होतात त्या वेळीं शेतकरी फाट्यासारखे सुकतात. असा हा भादवा काळ कठिण असतो. अर्ध्या श्रावणातच हा काळ सुरू होतो. भादव्याचा महिना जवळ येऊ लागल्याबरोबर ठाकूर कवळ्याच्या भाजीवर दिवस काढू लागले. कातोडी मिल्ही व मासळी याच्यावर भूक शात करू लागले. दीपाजीची स्थिति कठिण झाली. यदां श्रावणात त्याने केसूतात्याचे भात कर्जाऊ काढलें. बाप्पाजींच्या अगाचा तिळपापड झाला.

कर्जी आणलेले भात श्रावणात आवजातच खलास झाले. दीपाजीच्या घरीं मधून मधून एक वेळ चूल पेटण्याची बंद झाली. बयने शेजारूनपाजारून कणीकोंडा आणून रडणाऱ्या पोराची भूक थाबवली. सवयीनें मुले पण भूक काढण्यास शिकलीं. उपासाने लाडी सुकली, परतु तिच्या डोळ्याचे तेज कमी झाले नाहीं.

मनोरमेनें पुष्कळ वेळा अंधूबरोबर गुपचिप दीपाजीच्या घरीं वाढणें पाठवलीं. पण दीपाजीने बयशीं भाडणें करून तीं परत पाठवलीं.

पिठोरी अवसेला रात्रीं पाऊस धुमदार सुरू झाला व विजा चमकूं लागल्या. एक मोठी वीज चमकली. पावसाची सर चुकवण्याकरितां लाडी गज्या हरकुड्याच्या वळचणीला हातांत रिकामी पितळी घेऊन उभी होती. एक मोठी वीज चमकली, तेव्हां तिला अंकुशा दिसला.

“ अंकुशा, पोलीस गावात आहेत आन् तू कसा हिंडतोस ? ”

“ आज पिठोरी आवस ना ? ” अंकुशा हसत बोलला.

" मग त्याच काय ? "

" आजचा मुहुर्त लई मोठा. आज चोरी साधली नाय तर आख्ख साल फुकट जाईन. पण लाडे, रातची तू का इथ पावसांत उभी ? "

" आज पिठोरी ना ? "

" त्याच काय येव्हढ ? "

" आज महादेवाच व्रत करतों आम्हीं दरसाल, अन् आज आमच्या घरात चिमूटभर पीठ नाहीं. बयच न बाबांच भाडण लागल आहे त्याच्या वरून. म्हणून मी उसन पीठ मागायला निघाल्ये तो पावसाची सर आली मोठी. "

" अगदीं काय नाय तुमच्या घरांत ? "

" काहीं नाहीं. "

" किती दिवस ? "

" कालपासून चूल पेटली नाहीं. "

लाडीचे तोंडून हे शब्द निघाले न निघाले तों अकुशा तेथून नाहींसा झाला. लाडी गज्याच्या घरात शिरली. बयचें व दीपाजीचें भांडण जोरांत चालू होतेंच; तें पावसाच्या सरींतून ऐकूं येत होते. गज्या हरकुड्याकडे लाडीला पीठ मिळालें नाहीं. मग ती बज्या थरकुड्याकडे गेली. तिने आपल्या आळींतील सर्व घरीं विचारले, पण तिला उसनें पीठ कुठे मिळालें नाहीं. आतापर्यंत तीन वेळा प्रत्येकानें बयला उसनें घातलें होतें तें काहीं तिने परत केलें नव्हतें. त्यातून आज अवसेची रात्र. अशा वेळीं उसनें कोण देणार ? तेव्हा रिकामी पितळी पदराखालीं लपवून ती घरीं परत आली. अद्याप नवराबायकोचें भाडण मिटलें नव्हतें.

• " भात सपल कस ? भात हाय घरात. तूं चोरून ठेवलस. "

" नाय व्ह. तुमच्या गळ्याची आन. दाणा नाय घरांत. तुम्ही बाप्पाजींकडं जा न् चार पायल्या भात आणा. "

" मी बाप्पाजींकडं जातों ? मी नाय जाणार. मला अब्रू हाय कीं नाय ? बाप्पाजींच्या घराची पायरी चढणार नाय मी. यंदां मी त्याचे शेतात राब भरला म्हणून त्याच शेत लावलं. म्होरल्या सालाला केसूतात्याचं शेत करीन. मला काय कुठ बी कष्ट करायाचे. पन ज्यानं माझ्या पोरीचा

सत्यानाश केला त्याच्या घराची पायरी नाय चढणार मी. आपुन समदं भुकेनं मरून जाऊं, पन त्याच्या घराची पायरी नाय चढणार !"

"पन बरसाला नाट कशाला लावायाचा ? पिठोरीचा दिवस कसा सुना घालवायाचा ? आपल्याच पोराबाळाकरता आपण पिठोरी करणार. बाप्पाजीकुन नाय तर केसूतात्याकुन भात आणायचं व्हतं."

"त्यानं दिलं हेंच जास्त ! तो म्हणेल 'तूं काय माझं कूळ हाईस कर्जाऊ भात द्यायाला.' अन् येव्हढ भात दिलन् तें सपल कस इतक्यात?"

"संपणार कसं नाय ? कातोड्यांना वर्क्याच भात दिल आवंजेत. तुम्हीं आजारी पडलां मग भिवरीकडून वर्की काढली. आतां शपथेला दाणा घरांत नाय."

"नाय कसा ? तूं चोरून भात ठेवल हायस माशांकरतां."

"नाय व ! तुमच्याशीं खोट बोलेन ! राजणात एक आधोली भात नवरात्रात लाह्या करायाला ठेवलंय फक्त. तुम्ही माळ्यावर चढा न् सवता बघा."

"मग काढ तें भात अन् कुट, तूं अन् लाडी मिळून. म्हंजी मी महादेवाची पुजा करीन. चल उभी राहूं नकोस. चढ माळ्यावर."

बय पुटपुटत माळ्यावर चढली. तिनें राजणात हात घातला तर सबध राजण भातानं भरला होता. बय तें दृश्य पाहून सर्द झाली. आपल्या हातावर व स्पर्शज्ञानावर तिचा विश्वास बसेना. तिने लाडीला घासलेटचें टमरेल रांजणावर धरण्यास सांगितलें.

"सबध रांजण भरलाय !" लाडी उद्गारली.

"हं: हं: लाडे, खोटारडी आहे तुझी बय. मला माहितच ती दरसाल भादव्याकरतां लपवून ठेवते ती. लाडे, आणखी ते डबे पहा तपासून न् काय काय निघल बघ त्याच्यातून तुझ्या बयची ठेवणी."

लाडीने डबे तपासले.

"आणखी दोन डबे भातानं भरलेत ! आन् या गाडग्यात मिर्ची पण आहे. आन् हें गाडगं कशानं भरलंय ? मीठ आहे वाटतं."

"अग माझे आई !" बयनें तोंडावर हात ठेवला. "मी शपथ वाहतें. इथं काय बी नव्हतं. ह्यो इथं आलं कुठून ?"

" बय, तूं आलिकड सैरभैर झालीस. तूच विसरतेपणीं ठेवलस, त्याची तुला आठवण नाहीं. "

" नाय ग लाडे ! अग मींच हा राजण साफ करून ठेवला नाहीं का परवाच्या दिवशीं ? "

" हा, हा, बस्स झाला कागाव तुझा. आता देवाच नीट कर. उतर खालीं. " दीपाजी माळ्याखालून निघून गेला.

" पन लाडे, माझ्या गठुड्याची ही इस्कुटाइस्कुट कुनी केली ? म्हाताऱ्यानं दारूला पैसं नेल वाटत. चार पैसे मी या गाठीला मारून ठेवते, पण म्हातारा काय ठेवीत नाय. " बयने लुगड्याची गाठ सोडली. त्यात रुपये, अधेल्या आणि चिल्लर नाणीं चमकलीं. दोनचार नोटांच्या पुड्या पण त्यात होत्या. बय तर आश्चर्याने थिजली. ती दीपाजीला ओरडणार तों लाडीने आपल्या नाकावर बोट ठेवले व ती बारीक आवाजात म्हणाली, " ओरडू नकोस. अकुशानें हे सगळ ठेवलय. म्हाताऱ्याने ऐकलं तर तो बाहेर फेंकून देईल. "

बयनें आंवढा गिळला. तिच्या डोळ्यासमोर तिचीं भुकेलेलीं पोरें उभीं राहिलीं व ती आणखी माळा तपासूं लागली. गुळाची अर्धी ढेप व इतर सामान अंकुशाने अशा बेताने तिथें ठेवलें होते कीं, त्या कुटुंबावर चोरीचा आळ न यावा. बयने रात्रभर जागून स्वयपाक केला, देवाचा नैवेद्य केला. दीपाजी आजारी होता तरी त्याने रात्रीची अघोळ केली व रानांत जाऊन दिवे पेटवले व ' हरहर महादेव ' ची गर्जना करून पिठोरीची पूजा केली.

बय व लाडी उल्हसित झाल्या. कारण अकुशाने त्याचा भादवा काळ हाकलून दिला होता.

# प्रकरण ३१ वे

# रानगौर

आज सध्याकाळीं गौर–‘ दीडा दिवसाची पाव्हणी’–शेतकऱ्याच्या घरीं यावयाची. शेतकऱ्यांच्या बायकामुलींचा उत्साह गगनात मावत नव्हता. शेतकऱ्याच्या लहानमोठ्या मुली दुपारच्या बिनसारवलेल्या टोपल्या डोक्यावर घेऊन राग करून गौर आणण्याकरिता काळ्या कड्याच्या बाजूला रानात जावयास निघाल्या. हल्लीं त्याना अंकुशामुळे तुकारामचा त्रास होत नव्हता. अकुशाचा तर बायकामाणसाना बिलकुल त्रास नव्हता.

मुलींची राग गात गात जेव्हा लाडीच्या घरावरून गेली तेव्हा दरसाल-प्रमाणे लाडी देखील आपली टोपली घेऊन गौर आणण्याकरिता त्या मुलींबरोबर निघाली. परतु मुलींनीं दरसालप्रमाणे यदा तिचे स्वागत केले नाहीं. लाडी सगळ्याच्या मागून हळूहळू खिन्न आणि उदासवाणी चालू लागली. ‘ याच हिरव्या डोंगरातून, याच हिरव्या रानांतून, आपण दरसाल गौर सोन्याच्या पावलानीं आणली आणि यंदा आपल्या नशिबात हा वनवास कुठून आला ? यापुढे आपल्या नशिबात चागले दिवस नाहींत कीं काय ? परतु आपण नाट कशाला लावावा ? ’ असा विचार करीत ती मुलींमागून चालली.

मुली रानाच्या मध्यभागीं असलेल्या एका हिरव्या कुरणात आल्या. नुकताच पावसाचा एक सरवा पडून गेला होता. समोरच्या बाजूला झाडीं-तून तिरप्या डोंगराच्या कोनात ‘ भैरव ’ कोसळत होता. खालच्या बाजूला त्याचेच पाणी वेली-झुडपांतून काळ नदीच्या पात्रात शिरत होते. तेथें मुलींनीं फेर धरला. लाडी दरसालप्रमाणे फेरात सामील व्हावयास गेली. वास्तविक दरसाल ती या मुलींची पुढारीण असे.

“ तू नको बाई आमच्यात. ” मुली लाडीला म्हणाल्या.

“ का ? ”

“ का म्हणून विचारतेस आम्हांला ! तुझ्या मनाला विचार. तू कां आलीस आमच्यासंगं ! ”

" रान काय तुमच आहे ?" लाडी चिडली.

" तें हाय ग माहीत आम्हाला रान कुणाचं हाय तें ! पण तू आपली सवती रहा."

लाडीने टोपली उचलली व ती डोंगर चढूं लागली. मुली गाऊं लागल्या; त्यांच्यापेक्षाहि चढ्या आवाजांत, डोंगरकड्यारीच्या पावसाळी शांततेत, भैरवाच्या जयघोषाला फोडून लाडी गौरीचे गाणें गाऊं लागली. एका एका तानेबरोबर ती डोंगराची धस चढत होती. हिरव्या वेलींनीं निबिड झालेल्या रानांतून तिचा आवाज घुमू लागला.

" तुझ्या रथाला चांदीच्या खीळा ग ।
तुझ्या कमरेला सोन्याच्या किल्ल्या ॥
तुझ्या कोठारीं मोत्याच्या पाट्या ग ।
हिरे-माणीक-रत्नाच्या पेट्या ॥
तुझ्या कपाळिं चदर हिरवा ग ।
भोळा पाही त्याच्याकडं तिरवा ॥
दऱ्याखोऱ्यात हिरवी शोभा ग ।
नाहीं फुलाना कोठे जागा ॥
हिरव्या पाचूंचा हिरवा महाल ग ॥
तुला भोळ्यान केला बहाल ॥
तुझी रानात हिरवी माडी ग ॥
तू नेसलिस हिरवी साडी ॥
तुझ्या बागेत दवणा मरवा ग ।
तो वाढतो हिरवा हिरवा ॥
जाइजुई चमेली बेपर्वा ग ।
फुलवि पाण्याचा अरवा सरवा ॥ "

गात गात लाडी जाळी-जाळीमधून घुसली व तिनें गौरीकरतां कचोऱ्याचीं व तेरड्याचीं फुले गोळा केली. डोंगर चढल्यामुळें ती आता हुशारली व ती ताज्या व टवटवीत फुलाकरिता आणखी आणखी वर जाऊं लागली. भैरवाचा झोत वरून खालीं येत होता व लाडीच्या संगीताचा झोत खालून वर चालला होता.

लाडी कर्वत कड्यानें वर चढली. आता भैरवाची सोंड खालीं राहिली. काळ नदी काळ्या कड्यावरून तीन टप्प्यानें फेसा–भरल्या दुधासारखी पडत होती. तिचे काळ्या कड्यावर तीन धबधबे झाले होते. शेवटच्या धबधब्याला 'भैरव' धबधबा म्हणत. कारण तो मोठा होता व त्याला आणखी तीनचार धोधाण्या येऊन मिळाल्या होत्या. तेथें लाडी सपाटीला फुलें गोळा करूं लागली.

त्याच वेळीं मनोहर पुण्याहून आला, तो मधल्या डोंगरवाटेने काळा कडा उतरत होता. त्याच्या कानात लाडीचे आलाप शिरले. ती कुठें आहे हे पाहण्याकरिता तिच्याच गाण्याने दुमदुमलेली काळ दरी त्याने शोधून पाहिली. तो उभा होता तेथून भैरव धबधब्याच्या ओढ्याची खळखळ व कड्यावरची शेवाळ व गौरीचे केस यावरून झरणाऱ्या जलधारा याची निर्झरण रागदारीप्रमाणें चालली होती. त्याचेखालून भैरवाचा प्रचड जलघोष काळ्या कड्यावरून पडसाद करीत होता. या जलघोषातून साथ धरावी त्याप्रमाणे लाडीचा आवाज घुमत होता. वरती-खालती ओढ्याचे भोवरे, धबधब्या, दगडाळी यांतून पाण्याचा आवाज चालला होता. त्या ओढ्याचे मध्यभागीं एक लहानसे सोंगटीप्रमाणे दिसणारे हिरवे टेपाड तेरडा, कचोरा, सोनटक्की, विष्णुकात, मोरगा याच्या रगीबेरगी फुलानीं गजबजलें होतें. त्या टेपाडावर एक धोंड होती. ओढ्याचे पाठीमागे काळा कडा व बाजूनें एकावर एक हिरवे मजले चढवावेत असे डोंगर उभे होते. त्याच्या उतरडीवरून वनदेवीनें आरास माडली होती. त्या टेपाडाची व फुलांनीं डवरलेल्या बाजूच्या दरडीची छाया ओढ्याच्या शात झालेल्या पाण्यांत स्पष्ट पडली होती. त्या गहिऱ्या पडछायेत मनोहरने लाडीचे चित्र पाहिलें. मनोहरने वर नजर केली. लाडीची फुलांची पाटी तिच्या पाया-जवळ होती. शिवाय आणखी फुलें तिच्या हातात होतीं. त्या दगडीला टेकून ती रानगौरीप्रमाणें आपल्या एककल्ली आनदात गात होती. मनोहर त्या निसर्गसुंदरीकडे अनिमिष नेत्रांनीं पाहूं लागला. त्यानें पुष्कळ संयम केला. अखेर त्यानें हाक मारली.

"लाडे!"

लाडीची समाधि भग पावली नाहीं. मनोहर तिच्याजवळ गेला.

संध्याकाळच्या फाटलेल्या ढगांतून सरळ निघालेले सूर्यकिरण खलाटीवर पडले होते. त्या पिवळसर उन्हानें भातशेती उजाळली, हिरवीं कुरणे शोभायमान झालीं. त्यातून चरणाऱ्या गुराचे रग लाबून स्पष्ट दिसू लागले. समोर एक डोगर खालवरपर्यंत हिरवट झाला होता. त्याचे रग उन्हांत गहिरे दिसत होते. त्याच्या माथ्यावरच्या मैदानात व कड्याच्या अगार्नी हिरव्या गवतात सोनटक्याच्या पिवळ्या फुलाचा समुद्र उसळला होता. आडवे ऊन्ह झाडाच्या पानापानातून घोरदर रानाच्या अतरगात शिरले. रानें हिरव्या प्रभेने खुलली. तेच ऊन्ह लाडीच्या तोडावर विराजले. मनोहरने लाडीचा हात धरला.

“ लाडे, चल. ” मनोहर लाडीला ओढू लागला. तो उन्मादाने बेहोष झाला.

“ नाहीं, नाहीं, ती गोष्ट आता व्हायाची नाहीं. मी वहिनीबाईशीं दगाबाजी करणार नाहीं.” लाडी आपला हात बळ करून सोडवू लागली. त्या हिसकाहिसकींत तिची गौर पाण्यात लवंडली व वाहणीला लागली.

“ लाडे, माझे रानगौरे ! ”

“छेः! एकदा फसलें, पण जन्माची फसले, तरी लाडी दुसऱ्याच्या ताटांत विष वाढायाची नाहीं. तुमची रानगौर एक दिवस अशी जाईल, भैरवाच्या धोधार्णीतून फुलासारखी खाली पडेल.” रानफुलांची रास भैरवाच्या धोदाणीचे तोडाजवळ पोहोचली होती, तिच्याकडे बोट दाखवीत लाडी बोलली.

मनोहर तिच्या शेजारी बसला. खालीं हिरवी खलाटी लाबून येणाऱ्या पावसाच्या सरीनें अस्पष्ट दिसूं लागली. फेर धरलेल्या मुली आपापल्या गौरी घेऊन गावाकडे परत फिरल्या; त्यांची माळ गातगात हिरव्या धर्शीच्या कडेनें चालली. गुराख्यानीं आपले कळप खालीं आणले. डोंगराच्या कुसाडातून व खादाडांतून धुकें बाहेर पडलें व त्याचे पाढरे शुभ्र पट्टे रानारानांतून घुसून लाडी व मनोहर बसली होतीं त्या ठिकाणाकडे येऊं लागले. त्या धुक्यांत प्रचंड वृक्ष, रानें, कडे व गिरिशिखरें बोल-बोलतां अदृश्य झालीं. प्रथम पिंजलेल्या कापसाचा एक लांबच लाब पट्टा पसरला व थोड्याच वेळांत काळा कडा पायथ्यापासून माथ्यापर्यंत पाढऱ्या दुलईत

गुडूप झाला. जणुं तो कोणा योगींद्रापासून गुरुमन्त्र घेत आहे. अर्थात् त्या धुक्यात लाडी व मनोहर पण दिसेनाशीं झालीं. त्या धुक्यांतून अंकुशा 'हिरिरिरी'चे गाणे ललकारत होता.

सर्व मुली घरीं आल्या, पण लाडी परत आली नाही. तिन्हीसाजा टळल्या. अंधार पडला. पावसाचे फटकाऱ्यामागून फटकारे येऊ लागले. तरी लाडीचा पत्ता नव्हता. बयच्या तोंडचे पाणी पळाले. ती गावकरणी मुलीं-कडे चौकशी करू लागली. परतु हटवादीपणाने कुणी तिला उत्तर दिलें नाहीं. ती गुराख्याच्याकडे गेली. त्यांना पण लाडी कुठे रानात दिसली नव्हती. गावात कुजबूज सुरू झाली. कुणी म्हणे 'तिला पान लागलें,' कुणी म्हणे 'तिला वाघान खाल्ली,' कुणी म्हणे 'अंकुशानें तिला धरली,' कुणी म्हणे 'मनोहरचे तिचे आधीच पळून जाण्याचें ठरले होतें.'

दीपाजी रडत-ओरडत बाप्पाजींकडे गेला व त्याच्या ओसरीच्या पायरी-वर बसून त्यानें गळा काढला. बाप्पाजींनीं त्याला खूप समजावले; पण तो शात होईना.

"अरे अरे कर्म्या! लोकाची गौर घरी आली अन् तुझी अभाग्याची गौर गेली! बाप्पाजी, मी तुमचा असा काय अन्याय केला? माझी कुळी तुम्हीं बुडवली!"

दीपाजीच्या शोकानें बाप्पाजी गहिवरले. त्याचा तळतळाट आपल्या एकुलत्या एक मुलाला लागणार, अशी त्याची खात्री झाली. त्यानीं दम देऊन ठाकूर, कातोडी जमवले; कारण अंकुशाचे भीतीनें गांवकरी रान काढण्यास भीत होते. नंतर त्यानीं सुभानरावला निरोप पाठवला. सुभान-रावने गौरीच्या मुलींना जमवले व त्याची हकीकत ऐकून घेतली. त्यावरून लाडी पूर्वसंकेतानें रानांत गेली नव्हती, हें सिद्ध झाले. मग त्यानीं आपले पोलीस मदतीला घेतले, व कातोड्या—ठाकरांजवळ उजेड—कदील, पलिते, टेंबे देऊन रान विंचरून काढण्याचा निश्चय केला. सुभानरावाबरोबर बाप्पाजी पण शोधाला निघाले. त्यानीं, मुलींनीं रानात फेर धरला होता ती जागा व आसपासची झाडी तपासून पाहिली. तरी त्या रात्रीं लाडीचा शोध लागला नाहीं. काळ्या कड्यावर काळोखाचें ब्रह्मांड कोंदलें होतें. त्यांतून जलप्रलय भीषण आवाज काढीत होता. कारण पावसाची धुमधार

सुरू झाली होती. त्या काळोखांत कंदील, पलिते व टेंबे फक्त काजव्या-इतकेंच उजेड देऊ शकले. त्या उजेडांत शोधणाऱ्यांना गवतातून साप दिसले. शोधणारानी आपली शिकस्त केली, पण त्यांची मेहनत फुकट गेली. " उजाडल्याशिवाय कांहीं होणें शक्य नाहीं," असें सर्वानुमतें ठरले व ते सर्व गांवाकडे परत फिरले.

दुसरें दिवशीं सकाळीं लाडीची टोपली व गौरीचीं फुलें काळ नदीच्या वळणातील भोवऱ्यांत घोटाळत आहेत, अशी खबर आली. नदीच्या तीरावर लोकांचा जमाव लोटला. रानगौर स्वतः होऊन समुद्राकडे सासरीं जाताना पाहून त्याच्या डोळ्याचें पाणी खळले. सर्वांना वाटलें लाडी बुडून मेली. तिने काळ्या कड्यावरून जीव तरी दिला, किंवा ती पाय निसटून भैरवाच्या प्रवाहात पडली, असा संशय प्रत्येकाला आला. भोई लोकांनीं काळ नदीच्या पुरात उड्या मारल्या. गावोगावच्या लोकानीं काळ नदीच्या दुथड्या तपासून पाहिल्या. दुपारपर्यंत लाडीचा तपास लागला नाहीं.

" पुन्हा तुम्ही लाडीच्या शोधाला जाणार ? " बाप्पाजींनीं सुभानरावला प्रश्न केला. त्या वेळीं सुभानराव आपलें पिस्तुल कमरेला आंवळीत होते.

" लाडीचा शोध तर करणार ! पण आज अकुशाला मी पकडणार. घोरपडीच्या बातमीपासून माझा तर्क आहे कीं, अकुशा पावसाळ्यात भैरवामागील काळ्या कड्याच्या घबडीचा आश्रय करणार. आज माझी खात्री आहे कीं, अकुशा त्या घळींत सापडणार ! "

" या असल्या पावसांत तो काळ्या कड्यावर जिवत राहील ! " बाप्पा-जींनीं विचारलें.

" जलविद्येच्या साहाय्यानें दुर्योधन कसा पाण्यात लपला होता ? "

" मग आज तुम्ही अकुशाला भीमासारखे शोधून काढणार तर ! " बाप्पाजींनीं विनोद उत्पन्न केला.

सुभानराव भैरवासारखे हसले. त्यानीं आपली पार्टी सज्ज केली. बाप्पाजी पण आधल्या रात्रींप्रमाणें त्याच्याबरोबर निघाले. सुभानरावांनीं आपल्या पार्टीचे चार भाग केले. दोन भाग त्यानीं भैरवाच्या सोंडेच्या बाजूला दबा धरून बसवले व दोन भाग ते खालच्या बाजूनें सोंडेच्या पोटखळींत लप-लेल्या घबडीच्या रोखानें नेऊं लागले.

घबड सोंडेच्या बरोबर खालच्या बाजूला काळ्या कड्याच्या पोकळींत आधरत होती. वाऱ्याचा मोठा सोसाटा आला तर भैरवाच्या तुषारांनीं अर्धी घळ ओली होई. घळीला जावयास फक्त दोन बाजूनीं जागा होती. ती देखील निसणीप्रमाणे नीट आणि उच्च ! समोरच्या बाजूने भैरवाचा धबधबा घळीवरून पाढरी चादर वाळत घालावी असा चंदेरी [illegible] सुटला होता. त्यातून अकुशावर गोळीचा मारा होणे शक्य नव्हते. कारण भैरवाची वेगाने पडणारी चादर फाडून बदुकीची गोळी आत शिरली नसती. सुभानरावानीं घळीच्या खालच्या बाजूने पोलिस पाटवले, तेव्हा अकुशा वरून बार काढू लागला, म्हणून त्यानी आपला बेत फिरवला. कड्याच्या अगाने व घळीच्या कुशीनें ते घळीचे तोंड गांठण्याचा प्रयत्न करू लागले. अकुशाने त्याची ही खुबी ओळखली. घळीच्या तोंडाच्या बाजवा सुभानरावानीं रोखून धरल्या असत्या व तेथे गेट बसवून सगीन पहारा ठेवला असता तर अकुशा सांपळ्यात उंदीर सापडावा असा सुभानरावला मिळाला असता. सुभानराव तीच योजना अमलात आणीत होते. अकुशाजवळ उत्तम बदूक व भरपेट गोळीबार होता; परंतु भुकेमुळे एक दिवस त्याला सुभानरावाला शरण जाणे भाग पडले असते. पण अकुशानें या संकटाची आधींच तरतूद करून ठेवली होती. कड्याच्या बाहेरच्या अंगाला एक गारवेल चढली होती. आग्याची मध गोळा करणारे ठाकूर त्या वेलीचा शिडीसारखा उपयोग करीत. तेथपर्यंत अंकुशानें एक बीळ खणून नेले होतें. जेव्हा त्यानें पाहिले कीं, आता आपला नाइलाज झाला आहे तेव्हा तो त्या बिळातून सरकत गारवेलाजवळ आला व त्या वेलावरून चढून त्यानें भैरवाच्या सोंडेवर पडलेलें सागाचें आडवे लांकूड गांठलें. अंकुशा भैरवाच्या धोधाणीवर आला. त्याची काळी आकृति खालून स्पष्ट दिसूं लागली. पोलिसाच्या-ऐवजीं खुद्द मृत्यूच त्याच्याकरितां काळ दरीत ‘ आ ’ वासून उभा होता. इतक्यांत सुभानरावच्या दडवून बसवलेल्या पोलिसानीं गोळीबार केला. अंकुशा धोधाणींत पडला. क्षणभर तो लाकडाच्या ओंडक्याप्रमाणें खालीं येताना दिसला. प्रत्येकाला वाटले अंकुशा गोळी लागून पडला. खालचे पोलिस अंकुशाच्या प्रेताचा तपास करूं लागले. सुभानराव, बाप्पाजी व

कांहीं पोलीस दबकत दबकत घळींत शिरले. कारण अंकुशाचे साथीदार अद्याप जिवंत होते.

घळींतील देखावा पाहून बाप्पाजी व इतर लोक विस्मित झाले. घळींतील धोंडीवर मनोहर व लाडी एकमेकाना खेटून अधोमुख बसलीं होतीं.

"नीचा, तुला ही दुर्बुद्धि झाली कशी ? आता तरी तू हा नाद सोडावास ! तुला सोन्यासारखी बायको मिळाली. तिच्या नखाची तरी तुला सर आहे का ? अरे, माझा तू एकुलता एक. मला का दहापाच आहेत ? माझा तू लाडाचा, रूपवान् आणि गुणवान्. माझ्या आशेचा अंकुर तू. पण तूं माझ्या तोंडाला काळे फासलेंस आणि त्या गरीब दीपाजीच्या घराचा सत्यानाश केलास. यापेक्षा तू जन्मला नसतास, मी निपुत्रिक राहिलों असतों, तरी चालले असते. आजपासून तू मला मेलास ! तू मला तोंड दाखवू नकोस. लाडे, चल माझ्याबरोबर. तुझ्या बयने हंबरडा फोडला आहे. दीपाजीने आपले प्राण बाहेर काढून ठेवले आहेत."

बाप्पाजी लाडीला घेऊन खाली आले. त्यानीं आपल्या मुलाकडे जी पाठ फिरवली ते पुन्हा काही त्यानीं मागे वळून पाहिलें नाहीं.

पोलिसानीं अकुशाच्या प्रेताचा खूप तपास केला पण त्याना त्याचा पत्ता लागला नाही. तो पुरात वाहून गेला, असा लोकाचा समज झाला.

बाप्पाजी गेल्यावर सुभानरावानीं घळ तपासून पाहिली. अकुशाचा जीवनमार्ग तपासला. 'अकुशा या बिळातून कुठे तरी खलाटीला बाहेर पडणार , येवढी कल्पना त्याना आली होती व त्याप्रमाणे दबा धरलेल्या पोलिसाचा त्यानीं बदोबस्त ठेवला होता. परंतु भितीसारख्या कड्यावरून एका वेलाच्या साहाय्याने चढून अंकुशा जाईल अशी काहीं त्यांची मति चालली नाहीं. त्याना पोलिसखात्यातील नोकरींत गुन्हेगाराच्या धाडसाचे कैक अनुभव होते, पण अकुशाने सर्वांच्यावर कमाल केली.

सुभानरावनीं घळ तपासून पाहिली. त्याना फक्त एक साधी काडतुसी व दोन तीन ठासीच्या बदूका — बहुतेक अकुशाच्या साथीदाराच्या असाव्यात — कातोड्यांचीं शिकारीचीं हत्यारें, येवढाच माल मिळाला. सुभानरावला जी पाहिजे ती वस्तू मिळाली नाहीं. ती वस्तु म्हणजे अंकुशाची रायफल आणि दुर्बिण.

"मनोहर, अंकुशानं रायफल आणि दुर्बिण कुठं ठेवली ती तुम्हीं पांहिलीत?"

"त्या दोन्ही जिनसा त्यान एका पोकळ लाकडाच्या ओंडक्यांत भरल्या व त्याचं तोड मेणानं बद केल. तो ओडका पाठीशीं बांधून तो या बिळांतून निसटला." मनोहरने सुभानरावाला आपली माहिती सांगितली.

"म्हणजे? भैरवातून उडी मारण्याची त्याने आधींच तयारी केली होती कीं काय?" सशयित नजरेनं मनोहरकडे बघत सुभानराव बोलले.

"ते कांहीं मला माहित नाहीं." मनोहरने सरळ जबाब दिला.

"मनोहर, नागरिक या नात्यानं तुम्हीं त्याला प्रतिकार का केला नाहीं. तुम्हीं या दरोडखोराच्या सगतींत सापडणे गुन्हा आहे. मी तुम्हाला अटक करूं शकतो."

"मी स्वतः होऊन येथे आलो नाही. धुक्यात वाट चुकलो तेव्हा अकुशान रस्ता दाखवून मला इथ आणल."

"तुम्हाला एकट्याला?"

"नाही."

"मनोहर, तुम्हीं सुपुत्र आहांत, पण वृद्ध वडिलाच्या कीर्तीला काळिमा आणीत आहात. मी तुमच्या वडिलाच्याकरिता तुमच्यावर कोणत्याहि प्रकारचा इलाज करीत नाहीं. तुम्हीं हा मार्ग सोडा."

"होय, प्रयत्न करीन. मी आता या गावाच तोंड पाहणार नाहीं, दूर दूर–कुठ तरी दूर–गेल्याशिवाय हे घडणं शक्य नाहीं. फौजदारसाहेब. तुम्हाला असं का वाटत मीं आत्मसंयमनाचा प्रयत्न केला नाहीं. पण संयम माझ्या शक्तीबाहेरचा ठरला."

सुभानरावानें मनोहरच्या पाठीवरून कुरवाळलें.

"मनोहर, तुम्हीं आता घरीं चला."

"नाहीं. आता या गावांत पुन्हा तोंड दाखवायचं नाहीं."

"तुमची शेतीवाडी, वृद्ध माता-पितरें, तुमची गृहलक्ष्मी यांना तुम्हीं सोडणार? शोकानं तुमच्या आईबापांचं काळीज फाटेल."

"मला आतां कुणी नको. माझ्या पत्नीचं दर्शन घेण्याची देखील मला लाज–नाहीं, भीति–वाटते."

सुभानराव व पोलिस निघून गेले. रात्र झाली तरी मनोहर घबडींत बसून राहिला. पोलिस गेल्यावर एका प्रहराने अकुशा कुडकुडत घळींत परत आला.

"दादा, काकड्यान मी मरतो; इस्तु तरी पेटवा. या घडीला कुणी मला बेवड्याची बाटली देईल त्याला मी मणभर सोन देईन."

मनोहरजवळ काड्याची पेटी नव्हती व दारूची बाटलीहि नव्हती.

"कशानं पेटवू?" मनोहरने विचारले.

"माझा चकमकीचा कफ तर पार भिजून गेला आहे." अकुशा बोलताना हिवाने थाडथाड उडत होता.

मनोहरने आपल्या अगातील कारवीच्या परागांनीं सुवासित झालेला कोट काढला व अकुशाच्या अंगात घातला. हा कोट त्यानें घातलेला मनोरमेला आवडे म्हणून तो आज हा कोट घालून पुण्याहून निघाला होता. त्या गरम कोटाच्या उबीनें अंकुशाची थंडी थोडीशी हटली, तेव्हा मनोहरनें त्याला प्रश्न केला,

"अंकुशा, पोलिसाना वाटले तूं गोळी लागून मेलास."

"मी खातों त्याची गोळी! त्यांच्या बाला नाहीं ऐकायाचा मी. त्यांनीं माझा शोध करू नये म्हणून मीं ढोंग केलं."

"मग तूं भैरवांतून उडी मारलीस?"

"त्यांत काय हाय दादा! खालीं पडलं कीं तळाला मोठी कोंडी आहे त्यांतून बुडी मारून निघायाचं."

"मग तूं खालीं बसवून ठेवलेल्या पोलिसांना कसा सापडला नाहींस?"

"मी कशाला निंगतो त्याच्या बाजूला. भैरवाच्या मागं कड्याला पोकळी हाय तिथं बसून बघत होतों साल्याची गंमत. मारे घटकाभर धांवपळ चालली होती त्यांची! पण दादा, पाण्याच्या गारव्यानें पार गारटलों. शेकल्याबिगर मी जगत नाय. पलीकडच्या अंगाला आधरत डोंगरावर ठाकूरवाडी आहे. तिथं धवा ठाकराच्या घरीं मला पोंचवा."

"अन् त्यांनीं पोलिसांना बातमी दिली तर?"

"मग हे हत्यार उराजवळ कशाला ठेवलं हाय! भेकड ठाकूर माझ्या-विरुद्ध कधीं जायच नाहींत."

मग मनोहरनें अंकुशाला धवाचे घरीं पोंचविले.

---

# प्रकरण ३२ वें

## त्याच रात्रीं

बाप्पाजी लाडीला घेऊन रानसईत आले त्याचे आधीच मनोहर आणि लाडी भैरवाच्या घबडींत एके ठिकाणीं मिळालीं, अशी गोग गावांत आली.

" मनूला घेऊन का आला नाहींत ? त्याचेवर रागवून आपलं कसं चालेल ? आहेत त्याचे हूडपणाचे दिवस. पोरबाळ झाल म्हणजे निवळेल."

राजसबाईचे आतडे पुत्रप्रेमाने तुट् लागले.

" निवळेल ! खरं आहे तुमच म्हणण. पण तोपर्यंत किती घरादाराच तो वाटोळं करणार ? कुसतानापेक्षा निसतान बर."

राजसबाई हातात काठी घेऊन काळ्या कड्यावर जाण्याकरिता स्वतः निघाल्या. त्यानीं सोबतीकरिता अधूला बोलावले.

" अंध्या, जो कोणी माझा हुकूम मोडून जाईल त्याच मी डोक फोडीन. त्याला मी आपल्या घरात पाऊल ठेवू देणार नाहीं. स्वतःचा मुलगा झाला म्हणून काय झाल ? न्याय सगळ्यांना सारखाच."

इतक्यात सुभानराव काळ्या कड्यावरून आले. त्यानीं बाप्पाजींना मनोहरची प्रतिज्ञा सागितली.

" ठीक आहे. माझ म्हणणं तेंच आहे." बाप्पाजी शातपणाने बोलले.

मनोरमेनें ही प्रतिज्ञा ऐकल्यावर अश्रू ढाळण्यास सुरुवात केली. राजसबाईनीं आक्रोश सुरू केला. पण बाप्पाजींना ढीम नव्हता.

" काल लाडीची आई असाच आक्रोश करीत होती. तेव्हा नाहीं तू कुठ धावलीस ? आज त्यान लाडीला बिघडवल ? उद्यां तो आणखी कांहीं धदे करील. त्यापेक्षा या पाप्याच तोड न पाहिलेलं बर."

राजसबाई रड रड रडल्या व माजघरांत आडव्या झाल्या. बाप्पाजी ओटीवर उपरणें पाघरून झोपले. त्या रात्रीं बाप्पाजींच्या इथे कुणी जेवले नाहीं.

मध्यरात्रीं लाडी मनोरमेच्या माडीवर आली. तिला मनोरमेनें निरोप पाठवला होता.

स. १६

" आलीस बाई ! मला वाटलं तूं येतेस कीं नाहीं."

" वहिनीबाई, असं होईल ? जिवाला जीव देणारी लाडी आहे, म्हणून तिची अशी दशा झाली. तेंच माझ्या कर्मात लिहलं होत म्हणून घडून आलं. असं झालं म्हणून अमृताच्या ताटात मी विष ठेवणार नाहीं. तुम्हाला वाटेल की, मीं तुमच्या घरधन्याना बिघडवलं. तशी गोष्ट नाहीं ती. तुम्हीच आपल्यावरून माझी परीक्षा करा. हातातून बाण निघून गेल्यावर पश्चात्ताप करून काय उपयोग ! सागा मला—मन मोकळं करून सांगा—तुम्ही मला जानूबरोबर निरोप कां पाठवलात ते ?"

" लाडे, सगळ्या गोष्टी तुला कळल्या ?"

" कळल्या."

" मला त्याचं दर्शन करीव ! जिकडे माझे पति तिकडे मी जाणार. मला इथ राहून काय करायचं आहे !"

" येव्हढ्या रात्रीं काळ्या कड्यावर तुम्ही जाणार ?" लाडी आश्चर्यानें बोलली.

" तू कशी गेली होतीस, तशीच मी जाणार. ते जिकडे जातील तिकडे मी जाईन." मनोरमेचा निश्चय तिच्या डोळ्यात स्पष्ट दिसत होता.

" तसं नाहीं म्हणत वहिनीबाई मी. पण तुम्ही नाजुक फूल, कुसळ बोचल तर तुम्ही विवळाल. तुम्हीं रान कधीं पाह्यलं नाय. आम्ही रानचीं जनावरं—तरी दिवसा करदीचे डाभे मोडतात आमच्या पायात. मग ही तर रातची वेळ. मला देखील रस्ता सुधारणार नाहीं रातचा."

" लाडे, प्राण गेले तरी हरकत नाहीं. पण आज मी जाणार. तुला यायच नसल तर तस साग."

चावी लावून मनोरमेने कपाटाचा ड्रॉवर उघडला व आपल्या दागिन्याचा डबा बाहेर काढला.

" पण हे कशाला घेता बरोबर ?" लाडीने आश्चर्याने विचारले.

" तुला त्याचा स्वभाव माहीत नाहीं. ते कालत्रयीं आपली प्रतिज्ञा मोडणार नाहींत. त्याना कष्ट माहीत नाहींत, त्याना कोणताहि धदा येत नाहीं. मग आम्ही संसार कसा थाटणार ? कुठ तरी काहीं दिवस आम्हांला पदरमोड करावी लागणार नोकरी मिळेपर्यंत. हे दागिने लग्नांत माझ्या

बापानं मला बक्षिस दिले. हें माझं स्त्रीधन. या सगळ्यासुद्धां मी सर्वस्वीं त्यांची आहें.'' अभिमानानें मनोरमा लाडीकडे कटाक्ष फेंकूं लागली.

लाडी विमनस्क हंसली.

'' तुला खर नाहीं वाटत !''

'' अगदीं खर वाटत. पण गरिबाच्या जवळ अर्पण करायला दागिने नसले तरी एक गोष्ट असते वहिनीबाई. लाडीने ती केव्हांच अर्पण केली आहे.''

'' काय–प्राण ?''

'' प्राणापेक्षा जास्त अमोलिक.'' लाडीच्या दृष्टींत कठोरता भरून राहिली, तिने मनोरमा भेदरून गेली.

'' काय ती !'' बुचकळ्यात पडलेल्या मनोरमेने प्रश्न केला.

'' काय-ती ? तुम्हांला नाय कळायचं ते.''

मनोरमा उठली व तिनें लाडीच्या गळ्यात प्रेमाने हात घातला व ती तिच्या काळ्याभोर डोळ्यांत भरून राहिलेल्या अथांग गूढतेत डोकावत म्हणाली,

'' लाडे, मला तूं पाठची बहीण समज. सांग, तुझ्या मनांत काय आहे ते !''

'' स्त्रीची अब्रू ! हलाहल शकरानें कठात धारण केलें तर त्याना इतका त्रास झाला. मीं ते इथ धारण केलं आहे.'' तिने आपल्या उरावर हात ठेवला. '' फक्त प्रेमाखातर ! प्रेमान मी आधळी झाली आहे.''

मनोरमा व लाडीं गळ्यांत गळा घालून मनमोकळ्या रडल्या. मग त्या दोघीजणी काळ्या कड्यावर जावयास निघाल्या.

'' वहिनीबाई, अधारात आपल्याला ठेचा खाव्या लागतील, हात टेकून कडा वेघावा लागेल आपल्याला सातपायऱ्यानीं कर्वत कड्याच्या बाजून जाणं शक्य नाहीं. आपणास लाबून बाजूच्या रानातून कडा वेघावा लागणार, तर तुम्ही हे जोखीम बरोबर घेऊ नका. तुम्हाला हें केव्हाहि मागाहून नेता येईल.''

मनोरमेनें दागिन्याचा डबा पुन्हा कपाटांत ठेवला व किल्ली लावून ती कपाटात गुप्त कप्पा खोदला होता त्यांत लाडीच्या न कळत ठेवली; मग या दोघीजणी काळ्या कड्याच्या मार्गाला लागल्या.

शाईच्या वर्षावाप्रमाणे पाऊस आणि काळोख कोसळत होते. मनोरमेनें लाडीच्या खांद्यावर हात ठेवला. लाडी जाईल तिच्यामागें पावलांवर पाऊल टाकून ती आंधळ्यासारखी जात होती. लाडी तिला मधून मधून खाच-खळग्याचा इशारा देई. शेताच्या ओहळींतून और चालले होते. मनोरमेला वाहते पाणी उतरून जाण्याची सवय नव्हती. ती वाहून जाऊ नये म्हणून लाडी तिला कवटाळून सुखरूप ओढ्याच्या पार नेई. रानभाग लागल्यावर तर काळोख इतका वाढला कीं, डोळ्यासमोर काटेरी फांद्या आडव्या आल्या तरी दिसत नव्हते. आता डोळे उघडे ठेवणे काय नि मिटणे काय, दोन्हीं सारखीच होतीं. लाडीला रानच्या वाटा पाठ होत्या म्हणून ती अंदाजाने चाले. चढण सुरू झाली, तेव्हा मनोरमेला फार कष्ट होऊं लागले. गुराच्या पावलानीं ठिकठिकाणीं चिखल झाला होता त्यातून तिचे पाय भसाभस गुडघा गुडघा जात, चिखलातील काटे तिच्या पायात मोडत; रस्त्याने मुरुमाचे माळ शेवाळले होते, त्याच्यावरून ती निसटून पडे. वाटेने पावसाच्या जोराने निघालेले बारीक दगड, खडे बोचून तिचे पाय हुळहुळे झाले. तिने व लाडीनें अंगावर घोंगड्या घेतल्या होत्या त्या ओल्या चिंब झाल्या. मनोरमा चढणीला ठिकठिकाणीं बसू लागली. झुडपातून रानातील श्वापदे त्याना आडवीं जात होतीं. रानातील असंख्य पानावर पडणाऱ्या पावसाच्या टपोऱ्या थेंबाच्या, रात-किड्याच्या व घुबडाच्या आवाजात भैरव अक्राळविक्राळ ओरडत होता; मधून मधून ओहळाच्या दगडी पात्रातून घासणाऱ्या गोट्याचा व दगडींचा घडघडाट किंवा डोंगरावरून कोसळणाऱ्या कड्याचा नाद काळ दरींत घुमत होता, तरी मनोरमा भ्याली नाहीं. प्रेम, पातिभक्ति तिला काळ्या कड्याची वाट दाखवीत होती. पतिदर्शनाला ती इतकी उत्सुक झाली होती. तिला पतीच्या दर्शनाशिवाय काहीं दिसत नव्हते. लाडी व मनोरमा जेव्हा सपाटीला लागल्या तेव्हा गुरांचा गवंड सपला व पुन्हां चिकार रान व माजलेले गवत लागले. त्यातून लाडी काळोखात दिसणाऱ्या पांढऱ्या भैरवाच्या अनुरोधाने चालली. मनोरमेला तिच्यामागून जाणे मुष्किल होऊं लागले. लाडीने मनोरमेचा काल्यासारखा गार हात आपल्या उष्ण हातात पकडला व ती मनोरमेला जपून चालवूं लागली. कितीतरी वेळा त्या दोघी-

जणी वाटा चुकल्या. जेथून त्या निघाल्या त्या ठिकाणीं परतहि आल्या. त्या भैरवाच्या घळींत आल्या तेव्हा पहाट झाली. घळींत कोणी नव्हतें. धीर सुटून मनोरमा मटकन् खालीं बसली व रडूं लागली.

" वहिनीबाई, तुम्ही रडूं लागलां कीं माझं काळीज फाटतं. माझ्यामुळं तुमच्यावर ही आपत्ति आली ! मीं काय केलं म्हणजे तुम्ही सुखी व्हाल ! खरोखर हा पापी देह अपवित्र झाला आहे. देऊं याला 'भैरवा'त फेकून?"

" नको, त्याना दुःख होईल आणि मीं तुला मारल म्हणून ते माझा तिरस्कार करतील. "

" नाहीं, तस होणार नाहीं. "

" तुझ्यावर त्याच जास्त प्रेम आहे. "

" नाहीं. दोघींवर आहे. पण मी मेले तर तो मला विसरेल; तुम्ही मेलात तर तो जोग घेईल. "

लाडी घळीच्या कडेला जाऊन उभी राहिली. तिच्या आवाजात पश्चात्ताप भरला होता. मनोरमा घाबरून तिच्याजवळ जाऊन उभी राहिली. भीषण काळोखाच्या तळात 'भैरवा'चे भोवरे उकळत होते. भैरवाच्या गर्जनेत एकमेकींचे बोलणे ऐकताना त्याना कष्ट पडत होते.

" लाडे, घरीं चल. " मनोरमेने लाडीचा हात पकडला.

पहाटेच्या रामप्रहरीं सृष्टीचे रूप शात निवळूं लागले. पाऊस, वारा, पावसाच्या झडी, पानाचे-फाद्याचे आवाज, घुबडाचे घूत्कार, व काळोख याच्या साहाय्याने रात्रभर धिंगाणा घालून प्रलय माडणारा वेताळ पळून गेला. थोडे दिसूं लागले, तेव्हा लाडी व मनोरमा डोगर उतरू लागल्या व माणसाला माणूस दिसण्याचे आत त्या परत घरी आल्या.

मनोहरच्या टेबलावर अद्याप दिवा जळत होता. त्या टेबलावर एक नुकतेच लिहिलेले पत्र होते. मनोरमेने सुलोचनेच्या हर्षानें ते पत्र उचलले व भरभर वाचले, नतर ते लाडीला वाचण्यास दिले.

" — सखे,

तूं माझी लाडकी आहेस खास ! पण तुला तो शब्दप्रयोग आवडणार नाहीं. कारण त्यांत दुसऱ्या एका माणसाचा अतर्भाव होतो. मीं घरीं न येण्याची प्रतिज्ञा केली होती, परंतु तुझ्या प्रेमामुळे मला ती मोडावी लागत

आहे. तुझा मुखचंद्रमा डोळ्यासमोर नसला तर या अफाट जगांत मी भटकूं तरी कसा ? मला तुझ्या सहवासांत जे सुख मिळालें तें पुन्हां कुठंहि मिळणें शक्य नाहीं. तूं म्हणशील मी लाडीवर अनुरक्त होतो, पण तिची गोष्ट वेगळी आहे. लाडीचे मीं भयंकर नुकसान केलें. जन्मभर मीं पश्चात्ताप केला तरी त्या पापाचें परिमार्जन होणे शक्य नाहीं. या वेळीं माझ्या डोक्यात किती तरी भयकर विचार आहेत ! त्याने मस्तक फुटून जाण्याची वेळ आली आहे. मी शात होण्याकरिता कुठ तरी लाब लाब निघून जाणार. बहुतेक काळ्या खंडात हे काळतोंड लपवणार. तुझ्या, बाप्पाजींच्या, मोठ्या आईच्या, आणि राग मानणार नाहींस तर सागतो, लाडीच्या पण योग्यतेचा मी नाहीं, म्हणून निघून जात आहें. मी कुठं जाणार हें निश्चित नाहीं. पण लाब निघून जाण्यापूर्वी एक दिवस मी तुला भेटून जाईन. हेंच सागण्याकरिता मी इथे आलो होतों. तुझ्या टेबलावर दिवा जळत होता, पण तूं मला आढळून आली नाहींस. मला शोधण्याकरिता अंधूला घेऊन तूं काळ्या कड्यावर तर गेली नाहींस ना ? का माजघरात मोठ्या आईच्या शेजारीं निजली आहेस ? मला तुला घरात शोधून पाहता येत नाहीं. तुला शोधण्याकरितां मी काळ्या कड्यावर जात आहे. पहाट होतांच मी या गावाची शीव सोडणार. बाप्पाजी, मोठ्या आई व लाडी याना साभाळ-ण्याचे काम तुझे आहे.

तुझा दुर्दैवी पति
मनोहर. ”

लाडीनें पत्र वाचलें. तिच्या टपोऱ्या डोळ्यात टपोरे अश्रू उभे राहिले. इतक्यात तिची नजर कपाटाच्या खणाकडे गेली व ती चपापली.

“ वहिनीबाई, तुमच कपाट उघडं आहे. ”

कपाटाच्या खणांची किल्ली कुलपांत अडकलेली व खण थोडासा पुढें ओढलेला होता. मनोरमेने खण उघडला. त्यात दागिन्यांचा डबा नव्हता. मनोरमा खिन्न झाली. लाडी बोलली.

“ आपल्या मागं कुणी चोरट्यानें पाळत ठेवून डवा लाबवला ! ”

“ नाहीं, चोरानें कुलूप फोडलें असतें किंवा दुसरी चावी लावली असती. मी किल्ल्या कुठं ठेवतें हें त्यांच्याशिवाय कुणाला माहीत नाहीं. ”

" मग कुणीं नेला तुमचा डबा ? उद्यां आपण पोलिसांत खबर देऊं. "

" दागिन्याची काय किंमत ! उद्यां त्यांना पकडलें तर? पोलीस त्याचा सशय घेतील. ते म्हणतील मींच त्यांना खर्चाकरिता दिला व सासूसासरे रागावतील म्हणून दुसऱ्यावर बालंट घेत आहे."

" छट् ! काहींतरी बोलता. तसलं माणूस तुमचे दागिने नेईल काय ? शिव शिव ! पुन्हा तोंडातून अस भाषण काढू नका ! " लाडी फणकारली.

" मीच सर्वस्वीं त्याची आहे, त्याना माझ धन नेण्याचा अधिकार नाहीं?"

" त्यानीं दागिने नेले असते तर पत्रात तसं लिहून ठेवल असत. "

" माझं माणूस मला माहीत आहे. "

" माझं पण मला माहीत आहे तुमच्यापेक्षा जास्त. माझा मनहरण चोर नाहीं. " क्रुद्ध नजरेनें लाडी मनोरमेकडे पाहू लागली.

" अंकुशाच्या सहवासात राहून तुमची चोरीची कल्पना बदलली आहे." मनोरमेचा चेहरा रागानें लाल झाला.

" अकुशा पण चोर नाहीं. ज्या प्रकारच्या चोऱ्या तो करतो त्या त्याच्या कुळीचा जाति-धर्म म्हणून करतो. इतर चोराप्रमाणे अकुशाचे मन पापी नाहीं. त्या चोऱ्या पोटाकरता असतात. उद्या तुम्हांला काहीं खावयाला मिळाले नाहीं कीं तुम्हीदेखील तसल्या चोऱ्या कराल. "

" लाडे, तूं म्हणतेस तेंच खरें आहे. मी उगीच तिकडचा संशय घेतला. उद्या मी सासूबाईना सागून पोलिसात खबर देईन. लाडे, पण तू अशी काय करणी केली आहेस कीं माझ्यापेक्षा त्याचं मन तुला जास्त कळतं ? " मनोरमेने लाडीचा दंड पकडला. मनोरमेचा स्पर्श लाडीला विस्तवासारखा लागला. मनोरमा डोळे फाडून लाडीकडे पाहू लागली. तिनें लाडीला गदगदा हालवले. तेव्हा लाडी म्हणाली,

" वहिनीबाई, तुम्ही अस काय करता ? तुम्ही तापान फणफणल्या आहांत. तुम्ही कपडे बदला आणि पडा. मी तुमचे केस पुसून काढतें. "

इतक्यात मनोरमा पलगावर मूर्च्छित होऊन कोसळली. लाडीनें मनोरमेचे लुगडें बदललें, अग व केस पुसून काढले. मनोरमेचा ताप खूप वाढला. ग्लानि येऊन ती झोंपीं गेली, तेव्हा लाडी कोणाला न दिसतां तेथून पसार झाली.

# प्रकरण ३३ वें

# चोय चोय

मनोरमा पलगावर तशीच पडून राहिली. सूर्य वर आल्यावर राजसबाई तिच्या समाचाराला आली. त्या वेळीं तिचा ताप बेफाम वाढला होता. ‘ मानसिक त्रासामुळ ताप भडकला ’ असे वैद्याने निदान केले. आधल्या रात्रीची हकीकत कोणाला कळली नव्हती. पाचसात दिवसानीं मनोरमेचा ताप उतरला. येवढ्या अवकाशात लाडी मनोरमेकडे फिरकली नाहीं व राजसबाईनीं पण तिला घरात येऊ दिले नसते. ताप उतरल्यावर देखील मनोरमेने लाडीला बोलावले नाही व ती पण मनोरमेकडे आली नाही. दरम्यान मुंबईहून पत्ता न देता मनोहरचे मनोरमेला पत्र आले, त्यामुळे बाप्पाजी व राजसबाईचा जीव खाली पडला. “ कुठहि सुखाचा असो म्हणजे झाले, ” राजसबाईनीं उद्गार काढले. पण बाप्पाजींनीं आपल्या भावना कुणास कळू दिल्या नाहीत.

ताप उतरल्याचे दुसरे दिवशीं मनोरमेने दागिन्याचा डबा गेल्याची हकीकत आपल्या सासूला सांगितली. बाप्पाजींना मनातून मनोहरचा सशय आला. पण व्याह्याच्या दागिन्याची आपणाला तोहमत नको म्हणून त्यानीं पोलिसला खबर दिली.

याप्रमाणे पावसाळ्याचे दिवस रानसईत भराभर चालले. भाद्रपद-अखेर लाडीचा नवरा साप चावून मेल्याची बातमी आली. लाडीला त्याचे कांहीं वाटले नाहीं. अश्विनाचा महिना उजाडला. भादव्यात पहाटचारा खाऊन माजलेला तात्याचा काज्या डरकाळया फोडू लागला, पण यदा दसऱ्याला झोब्या लावण्याची अंधूला उमेद राहिली नव्हती.

अश्विनाच्या महिन्यात भाते निसवलीं व त्याचे आकडे वाळून खलाटी पिवळी रजन दिसू लागली. सराई नव्या नवरीप्रमाणे आपले अलकार शोधीत होती.

भाताचीं लोंबरे डुलू लागली तसा गहाणाच्या दाव्याची तारीख जवळ येते म्हणून समना डुलू लागला. आपणास पिकासुद्धा राजपाटी मिळणार म्हणून तात्या डुलू लागले. बाप्पाजी मात्र ओटीवर उपरणे पांघरून

काळ्या कड्याप्रमाणें खंबीर बसून जप करीत. त्यांनीं यत्किंचित् मनोधैर्य चळू दिलें नाहीं. एका परमेश्वरावर भार घालून ते स्वस्थ बसून राहिले. मात्र शेतींतून त्याचे लक्ष पार उडालें. त्यानीं राजपाटीवर जाण्याचें देखील सोडून दिलें.

बाप्पाजींनीं मनोरमेला 'माहेरीं भावाकडे जाऊन राहण्याची तुझी इच्छा आहे का?' म्हणून विचारलें. त्या वेळी तिकडचें येणे होईपर्यंत मी सासूसासऱ्याची सेवा करीत रानसईतच राहणार, हा दृढनिश्चय तिनें बाप्पाजींना स्पष्ट कळवला. आता ती आपला वेळ पूजा-अर्चा, धार्मिक पुस्तकाचे वाचन व शेतीची देखरेख यात घालवूं लागली. तिने पूर्ण वैराग्य घेतले. आपली मौल्यवान् वेषभूषा व सौंदर्यसाधने तिने बांधून ठेवलीं. तिने साधा वेष धारण केला. शेतावर स्वतः जाऊन देखरेख करण्यात तिने कोणाची दखल मानली नाहीं. आपल्या भावाच्या मार्फत तिनें बाप्पाजींची सही घेऊन बॅंकेचे कर्ज काढले व गहाणाचे पैसे कोर्टात भरून दावा निकालात काढवला. ही गोष्ट तिने इतक्या गुप्तपणे घडवून आणली कीं, रानसईत तिची कोणाला वार्ता कळली नाहीं.

तिने सगळीकडे खर्चाची काटकसर केली. घरातील पोतेभर चांदीचीं भांडीं व इतर निरुपयोगी सामान विकून तिने किरकोळ कर्ज निवारण केलें. त्यातून जी रक्कम उरली ती शेताच्या बंदिस्तीकरिता बाजूला ठेवून दिली. गोठ्यातील फालतू जनावरें अर्धेलीने कुळाकडे राखणीस दिलीं. घरातील इनामदारी बडेजाव खणून काढला. सर्व व्यवहार आकारांत व आटोक्यात आणला.

दावा काढून टाकल्यामुळे तात्या व समना खूप चिडले. तात्याचे घेतलेले पैसे परत करताना समनाच्या अगदीं जिवावर आले.

"समना, अकुशान तुझ नाक कापलं तस बाप्पाजीन पण कापल." तात्यांनीं समनाला चिडवले.

"हें बघ तात्या, तू माझ्या नाकाची गोष्ट काढूं नकोस. जो कोणी अकुशाला पकडील त्याला मी हजार रुपयाचा तोडा बक्षीस देईन आणि वरती माझी बाघणपाटी राजपाटीच्या खालीं आहे ते शेत बक्षीस देईन. अंकुशा सापडू दे म्हणजे दाखवतो त्याला."

" खरं बोलतोस ? "

" चल, आज लेख करून देतों सुभानरावाकडं. सगळीकडं दौंडी पिटवून जाहीर करतों."

तात्याच्या तोंडाला पाणी सुटलें.

" पण काय रे समना, बाप्पाजींनीं येवढा पैसा आणला कुठून ? "

" अरे त्याचा सगा मोठा आहे."

" तो सगळा साहेबी थाट."

" मग कुणीं दिला त्याला येवढा पैसा ? "

" अरे तुझाच."

" म्हणजे ? " समनाला तात्याचें छद्मी बोलणे समजेना.

" अरे अकुशा आहेना बाप्पाजींचा हस्तक ? तुझे दागिने आता मुंबईत वटले गेले तेव्हा पैसा उभा राहिला. नाहीं तर येवढी मोठी रक्कम कुठून आली एकदम ? "

" ते पण खर आहे. पण बाप्पाजीला म्हणाव तू खूप ध्यानांत ठेव कीं, मी मारवाड्याचा बच्चा आहे. तू माझे दागिने नेलेस, पण मी याचा वचपा काढीन."

" काढलास ! राजपाटी सुटल्यावर ! बाप्पाजी सांपडणार तुझ्या हातात."

" तात्या, मीं आधींच काढला आहे त्याचा वचपा. तुझी सून बाप्पाजींच्या लेकानं उपटली म्हणून तू जळतोस बाप्पाजींवर, म्हणून तूं असल्या गोष्टी करतोस."

" काय काय, साग तर खरं."

" तुम्हाला सागून काय उपयोग ! तुम्ही आणि ते एक. पण तात्या, तूं चल माझ्याबरोबर फौजदाराकडं. मी बक्षीस जाहीर करतो."

मग ते दोघेजण फौजदार सुभानरावाकडे गेले. सुभानराव, जमादाराला एका जाहीरनाम्याचे कागद देत होता.

" प्रत्येक गावांत एक एक प्रत डकवा आणि महारांकडून दौंडी पिटवा. शेटजी, तात्या, जो कोणी अंकुशाची बातमी सांगून त्याला पकडून देईल त्याला सरकार पाचशें रुपये रोख, एक पिस्तुल आणि एक घड्याळ बक्षीस देणार आहे."

" पिस्तुल वापरण्याचा परवाना मिळेल ? " तात्यांनीं विचारलें.

" अहो पिस्तुलाचा काय पण तोफेचा परवाना मिळेल. देतां पकडून ? तुम्हाला मी रावसाहेब करीन. शेटजी, तुम्ही रायसाहेब व्हाल. "

विनोदी सुभानराव तेवढ्यांत आपल्या जिवाची करमणूक करू लागले.

" मी तेवढ्याकरिताच आलों आहें. माझ एक हजार आणि एक रुपयाचं बक्षीस, आणखी वरती मी माझ बांधण शेत बक्षीस देईन अकुशाला पकडणाराला. करा जाहीर. "

" द्या लिहून आणि सरकारी तिजोरींत पैसे भरा. " हर्षानें सुभानराव उद्गारले. कारण त्याना अंकुशा केव्हा सापडतो असें झालें होतें.

त्या दिवशीं घरीं जाऊन एकातात तात्यानीं डबीभर तपकीर संपवली, पण त्याना अंकुशाला कसे पकडता येईल याची युक्ति सुचली नाहीं. त्यांचा राजपाटीचा डाव हुकल्यामुळे अकुशाला पकडून पैका व सन्मान मिळवण्याची महत्त्वाकाक्षा फोफावली.

अकुशाला पकडण्याकरिता सरकारचे व समनाचे बक्षीस जाहीर झालें आहे, ही बातमी अकुशाला रानात कळल्याबरोबर तो रानात खळ्या काढूं लागला. त्यानें रानसईला व आजूबाजूला निरोप पाठवले कीं, ' सरकारच्या बक्षिसीऐवजीं मीच तुम्हाला बक्षीस देईन. कोणी माझ्याविरुद्ध गेलें कीं तुमचीं गांवे लुटून घरें पेटवून देईन. '

अंकुशाचा दम खोटा नव्हता. आतापर्यंत त्याच्या टोळींत पंचवीस गडी दाखल झाले होते. पावसाळा सपल्याबरोबर त्याने काळा कडा सोडला व तो सराईच्या खलाटींतून हिंडू लागला. लोकानीं अकुशाचे भयामुळें रात्रीचीं खळीं काढण्याचीं सोडलीं. अंकुशा आता भुरटा दरोडेखोर राहिला नव्हता. त्याचा जमाव वाढल्यामुळे तो रोज नवीं नवीं धाडसे करूं लागला. त्याने लाब लाब जाऊन डाके मारण्यास सुरवात केली. ' वनचा राजा ' होऊन कातोड्यांचे राज्य स्थापन करण्याचें वेड अंकुशाचे डोक्यात शिरलें. सुभानरावनीं पण आपल्या फोर्सची संख्या वाढवली व पुन्हा पोलीस व अंकुशा यांच्यांत सामना सुरू झाला. बाक्षिसाच्या आशेनें अंकुशाच्या वास्तव्याच्या बातम्या सुभानरावला रोजरोज येऊं लागल्या, परंतु अकुशा त्यांच्या हातीं लागला नाहीं.

अंकुशाची धामधूम चालू असताना रानसईत दुसरी एक भानगड सुरू झाली. लाडीचा नवरा मेल्याची बातमी आल्या दिवसापासून तुकारामाचे डोक्यात म्होतुराचें वेड पुन्हा शिरले. त्याने दीपाजीला खूप पैसा देऊं केला. दीपाजीला वाटले कीं, लाडीने कबूल केले तर आपला काळ तरी फिरेल. तो पण लाडीच्या मागें लागला. बयनें तिची पुष्कळ विनवणी केली, धाकदपटशा दाखवला, तरी लाडी कशाला दाद देईना. अखेर दीपाजी म्होतुराकरिता लाडीला छळू लागला. अकुशाला ही बातमी रानात लागली, तेव्हा त्यानें दीपाजी व इतर गांवकऱ्याना निरोप पाठवला कीं, 'तुम्हीं तुकारामाला गावाच्या बाहेर काढला नाहींत तर एक दिवस मी डोंगर उतरून खालीं येईन.' त्याने तुकारामाला निरोप पाठवला कीं, 'तू लाडीशीं म्होतुर लावलास तर मी तुला ठार मारीन.'

याच सुमारास रानसईतील काहीं इसमाना अकुशा रानांत स्वयपाक करताना आढळला. त्यानीं ती बातमी सुभानरावला दिली. त्या दिवशीं अकुशा पकडलाच जावयाचा, पण थोडक्यात निसटला. आपल्या रानसईचे लोक एकदोन सोडून आपल्या विरुद्ध पोलिसला बातमी देणार नाहीत, ही अंकुशाची खात्री होती. परनु त्यानीं बक्षिसाच्या लालचीनें त्याच्याशीं दगा केला असे जेव्हा त्याला कळले तेव्हा त्याचें पित्त खवळले. त्याने बाप्पा-जींच्या व लाडीच्या घराशिवाय सर्व रानसई लुटून फस्त करण्याची व सराईचीं उभीं पिके व खळ्यावरच्या उडव्या दिवाळीच्या अवसेच्या दिवशीं पेटवून द्यावयाच्या अशी प्रतिज्ञा केली. कड्यावरून आरोळ्या मारून त्याने आपली धमकी ठाकरामार्फत रानसईकराना कळवली. रानसईचे लोक लटलट कापू लागले. अकुशाच्या शौर्यामुळे त्याचा पोलिसावर विश्वास राहिला नव्हता. एक एक दिवस कमी होऊन दिवाळीची अवस जवळ येऊ लागली, तसा अकुशाचा निरोप येई. 'आज पाच दिवस राहिले. उद्या-पासून चार दिवसानीं मी येईन.' चाराचे तीन, दोन अन् एक झाले, दिवाळीची अमावास्या उगवली. पोलीस देखील बंदोबस्तात राहिले. लोकानीं स्वसरक्षणार्थ गेरूने रंगवलेले सोटे, कुऱ्हाडी, कोयते तयार ठेवले. त्या दिवाळीला रानसईत कुणी दिवाळीचे दिवे देखील लावले नाहींत.

अमावास्येचे रात्रीं लोक लक्ष्मीपूजन आटोपून सराईच्या गारठ्यात

पोटाशीं पाय घेऊन अंकुशाची वाट पाहत जागत राहिले. इतक्यात मधरात टळल्यावर काळ्या कड्यावर पचवीस-तीस टेंबे व पलिते वावरताना रानसई-कराना दिसले. अंकुशा काळ्या कड्यावरून निघाला अशी गोग झाली. रान-सईत कैकाना हिवे भरलीं, कैकाच्या दातखिळी वाजू लागल्या, कैकाचे पाय व कबरा लटकीं पडली. गरिबाची भीति अनाठायी होती. कारण अकुशा त्याच्या वाटेस जाणे शक्य नव्हते. परतु ज्याच्याजवळ थोडेफार डबोले होते ते आपले डबोले लपवून जीव वाचवण्याची पराकाष्ठा करू लागले. अशा धाईत व भीतिप्रद प्रसगात देखील प्रत्येकाचीं निरनिराळ्या तऱ्हेने डोकीं चाललीं. कुणी डबोले घेऊन माळ्यावर लपले; कुणी रिकाम्या कणगींत दडले, कुणी धान्याचे डबे, नाचणीच्या कणग्या, पालथ्या करून त्यात आपला ऐवज ठेवून घराबाहेर पडले, कुणी परसात कुदळी नेऊन अळ-वाच्या खाचेत दागिने पुरले. कुणी ते शेणखईत टाकले. अशा तऱ्हेने गांवातील लोकाची घाबरगुडी उडाली. त्याचीं हत्यारे व सोटे जागचे जागीं राहिले.

सयाजी म्हाताऱ्यानें आपले बोचके घेऊन परड्यातला माच गाठला. माचाखालीं पेंढ्याचा मोठा गळाठा साचला होता. सयाजीनें गळाठा आपल्या अगावर ओढून घेतला व फक्त डोळ्यापुरती फट ठेवली.

इतक्यात समनाच्या कुपणींतून एक चोरटा आला. त्याच्या काखोटीला काहींतरी होतें. तो माचाच्याच बाजूने येऊ लागला. सयाजीच्या अगावरचा गळाठा थाड थाड उडू लागला! ‘आला, अकुशा आला! आपली भरली! कष्टाची कमाई चालली! लावसटपणानें पिकवलेल्या सरायांची साय आता अकुशा खाणार!’ असे विचार सयाजीच्या डोक्यात येतात न येतात तो दुसरा एक चोरटा केसूतात्याच्या घराच्या बाजूने येऊं लागला. समना व केसूतात्या याच्या पिछाडीला सयाजीचे घर होतें व त्याचा माच बरोबर त्याच्या कुंपणाशेजारीं आला होता.

दुसरा चोरटा पण सयाजीच्या माचाच्याच बाजूनें येऊं लागला. त्याचे-जवळ देखील पाठीवर ओझे होते. दोन्ही चोरट्यानीं संगनमत करून सयाजीला लुटण्याचें ठरवले होतें. कारण दोघेहि विरुद्ध दिशानीं नेमका सयाजी जिथें लपला होता तिथें येत होते. ते जवळ आल्याबरोबर, बदुकीं-

सून चुकून गोळी निसटावी, हृदयक्रिया एकदम बंद पडून प्राण पळावेत, तशी हींव भरलेल्या सयाजीचे तोंडातून एक आरोळी निघाली.

" चोय, चोय, चोय. "

" चोय, चोय, चोय. " पहिला चोर ओरडला व काखोटीचा ऐवज खालीं टाकून पळाला. त्याचा खाणदिशीं आवाज झाला.

" चोय, चोय, चोय. " दुसरा चोर ओरडला व पाठीवरचे पोतें खाण-दिशीं टाकून त्यानें विरुद्ध दिशा गाठली. चोर पळूं लागले तसें सयाजी धीर येऊन जरा मोठ्याने गळाठ्यातून ' चोय, चोय, चोय ' करू लागला. त्याचें ' चोय, चोय, चोय ' ऐकून निरनिराळ्या माचाखालून, कुपणीच्या आडून, माळ्यातून खाचा-खळग्यातून ' चोय, चोय, चोय. ' होऊ लागलें. एकमेकाच्या आरोळ्यानीं लोक आणखीच भेदरले. घरें सोडून बाहेर पडलेल्या लोकाना गांवात काय चालले आहे याची काहींच कल्पना नव्हती. त्याना वाटलें अकुशा गांव लुटतो आहे, म्हणून तेहि लोक ' चोय, चोय ' करून आरोळ्या मारूं लागले.

बराच वेळ ' चोय चोय ' केल्यावर आणखी धीर येऊन सयाजीची जीभ वळूं लागली व ' चोय चोय ' ऐवजी ' चोर चोर ' असा स्पष्ट उच्चार येऊं लागला. परंतु सयाजीच्या मदतीला कोणी धावून आले नाहीं.

तसल्या सकटावस्थेत देखील चौकस सयाजीची तीव्र जिज्ञासा जागृत होती. त्याने चोराना पळून जाताना ओळखले होतें. फक्त ज्ञानतंतूच्या प्रतिक्रियेमुळें तो ' चोय चोय ' ओरडत राहिला होता. त्या दोन लोकानीं शेतात काहीं तरी टाकले त्याचा आवाज त्याला आला होता. तें काय आहे हे पाहण्याची त्याला तीव्र जिज्ञासा उत्पन्न झाली. त्याने गळाठ्यातून पाहिलें. वरती आकाशात तारे चमकत होते. काळ्या कड्यावरच्या पेट-लेल्या चुडा खालीं येण्याचे ऐवजीं वर जात होत्या. कुत्र्यासारखा गळाठा बाजूला सारून सयाजी बाहेर पडला व पहिल्या चोरानें जेथे काहीं तरी टाकले तेथे वाकून पाहिले. चांदीच्या डब्यातून दागिने बाहेर पडले होते व त्यात भरघोस पण पाढरूक काहीं तरी चमकत होतें. सयाजीनें उचलून न्याहाळून पाहिले व ओळखले कीं, ती मोठ्या आईची नथ आहे. बाकीचे दागिने मनोरमेचे म्हणून त्याने ओळखलें. त्यानें परमेश्वराचे आभार

मानण्याकरितां वर पाहिलें. आकाशांत सात्याचे तारे मोठ्या आईच्या नथी-सारखे दिसत होते. सयाजीनें आधींच ओळखले होतें कीं, समना तेथें डबा टाकून पळाला होता. मग तो केसूतात्यांनीं काय टाकले तें पाहण्यास गेला. तेथें दागिन्यांचें पोते होतें. त्यात तोंडालाच मारवाडी पद्धतीचे एकदोन डाग सयाजीच्या ओळखीचे निघाले. ते दागिने समनाच्या शेटाणीचे होते.

येवढे पाहून झाल्यावर सयाजी गांवात आला. तो सुभानरावची पार्टी बाप्पाजींच्या आगणात आली होती व लोक पोट धरधरून हंसत होते.

" काय झालं हंसायला ? आम्ही तर मरत होतों. " सयाजी बोलला.

" आता हंसून मरा. " सुभानराव उद्गारले.

" काय, झालं काय ? "

" अहो, डोंगर-कोळी चिंभोऱ्या मारायाला चुडी घेऊन निघाले आणि तुमचा शूर गाव ' चोय चोय ' करून ओरडूं लागला. "

" ते राहूं द्या. पण पच घेऊन माझ्या माचाखालीं चला, आणि मी काय दाखवतों ते जप्त करा. बाप्पाजी, जरा माझ्याबरोबर चला. "

सुभानरावला घेऊन सयाजी माचाखालीं आला व त्याने तेथे पडलेले दागिने सुभानरावला दाखवले. बाप्पाजींनीं आपल्या बायकोची नथ व सुनेचे दागिने ओळखले. सुभानरावने समनाला बोलवून आणलें. 'पोत्या-तील दागिने काहीं गहाणवट आहेत व काहीं आपल्या बायकोचे आहेत. बाकीचे डब्यांतील दागिने आपल्या ओळखीचे नाहींत ! ' असें त्यानें सागितलें.

" अरे, पण हे चोरीचे मनोरमावहिनींचे डाग आणि ही बाप्पाजींची तुझ्याकडं गहाण टाकलेली नथ एके ठिकाणीं आली कशी ? "

" तें बा मला काय माहीत ! बाप्पानें कोर्टांत पैसे भरले त्याचे आधीं सोडवून नेली. "

" अरे, मीं कधीं सोडवून नेली ! " बाप्पाजी ओरडले.

" माझा जमाखर्च बघा. "

" मारवाड्या, तूं बाप्पाजींच्या घरातील चोरीचा माल विकत घेतलास. तुझी गहाणवट नथ त्या डब्यात आहे. " सुभानराव ओरडले. समना लट-लटा कांपूं लागला.

" बाप्पाचं आणि माझं वांकडं आहे. मला गुंतवण्याकरिता नथ सोडवून नाही म्हणतो. "

" सयाजी हे दागिने इथं कुणी टाकले ? "

" फौजदारसाहेब, मी काशीला जाऊन आलो आहे. मला खोटं काहीं बोलता येत नाहीं. हा मारवाडी इकडून आला. त्यान हा डबा टाकला. मीं याला ओळखलं. "

" आणि हे पोतं ? "

" हे केसूतात्यानीं टाकल. यातील हे दागिने केसूतात्यांच्या बायकोच्या अंगावर मीं पाहिले आहेत. "

सुभानरावनीं ते दागिने जप्त केले आणि समना व तात्या याना आपल्या बिऱ्हाडीं बोलवून घेतले. त्यानीं त्याचे एकएकट्याचे निरनिराळे जबाब घेतले. समनानें मनोरमेचे दागिने तानक्याजवळून विकत घेतल्याचे कबूल केलें. सुभानरावनें समनाला घरीं पाठवून दिले. मग तो तात्याकडे वळला.

" तात्या, खरं बोला. तर वाचवीन. " सुभानरावनें आरोळी मारली.

तात्याचा पंचा ओला झाला !

" मीं समनाच्या चोरीचा माल अंकुशाजवळून विकत घेतला. अंकुशा आपल्याला लुटील, चोराचा काय नेम ! म्हणून तो माल व माझे दागिने घेऊन लपवण्याकरता मी सयाजीच्या माचाखालीं गेलों." तात्या कबूल झाले.

" तात्या, तुम्हीं सरकारची कामगिरी केलीत तर मी तुम्हांला वांचवीन. येवढच नव्हे, तर सरकारनें जाहीर केलेलीं बक्षिसें पण मिळवून देईन. "

" आणि रावसाहेबी ! " बाप्पाजींसारखा आपणालाहि सरकारी हुद्दा असावा अशी तात्याची मनीषा होती.

" त्याचा पण प्रयत्न करीन. "

" सागा, वाटेल ती कामगिरी सागा. "

" सांगेन, सबूर. "

त्या दिवशीं राजसबाईचा डोळा चुकवून लाडी मनोरमेकडे आली व गर्वानें म्हणाली :

" माझा मनहरण चोर नाहीं." मनोरमेनें तिच्याकडे एक तीक्ष्ण कटाक्ष फेंकला.

# प्रकरण ३४ वें

## म्होतुर

दुसरे दिवशीं सकाळीं सुभानरावनीं केसूतात्याना बोलावले. त्या वेळीं ते तुकाराम फॉरेस्टरबरोबर कांहीं खलबत करीत होते. तात्या आल्यावर त्यानीं तुकारामला काहीं गुप्त सूचना दिल्या व वाटेला लावले.

"तात्या, तुमचा लाभकाळ जवळ आला आहे. लाडीचा आणि तुकारामचा म्होतुर ठरला आहे. म्होतुर उद्याच्या रात्रीं लागणार. 'म्होतुर होऊ देणार नाहीं.' अशी अकुशाने प्रातिज्ञा केली आहे. उद्याला तुकाराम अकुशाला म्होतुराची सुपारी पाठवणार रानात धवाच्या घरी. मी आज पोलीस पार्टी घेऊन शेजारच्या खोऱ्यात अंकुशाची खबर आली आहे असें मिष करून त्याला पकडण्याकरता जाणार. उद्या दिवे लागल्यावर मी परत येईन व रात्रीं दीपाजीच्या घरासभोवार जाळे धरून बसेन. म्होतुर तिथं लागणार आहे. तुम्ही उद्या सध्याकाळीं काळ्या कड्यावर अकुशाची भेट घ्या व अकुशाशीं दरोड्यातील मालाच्या सौद्याचे बोलण काढा. इतक्यात आम्ही अक्षतीच्या आमत्रणाचं शिग व ढोल गावात वाजवू. ते ऐकलं म्हणजे अकुशा तुम्हांला गावात काय भानगड आहे ते विचारील. तुम्ही त्याला सागा कीं, धवाकडं तुकारामनं तुला म्होतुराच्या आमंत्रणाची सुपारी पाठवली आहे. हें ऐकल्यावर तो खूप रागावेल. त्याला चिडवा व म्होतुर बंद पाडण्याचे त्याच्या डोक्यांत भरवून द्या. युक्तीन वागा आणि प्रसग पडेल तसा बेत ठरवा. मग पुढ तो काय करणार याची आम्हांला खबर द्या. बघा, अकुशा सापडला कीं, तुमचा खटला मी माफ करवतों आणि बक्षिसी पण देववतो."

"मी मुठींत जीव घेऊन जातों, पण आपलं वचन ध्यानात ठेवा."

"हें घ्या वचन."

सुभानरावनें तात्यांच्या हातावर हात मारला.

त्या दिवशीं तुकाराम समनाच्या दुकानीं गेला व त्यानें म्होतुराचे सामान जोरानें खरेदी केलें. दीपाजी पण त्याचेबरोबर होता. तुकाराम

ऐटीनें जरीचा रुमाल बांधून गांवांत हिंडूं लागला. तो लाडीशीं जबरदस्तीनें म्होतुर लावणार, अशी भुमका गांवांत पसरली. दीपाजीनें व तुकारामनें लाडीवर पहारा ठेवला. शेजारच्या गावाला भट राहत होता त्याला आमंत्रण गेले.

दुसरे दिवशीं संध्याकाळचा भट व शिगाडा गुरव आला. संध्याकाळच्या आत तात्यानीं काळा कडा गाठला व अंकुशाची भेट घेतली.

" अकुशा, मी सर्वस्वीं बुडालो रे! तू दिलेले सगळे दागिने पोलिसानीं जप्त केले."

" तात्या, भितोस काय, मी अकुशा जिवंत हाय ना. तात्या, तुझा मला एकाच गोष्टीचा राग होता. तूं बाप्पाजीची राजपाटी विकत घेणार होतास तेव्हढ बरीक खराब काम करणार होतास. पण आता तीबी काळजी गेली. बाप्पाजीनं जमीन सोडवली अस ऐकतो मी. तात्या, आता तू माझ्या जिवावर श्रीमत हो. मणान 'सोनं' घे. दुसरे डाके मारीन ते तुला देईन. तू मला पावसाळ्यात तांदूळ, मीठ, मिरची पुरवलीस. मी कधीं ते विसरणार नाहीं. पण काय रे तात्या, तुकारामचा आणि लाडीचा म्होतुर ठरलाय. मला रानात बातमी आली आहे."

" होय ना."

" मी होऊ देणार नाय म्होतुर." अकुशाने आपली रायफल खडकावर आपटली.

" तुला तर धवाकडं म्होतुराची सुपारी पाठवली आहे तुकारामनं. तुला नाय मिळाली? तुकाराम म्हणतो, 'मी रानसईचा वाघ आहे. एका कातोड्याला भिणार नाहीं. जबरीन ठोकून म्होतुर लावीन लाडीसग.'"

" अर तुक्या! एकदा सुटलास. पोलिसांच्या जिवावर तू मला खिजवतोस काय? तात्या, फौजदार कुठ आहे आज?"

" तो गेला बापदऱ्यात पोलिस-पार्टी घेऊन. तिकडं तुझी खबर आहे."

अकुशा रागात होता तरी हे ऐकून हसला.

" तात्या, म्होतुर केव्हा आहे?"

इतक्यात बापूजीबुवाचे देवळात शिग वाजल.

" हे ऐक. म्होतुराची तयारी झाली. तुक्या आज आपला शब्द खरा

करणार. पांचशें रुपयाचा तर त्यान बस्ता बाधला आहे. पाचशें रुपये रोख तो दीपाजीला देणार आणि शिवाय गांवाला जेवण आणि दारू. गरीब पोर लाडी कशी नक्षत्रासारखी दिसते, पण तो काळा शिद्दी आज तिला उपटणार. बाप तरी असला कसा! पण आपण काय करणार! बाप जिथ बाधील तिथ तिला गेल पाहिजे?"

"बरी जाईल ती लाडीचा भाऊ जिवंत आहे तोंपर्यंत. तुकारामनं जबरीनं म्होतुर लावला तर मी पुन्हा तिला रंडकी करीन, तो काय समजला आहे साला! पण तात्या, तूं मला मदत करशील? का बक्षिसाच्या आशेन देशील पोलिसाना बातमी?" अंकुशा तात्याच्या चेहऱ्याकडे बारकाईनें पाहू लागला.

"व: अकुशा, तू तर माझ फायद्याच कुळ, तुला दगा देऊन मला काय मिळेल! पधराशे रुपये आणि शेत येव्हढ बाक्षिस सरकार आणि मारवाडी मिळून आहे. त्यात सरकारी बाक्षिस तेव्हढ खर. आणि मारवाड्याचं जरी खर धरलं तरी काय तीन हजाराच्या वर शेतासुद्धा रक्कम जात नाही. येव्हढ्यान माझ भागेल? समनासारखं आणखी एक गिऱ्हाईक गाठून दिलंस की माझं भाग्य उगवेल बघ."

अकुशाला तात्याचा कागाव खरा वाटला.

"तात्या, वेणेगावच्या मारवाड्याचे दागिने मीं आणल्यात. ते उद्यां तुला दाखवीन. पण माझं आज काम कर. म्होतुर कोणाच्या घरात लागणार ते मला कळव. पोलीस नसले तर तूं तिथ जाऊन ओरड कीं, 'मला अकुशान धरल' म्हणून. कीं मी देतो ते घर पेटवून. म्हणजे बघतों कसा म्होतुर लागतो ते, पार सगळी तारातीर होईल."

"अकुशा, म्होतुर लाडीच्याच घरीं लागणार. तू लाडीच घर पेटवणार?"

"मग मारामारीची वेळ येणार. पोलीस असोत कीं त्याचा बाप असो, आज मी लाडीला सोडवणार. मुर्दे पडले तरी हरकत नाही. भिऊ नकोस. चल माझ्याबरोबर. भोज्या, धवाकड माझी आवतणाची सुपारी आली आहे, तेव्हढी घेऊन ये."

अकुशा लाडीच्या घरावर हल्ला करणार व सुभानरावच्या सापळ्यात सांपडणार हे पाहून तात्याना आनंद वाटला. आपल्यावरचे किटाळ जाऊन

उलट आपल्याला बक्षिसी मिळणार व आपला नावलौकिक वाढणार ह्याचे त्याना सुखस्वप्न पडूं लागलें. अंकुशा बोलूनचालून कातोडीभाई. त्याच्यावर विश्वास टाकण्यांत अर्थ नव्हता. आज तो एका डाक्यातला माल द्यावयाचा आणि उद्या आपणावर उलटून दुसरा डाका मारून कांहीं असेल नसेल तें घेऊन जायचा ! शिवाय यापुढें पोलिसाची देखील आपल्यावर नजर राहणार. मग आपण त्याचेजवळून चोरीचा माल कसा घेऊं शकू ? आता काहींतरी युक्ति करून अंकुशाला कुठ तरी आपण बसवून ठेवू व सुभानरावला अकुशा कुठ बसला आहे ही खबर देऊ कीं आपला कार्य-भाग झाला–अशा विचाराच्या साखळींत तात्या अकुशाचे मागे चालले होते. तात्याना डोगराची, रानाची चागलीच सवय होती. अकुशा चोर-वाटेने जाळकटातून व सराईच्या गवतातून चालला होता. तरी तात्या त्याच्या बरोबरीनें जात होते. अकुशाचे साथीदार पागून चालले होते.

दीपाजीच्या घरापासून एका हुकीच्या अतरावर एक टेप होता. त्याचेवर अकुशा चढला व हेरून कानोसा घेऊ लागला. सराईचे भात सभोंवार घमघमाट पसरीत होतें. वर आकाशात आणि डोगरावरून तारे चमकत होते. गाव अधारात शात दिसत होता.

" म्होतुराची गडबड लई दिसत नाय. गावात येव्हढ्यान किर्र शात का झालं आहे ? तात्या काहीं दगा नाही ना ? "

" छट् ! सुभानराव बापदऱ्यात गेला आहे. मीं समक्ष पाहिला. पाहिजे तर मी लाडीच्या इथ जाऊन पाहतो. "

इतक्यात लाडीचे इथे कंदील नाचू लागले. दारू प्यालेला तुकाराम ब्राह्मणाच्या अगावर ओरडूं लागला.

" बामण सुस्त हाय. त्याला जरा बेवडा पाजा म्हणजे सुस्ती जाईल त्याची. "

" तुमचाच घोटाळा आहे. मी काय करूं ? " भटजींचा आवाज आला.

" भटजी, मी म्होतुराला कबूल नाहीं. ही जबरदस्ती आहे. तुम्हाला याचा जाब द्यावा लागेल. " लाडी ओरडूं लागली.

" मी पंचवीस रुपये दक्षिणा देईन. पन्नास देईन. शंभर घे. पण आज म्होतुर लागलाच पाहिजे. " तुकाराम दारुड्या आवाजांत बरळूं लागला.

कान टवकारलेला अंकुशा तें भाषण लक्षपूर्वक ऐकूं लागला.

" तात्या, ही माझी घोंगडी पांघर आन् लाडीच्या घरापर्यंत भोज्या-बरोबर जा. कुंपणात घोंगडी टाक अन् मग घरात शिर. पोलीस दडून बसले आहेत का, येव्हढ घरांत पाहून ये. सगळा बेत पहा आणि मला इशारा दे. भोज्या बंदूक घेऊन तुझ्या मागोमाग उभा राहील. जर फितुरी दिसली तर भोज्या, तात्याला गोळी घाल. "

तात्याच्या पोटात चर्र झालें. त्यानीं पोलिसाशी आपण कातोडी घेऊन येणार असा ठराव केला नव्हता. आता कसे करावे? कातोड्याचे हातातून निसटून पोलिसाच्या व्यूहातून कसें बाहेर पडावे? तात्याच्या तोडचे पाणी पळालें. पण करतात काय बिचारे! निमूट घोंगडी पाघरून ते भोज्या-बरोबर चालू लागले. भोज्या त्याना सरपटत चालण्याची सारखी खूण करीत होता, परतु तात्याना ते जमत नव्हतें. तात्या धडपडत चालू लागले. तेव्हा भोज्याने रागाने त्याचा हात पकडला व वाकून दीपाजीच्या कुंपणा-कडे धूम ठोकली. त्या घाईत एक बाध उलटताना तात्या उभे राहिले व एक बार काडदिशी झाला. आवाज न करिता तात्या खालीं पडले. तात्या गोळी लागून खालीं पडले हें पाहिल्यावर भोज्याची सावली कुंप-णाच्या आश्रयाला सरपटत चपळाईनें गेली. तेथे झाडावरून दुसरा बार झाला. सर्व बाजूनीं काडकाड असे बार होऊ लागले. अंकुशा उभा होता त्या टेपाडावर तर लागोपाठ पाचसहा बार झाले.

अकुशा तात्याच्या शब्दावर विश्वास ठेवणार नाहीं, हे सुभानराव जाणून होते. दीपाजीच्या घरावर टेहळी ठेवण्यास जवळची जागा म्हणजे टेप होता. अकुशा बरोबर तिथे येणार हे सुभानरावनीं अगाऊच ताडलें होते. तेथे एक प्रचड धोड होती व आजूबाजूला त्याच धोंडीचे फुटून कोसळलेले बारके बारके अवशेष पडले होते. मोठ्या धोडीच्या खालच्या बाजूने एक खुरटलेले जाभळीचे झाड होते. आडोशाला उभे राहण्यास तें झाड चागलें उपयोगी होतें.

रात्रीं अंधार पडल्यावर सुभानरावनीं त्यातील पाचसात धोंडी लोटून शेजारच्या कुपणांत टाकल्या व त्या जागेवरून अंधारात धोडी दिसतील अशा तऱ्हेनें.कांबळी पांघरवून पोलीस बसवले व आपणहि सहाबारी

पिस्तुल लावून एक कांबळें पांघरून मुरी मारून दगडासारखे पडून राहिले. अंकुशा तेथे आला त्या वेळीं नेहमींप्रमाणे अंधारात दिसणाऱ्या धोंडी त्याला दिसल्या. त्याच्यात कांहीं बदल झालेला त्याच्या लक्षात आला नाहीं. त्यानें आजूबाजूला खूप हेरून पाहिले, पण त्याला धोंडींशिवाय कांहीं आढळले नाहीं. तेव्हा तो सगळ्यात मोठ्या अशा धोंडीवर जाऊन बसला व भोज्या ज्या बाजूला गेला त्या बाजूकडे एकाग्रतेनें पाहू लागला. इतक्यांत पाठोपाठ दोन बार झाले.

पहिल्याच बाराला सुभानरावने अंकुशावर झडप टाकली. अंकुशा शूर होता, परतु कातोडी पद्धतीने लढाई देण्याचे टाकून तो सुभानरावच्या हातून निसटून जाण्याचा प्रयत्न करू लागला. परतु सुभानरावने अशा तऱ्हेने पोलीस बसवून ठेवले होते कीं, अकुशा कुठूनहि निसटू नये. चपळाईने अकुशा सुभानरावला झटका मारून पळू लागला. ती जागा अडचणीची होती. तेथे सुभानरावनीं एक पोलीस बसवून ठेवला होता. त्याने अकुशाचे डोक्यात बदुकीचा दस्ता मारला, त्याबरोबर अकुशा खालीं पडला. अकुशा खालीं पडल्याबरोबर लाब अधारात उभे असलेले त्याचे साथीदार त्याला सोडविण्याकरिता धावून आले. त्या वेळीं सुभानरावने आपले पिस्तुल चालवले. पोलिसांनी बदूका झाडल्या. कातोड्याच्या जमावात एकच बदूक होती. पण सुभानरावने त्या कातोड्याला गोळी घालून बदूक हस्तगत केली. या झटापटींत तीन कातोडी जागच्या जागीं ठार झाले. एकदोन पोलिसाना जखमा झाल्या. दुसऱ्या बाजूलाहि कातोड्याच्या झटापटी झाल्या, त्यात दोन कातोडी ठार झाले. भोज्यासुद्धा एकंदर सहा कातोडी ठार झाले. तात्या चुकीने मारले गेले, एका पोलिसानें कातोडी समजून त्याच्यावर बार काढला. सहा कातोडी मेले, नऊ कैद झाले, बाकीचे पळाले. सुभानरावने अंकुशा व इतर कातोडी याना डबल बेडी चढवली व तात्या आणि भोज्या याचा बोजा बाप्पाजींच्या अंगणात आणला. तात्याच्या बरगडींतून गोळी आरपार गेली होती. भोज्याचा मेंदुच बाहेर पडला होता !

बार ऐकून गांवांतील व म्होतुराला जमलेले लोक म्होतुर सोडून अकुशाला पहावयाला धांवले. म्होतुर तसाच राहिला. आपल्यामुळें

अंकुशा सांपडला असें लाडीला कळलें तेव्हां ती बिचारी रडूं लागली. तिला असाहाय स्थितींत सांपडलेल्या अंकुशाला तोंड दाखवतां येईना.

सुभानराव दीपाजीच्या इथें गेला व म्होतुर तसाच थांबवला. ' लाडी सज्ञान आहे तिचा म्होतुर तिच्या संमतीवांचून होणार नाहीं, ' असें त्यानें भटजीला कळवलें. वास्तविक लटक्या म्होतुराचे नाटक सुभानरावनें कल्पकतेने रचलें होतें. त्यात त्याने फक्त तुकारामालाच विश्वासांत घेतलें होते. अकुशा कधीं पकडला जाईल असें त्याला झाले होते. त्याने सुभानरावची कामगिरी करण्याचें आनंदानें कबूल केले. इतर लोकाच्या मते म्होतुर खरोखरीचाच होता. तुकाराम या घालमेलीचा फायदा घेऊन कदाचित् जबरदस्तीनें लाडीबरोबर खरोखरीचा म्होतुर लावील म्हणून साध्या पोषाखात सुभानरावने दोन पोलीस लाडीच्या मदतीकरता ठेवले होते. तुकारामाचा अकुशावर पक्का राग होता, तेव्हा त्याने दारू पिऊन म्होतुराचें नाटक सुभानरावच्या कल्पनेपेक्षा जास्त यशस्वी करून दाखविलें.

---

# प्रकरण ३५ वें

## पुनर्मीलन

अकुशाला व त्याच्या साथीदारांना सुभानरावनें नीट बंदोबस्तांत तालुक्याच्या तुरुंगांत पाठवून दिले. अकुशाचा आधार गेल्यावर त्याचे बाकीचे साथीदार सुभानरावाला एकामागून एक मिळाले. कांहीं पाठलाग करून पकडावे लागले. बाकीचे स्वत: होऊन सुभानरावपुढें हजर राहिले. तरी या धराधरीनें त्याचे दोन महिने घेतले. मग सुभानराव निरनिराळ्या दरोड्यातील मालांची यादी करणें, त्याचे मालक शोधून आणवणें, चार्जशीट्स् तयार करणे या उद्योगाला लागले. शिवाय समनाने व तात्यानीं चोरीचा माल विकत घेतला ते खटले त्याचेमागे होतेच. तात्या मयत झाल्यामुळे त्याचा खटला निकालात निघाला. पण समनावर सुभानरावाला खटला भरावा लागलाच.

यदा रानसईची सराई रेंगाळत चालली होती. तात्या वारले म्हणून सराई गोळा करण्याला त्याच्या पश्चात् विनोबाशिवाय दुसरे कोणी मोठे मनुष्य त्याचे घरात नव्हते. आणि विनोबाला तर शेतीचे ज्ञान नव्हते. मनोरमेने सराईचीं कामें जोराने आटोपलीं, पण मनोहर नसल्यामुळे तिला पण उत्साह नव्हता. निव्वळ कर्तव्य म्हणून ती व्यवहार पाहत होती. राजपाटीची कापणी यंदा तिनें स्वत: बाधावर उभे राहून केली! मुकुट लढाईत मारला गेला, अशी बातमी आल्यामुळे सयाजी पण खिन्न होता. लाडी मनोहरकरिता आणि अकुशाकरिता दु:ख करीत होती. निराश्रित भिवरींची स्थिति तर फारच केविलवाणी झाली. पाठीशीं पोर बाधून ती खळीं झाडून उपजीविका करीत होती. याप्रमाणे कोणालाच या सालच्या सराईचे दिवस रम्य वाटत नव्हते. सृष्टिदेवीनें मात्र आपली कामगिरी दरसालप्रमाणे बजावली होती. भाताचा रंग दरसालप्रमाणें पिवळा होता. कुरडूचीं फुले दरसालप्रमाणे होतीं. फुलपाखरे दरसालप्रमाणे भाताच्या सुवासाच्या दरवळीने उडत होतीं. होले, पारवे सराईच्या शांततेंत घुमत होते. मोर ओरडत होते. बुलबुल, काळे पक्षी गात होते. चास तळपत होते. सराईचें निळे आकाश डोंगरावर वितळत होतें. सृष्टीच्या कार्यक्रमात कांहीं फरक नव्हता.

अंकुशा, त्याचीं साहसें, त्याचे धिप्पाड साथीदार, रानसईचे दरोडे, लाडीच्या म्होतुराची रोमांचकारक हकीकत यांची भडक वर्णनें वर्तमानपत्रांत आलीं. तीं मनोहरने वाचलीं. मनोहरनें त्या वेळीं वऱ्हाडात एका दूरच्या गांवीं शाळामास्तराची नोकरी धरली होती. वर्तमानपत्राचा अंक वाचल्यावर त्याला गेले सालचे सराईचे रम्य दिवस आठवले व आपण कधीं रानसईला जातो असें त्याला झालें. त्यानें रजा घेतली व तो रानसईला येण्याकरिता निघाला.

इकडे अकुशाला पकडले त्या दिवसापासून समनाला व तुकारामला हर्षाच्या उकळ्या फुटल्या. समनाने तुकारामला भिवरीच्या विरुद्ध उठवले. यंदा सराईच्या खलाटीची राखण तानक्यानें केली म्हणून शेतकऱ्यानीं राखणीचा भारा त्याला दिला. नाहीं तर सराईला भिवरीला शभर भारे मिळाले असते. तुकाराम आता पूर्वीसारखा जगलातून निर्भय हिंडू लागला. त्यानें भिवरीला काचणींत धरले. तो तिला रानात एक काटकी मोडून देईना. अशा हलाखींत ती दिवस काढूं लागली. त्यात तिला मलेरिआ लागला व शिवाय मुलाला अंगावर पाजावे लागे त्यामुळे ती अगदीं थकून गेली.

एक दिवस मनोहर रानसईला संध्याकाळचा आला व टाकुरवाडीत धवाच्या घरीं वस्तीला राहिला. त्याने लाडीला निरोप पाठवला कीं, "तू मनोरमेला घेऊन रात्रीची ये. मी काळ्या कड्यावर तुमची वाट पाहत आहे."

मनोहर काळ्या कड्यावर जाऊन उभा राहिला. त्याच्या अंगात निळ्या सर्जचा कोट होता, परतु त्याला कारवीच्या फुलाचा गध नव्हता. तो जुना कोट त्यानें गौरीच्या दिवसात अकुशाच्या अगात त्याची थंडी निवारण्याकरिता घातला होता. हा कोट मनोहरने हुबेहूब पहिल्या कोटासारखाच बनवला होता. कारण मनोरमेला तसल्या रंगाच्या कोटाची आवड होती.

यंदा कारव फुलली नव्हती. परंतु इतर सुगंधानीं काळ्या कड्यावर सुवासाचे ब्रह्माड निर्माण केलें होतें. वद्य पक्षातील चंद्र काळ्या कड्यावर कैलासपर्वताचे शिखराप्रमाणे झळकूं लागला. काळ्या कड्यावरून चद्राचे किरण भैरवाच्या सोडींतून अशा रीतीनें पडले होते कीं, चादण्याचा एक बिन आवाजाचा धबधबा तेथे निर्माण झाला आहे असा भास होई.

लाडीचा प्रणय आठवीत व त्याची मनोरमेच्या प्रेमाशीं तुलना करीत तो ही सृष्टिशोभा पाहण्यात गुंग झाला. इतक्यांत लाडीनें त्याच्या खांद्याला स्पर्श केला. तिला दम लागला होता. ती त्याचे अंग चाचपून पाहू लागली. तिनें त्याच्या गळ्यावरून, हातावरून, पायावरून हात फिरवला व ती रडू लागली.

" लाडे, रडतेस का? आणि हे असं काय करतेस?"

"मला वाटल तुम्हाला कुणीं तरी कांहीं केलं, कुणीं मारलबिरलं! तुमचा असा दुसरा कोट होता?"

" हो. तो मीं एकाला देऊन टाकला आहे. पण लाडे, तुला दम किती लागला आहे."

"मी पळतच आलें. मला वाटल कोणीं तुमचा खून केला. मला चढण टाकताना पख लावावेसे वाटले."

" अस काय करतेत, वेडी कुठली! मनोरमेला का नाहीं आणलीस तू?" मनोहरनें तिला प्रेमाचे प्रश्न केले.

" ती माझ्याशीं बोलत नाहीं. मी पण तिच्याकड जात नाहीं."

" कारण?"

" गौरीच्या रात्रीं तुम्हीं गेलात त्या दिवशीं आम्ही दोघीजणी तुम्हाला शोधीत पावसात इथ आलो, तेव्हा तुम्ही घरीं मनोरमेच्या खोलींत पत्र लिहीत होता. आम्हीं परत आलो तों तुम्ही गेला होता. तुमच पत्र आम्हाला टेबलावर मिळाल. त्याच वेळेला वहिनीबाईंचा दागिन्याचा डबा गेल्याच आढळून आल. त्यानीं तुमचा संशय घेतला. त्या म्हणाल्या कीं, 'मी किल्ली चोरकप्प्यात ठेवते ती तुमच्याशिवाय कुणाला माहीत नाहीं'".

हें ऐकून मनोहर खिन्न झाला.

" मनोरमेला मीं चोरी केली असा संशय आला?" त्याने खात्री होण्याकरिता पुन्हा विचारले.

" हो."

" त्यावरून तुमचं भाडण झाल?"

" होय."

" तूं काय म्हणालीस तिला ? " मनोहरला जिज्ञासा उत्पन्न झाली.

लाडी लाजली. तिने एक गोड मुरका मारला व मनोहरच्या खिशातील रुमाल काढून त्याच्याशीं खेळत ती गुपचिप उभी राहिली.

" साग ना ? " मनोहरने तिचे दोन्ही हात ओढले.

रुमाल काढल्याबरोबर तिला लव्हेंडरच्या सुगंधाचा भपकारा त्या रानच्या सुगधात आला. त्यामुळें तिच्या काळ्या कड्यावरील पहिल्या रात्रीच्या आठवणी जाग्या झाल्या. ती प्रेमभराने त्या रुमालाचा वास घेऊ लागली.

" मी म्हणाले, 'माझा मनहरण चोर नाहीं. तुमच्यापेक्षा मला त्याची अधिक माहिती आहे'. "

मनोहरने तिला दृढ आलिगन दिले. काळ्या कड्यावर प्रणयाची रात्र केव्हा सपली व पहाट केव्हा झाली हे दोघाना कळले नाहीं. पहाटे मनोहर परत जाण्याकरिता निघाला. त्याला मनोरमेचा मनस्वी राग आला होता. ती भेटली नाहीं म्हणून मनातून त्याला आनद वाटला.

" लाडे, मी आज जातो. मला रजा नाहीं. मला घाईन गेल पाहिजे. मी ही मास्तरकीची नोकरी सोडणार. मला हजारीबागच्या खाणीवर मोठी नोकरी मिळणार आहे. ती नोकरी मिळाली कीं—

" मला नेणार ? "

" तुला मी बरोबर घेऊन जाणार. " मनोरमेचा त्याग करून लाडीच्या प्रणयमधुर सहवासात आयुष्य घालवावयाचा त्याने कृतनिश्चय केला.

मनोहरने लाडीचा निरोप घेतला व तो कडा वेंघूं लागला. लाडी घरीं जाण्याच्याऐवजीं रानात शिरली व फाटी तोडण्याचा बहाणा करूं लागली. त्या दिवशीं तिने दुप्पट वजनाची फाटी घरीं नेली. कैक दिवसानीं तिची वदनश्री फुलली व ती पहिल्यासारखी टवटवीत दिसूं लागली. मनोरमेला लाडीनें संध्याकाळीं मुद्दाम खळ्यावर गाठलें.

" काय ग फारशी हंसतेस माझ्याकड पाहून ? " मनोरमेनें तिला विचारलें.

" वहिनीबाई, आनंद वाटला कीं हसूं येतेंच. "

" पण तुला हर्षवायु कसला झाला आहे ? आनंद तरी कसला वाटतो ? "

" आपण ज्याच्याकरता झुरतों ते मिळालं म्हणजे आनंद नाहीं का वाटणार, वहिनीबाई ? "

" म्हणजे ? " मनोरमेचा चेहरा उतरून गेला.

लाडी हसें दाबून तिच्याकडे गर्भित अर्थानें पाहूं लागली. मनोरमेचा चेहरा गोरामोरा होऊं लागला. तिला वाटले लाडी आपणाला बोलण्यांत दुसरा अर्थ दाखवून मुद्दाम खिजवीत आहे. मनोरमेच्या लक्षात हा दुसरा अर्थ यावयाला वेळ लागला. परतु लाडीच्या बोलण्याचा हा दुसरा अर्थ आहे असें समजल्यावर तिला जरा बरेच वाटलें.

" अहा ग ! तूं तशीच आहेस नीतीची. पण तू तशी नसतीस तर अशी स्थिति आलीच नसती तुला. मला नव्हत वाटलं तूं इतकी बदलशील. "

" वहिनीबाई, एकदा चुकणं आणि दहादा, शभरदा चुकण सारखच !"

" चल चालती हो. मला तुझ तोड दाखवू नकोस. "

रागवण्याऐवजीं लाडीनें हसण्याची लकेर मारली व ती काळ्या कड्या-कडे पाहत निघून गेली. त्या वेळीं फॉरेस्टचे लोक तिला वाटेत भेटले.

" लाडे, सकाळीं तू रानात गेलीस तेव्हा तुला तुकाराम भेटला ? " फॉरेस्टच्या लोकानीं तिला विचारले.

" मला भेटण्याचं कारण ? आणि मला तुम्हांला विचारण्याचं कारण?" लाडी रागावून बोलली.

" तस नाहीं लाडे ! तुकाराम रात्रीपासून फॉरेस्ट-चौकीत नाहीं. त्याचे घरात रक्ताचे डाग पडले आहेत. आम्हीं त्याचा रानात शोध केला. पण त्याचा पत्ता लागत नाहीं. तो तुझ्या माग आहे. तूं सकाळीं रानात गेली होतीस, तेव्हा साहजिक आम्हाला वाटल सकाळीं तो तुझ्या माग रानात गेला असेल. रागावू नको ह. "

" नाहीं बाई, तुमच्या तुकारामच नखसुद्धां दृष्टीस पडल नाहीं माझ्या." लाडीला तुकारामचे नवऱ्याइतकेंच शुभाशुभ होते.

———

# प्रकरण ३६ वें

# रानसईंत खून

रानसईंत जिकडे तिकडे गोंग झाली कीं, कुणी तरी रात्रीं तुकारामचा खून केला. सुभानरावाना आणखीं एक नवी कामगिरी आली. त्यानीं सर्व रानें तपासून पाहिलीं, परतु तुकारामचा कुठे मागमूस मिळाला नाहीं. त्यांनीं विहिरी, तळीं, नदीचे डोह तपासले. गावोगाव माणसें पाठविलीं, परतु चहूंकडून नन्नाची बातमी आली. तुकारामाचा मुर्दा कुठच मिळाला नाहीं. रानात कुठे घारवटसुद्धा पडले नाही. तुकारामचा खून केला कोणीं? सुभानरावने खूप डोकें खाजवलें. त्याच्या वाईटावर फक्त अकुशा, पण तो तुरुगात गेलेला. तेथून तो खून करणार कसा? तो तर चोवीस तास पोलिसाच्या पहाऱ्यात. सुभानरावाला मोठें कोडे पडले. लाडीच्या भानगडीवरून तुकारामाचा द्वेष करणारा दुसरा इसम म्हणजे मनोहर. पण तो गावात आज कैक दिवस नाहीं. मग हा खून केला कोणीं? तुकारामाचे प्रेत सापडल्याशिवाय काहीं तपास लागणे शक्य नव्हते. कारण तुकाराम मेला, कीं कुठें निघून गेला, हें देखील काहीं निर्णयात्मक ठरले नव्हते.

माघाच्या महिन्यात एक कुत्रे रानातून काहींतरी गुडाळलेल्या बोचक्यासारखा जिन्नस तोडात धरून गावाच्या शेतोड्यात आले. त्याच्यामागें गावचीं दुसरीं कुत्रीं लागलीं. गावची कुत्रीं रानातून आलेल्या कुत्र्याचा पाठलाग करूं लागलीं. रानातलें कुत्रे तोडांत बोचके धरून पुढे पळे! गावचीं कुत्रीं त्याची पारध करीत. जणु त्याचा शिवाशिवीचा खेळ चालला होता! तीं कुत्रीं खूप न ठाण्या ार गावांत शिरलीं. त्याची गावात मोठी खादाखाद झाली. लोकानीं ती सोडवली. तेव्हा रानातून आलेले कुत्रे तोडातील जिन्नस टाकून पळून गेले. तो जिन्नस वेलींनीं बोचक्यासारखा बाधला होता. लोकानीं तो सोडून पाहिला, तर त्यातून सुदर सर्जचा एक कोट निघाला. त्याचा कपडा रक्तामुळे घड्याघड्यातून चिकटला होता. सर्व कोट रक्ताच्या डागानीं भरलेला निघाला. कोटाच्या पाठीची बाजू देखील रक्तानें माखली होती. रक्त वाळून गोठले होतें. सुभानरावनीं तो कोट जप्त केला. त्यांना त्यावरील रक्त मनुष्याचें असावें असा संशय आला. त्यानीं कोटाची चौकशी चालवली. पुष्कळानीं तो कोट मनोहरचा आहे म्हणून ओळखलें. नंतर त्यानीं कोट मुबईस केमिकल ॲनलायजरकडे रक्ताच्या तपासणीकरिता पाठवला. दरम्यान त्यांनीं आपला तापास चालू ठेवला.

त्यानीं सर्व पोलीस-स्टेशनाना मनोहरचें वर्णन लिहून पाठवलें व पोलीस गॅझेटमध्ये त्याचा फोटो प्रसिद्ध केला. दरम्यान त्यानीं मनोहर आला होता किंवा नाहीं याची चौकशी चालवली. मनोहर आल्याबद्दलचा त्याना कुठेहि छडा लागेना. त्यांनीं कातोडी, ठाकूर, महार व रानसईतील शेतकरी तपासून पाहिले, पण त्याना कुठे तलास लागेना. अखेर आधरतच्या ठाकुरवाडीपासून लाब अतरावर राहणाऱ्या धवा ठाकराची त्यानीं जबानी घेतली. त्याने 'मनोहर कार्तिकाच्या महिन्यात आपल्या झोपडींत रात्रीं वस्तीला आला होता. आपण त्याचा निरोप रात्रीं लाडीला जाऊन सागितला' वगैरे मजकुराचा जबाब दिला. 'रात्रीं मनोहर कुठे होता, त्याने काय केले, लाडी काळ्या कड्यावर आली होती किंवा नाहीं, मनोहर रानसई सोडून केव्हा गेला वगैरे गोष्टी आपणास माहीत नाहींत' असे त्याने सुभानरावला सागितले. मनोहर नक्की कोणत्या दिवशीं आला, तो वार किवा मनोहर तुकारामचा खून झाला त्या दिवशीं किवा खुनाच्या आधीं किवा मागून आला हे पण त्याला नक्की सागता येईना. 'ठाकूर खरे बोलतात; प्राणातीं ते खोटे बोलत नाहींत,' असा त्याचा लौकिक आहे. त्यामुळें धवाचा जबाब खरा आहे, असें सुभानरावनीं गृहित धरलें.

"मनोहरने कोणत्या रगाचा आगरखा घातला होता?" सुभानरावने धवाला विचारले.

"मोरावाणी रग होता बघ फौजदारा मनुदादाच्या डगल्याचा. नदीच्या काठीं खंड्यापक्षी राहतोना त्याच्यासारखा पण दिसत होता करी." धवानें उत्तर दिलें.

"तो आगरखा लोकरीचा होता की सुती होता?"

"ते बा मला काय माहीत? ठाकराची जातच वेडी. त्याला काय कळत येव्हढ तुमच्यावाणी." धवाने उत्तर दिले.

त्याच दिवशीं केमिकल ॲनलायजरचा सुभानरावाना रिपोर्ट आला कीं, 'तुम्हीं पाठवलेल्या कोटावरचे रक्त मनुष्याचे आहे.' रिपोर्टासोबत कोटहि परत आला. सुभानरावानीं तो कोट धवाला दाखवला.

"धवा, हा कोणाचा कोट आहे?" सुभानरावानीं विचारलें.

" हाच, हाच डगला होता मनुदादाच्या अंगात त्या दिवशीं. "

धवाचा जबाब झाल्याबरोबर सुभानरावानीं लाडीची साक्ष घेतली.

मनातून लाडी घाबरली होती. ती कपित हृदयाने सुभानरावाकडे आली. बाह्यात्कारी ती निर्भय आणि शात दिसत होती. बचावाकरिता शक्ति व चापल्य एकवटलेल्या वाघिणीप्रमाणें, आपली यौवनानें रसरसलेली देहाकृति सावरीत, सौंदर्याच्या मदानें सावकाश पावले टाकीत, प्रेमाच्या प्रसन्नतेनें गालातल्या गालात हसत, ती सुभानरावकडे प्रणयाच्या तंद्रींत डुलत आली. तिने त्या म्हाताऱ्यावरून आपले काळेभोर डोळे दिमाखात फिरवले व त्याचा अंदाज घेतला. ती एका विवक्षित तऱ्हेनें चापून-चोपून अशी वेषभूषा करून आली होती. सुभानरावाच्या डोळ्यातून ती गोष्ट निसटली नाहीं. ते तिच्या वेषभूषेकडे बारीक नजरेने पाहत राहिले. जमादाराला वाटले कीं, म्हातारा चळला. या फाकडू पोरीने आपल्या अमलदारावर जाद केली.

" तुकाराम नाहींसा झाला त्या रात्रीला तू कुठ होतीस ! " सुभान रावानी तिला प्रश्न केला.

" तुकाराम केव्हा नाहींसा झाला हेच मुळीं मला माहीत नाहीं, तर मी काय सागू? रात्रीची मी नेहमींप्रमाणे घरींच असते. रातची मी कुठं जाणार बापाच घर सोडून ? "

त्याबरोबर सुभानराव चरकला. म्हाताऱ्याने तिच्याकडे खोचून पाहिले व मनाशी खूणगाठ बाधली कीं, रानसईच्या ह्या विषकन्येनें आपल्या बारशाच्या घुगऱ्या खाल्ल्या आहेत. इथे पाणी ओड आहे. इथे जपूनच वागले पाहिजे. त्याने लाडीच्या नजरेला नजर दिली. त्या पोरीच्या नजरेत त्याला मृत्यु भरलेला दिसला. प्रेमाखातर ही पोर आपल्या काळजाचा घड आपल्याच हाताने उपटून तळहातावर घेऊन ती आपल्या प्रियकराच्या मागे भटकत दुनिया पालथी घालील असे त्याला वाटले. जेथे असले प्रेम आहे तेथे म्हातारा फौजदार काय करील ? त्याने लाडीशीं बेताने घ्यावयाचे ठरवलें.

" तुकाराम नाहींसा झाला त्याचे दुसरे दिवशीं सध्याकाळीं तुला फॉरे-स्टचे लोक भेटले होते. त्यानीं तुला तुकारामाबद्दल विचारले होते." लाडीला जबाबात पकडली या हर्षाने सुभानरावानीं विचारले.

" 'तुला सकाळीं फारिस्टात तुकाराम भेटला का ?' म्हणून त्यानीं मला

एके दिवशीं विचारलें. रात्रीची गोष्ट काढली नाहीं." क्षणाचा विचार न करता निर्विकार चेहऱ्याने लाडीनें बाजू उलटवली. त्यामुळे सुभानराव चडफडला.

" परतु तुकाराम नाहींसा झाला ही गोष्ट तुला माहीत होती ?"

" पण दिवस माहीत नव्हता."

" हे पहा लाडे, मनोहरला त्रास होऊ नये म्हणून मी तुला विचारतो. तू खर सागून टाक. त्या रात्रीं मनोहर तुला काळ्या कड्यावर भेटला काय?"

" अगदीं खरं सागते, मीं त्याना मनान वरल आहे. तेव्हापासून मी त्याची स्त्री म्हणून वागत आले. आमच्या लग्नाच्या पहिल्या दिवशी हा कोट त्यांनीं अगात घातला होता. त्याला कारवीचा मध लागला आहे. वास उडून गेला तरी मधाचे डाग दिसतात अजून त्याचेवर. असले छप्पन कोट त्याच्याजवळ आहेत. कैक त्यानी आपल्या गडीमाणसांना बक्षीस दिले आहेत. आणखी माहिती काय पाहिजे तुम्हाला?" तेथे पडलेल्या मनोहरच्या कोटाकडे पाहत लाडी फर्ड्या बॅरिस्टरप्रमाणें सुभानरावची थिअरी खोडून काढूं लागली. सुभानराव तिच्याकडे कौतुकानें पाहत राहिले.

" लाडे, मी तुला कोटाबद्दल विचारीत नव्हतों. मनोहर त्या रात्रीं तुला काळ्या कड्यावर भेटला का ?"

" भेटला म्हणून सागितलें कीं ते सुटतील का ? त्याना तुकारामचा खून करण्याचं कारण काय ?"

" तू मला प्रश्न विचारू नकोस. माझ्या प्रश्नाचं उत्तर दे."

" मी त्या रात्रीं काळ्या कड्यावर गेलें नाहीं."

" धवा मनोहरचा निरोप घेऊन तुझ्याकडं आला होत ?"

" नाही."

" धवा सागतो."

" धवा खोटं बोलतो."

" ठाकुराला खोटं बोलण्याच कारण काय ?"

" त्याची चौकशी तुम्ही करा, मला काय सागतां येईल ?"

" तू दुसऱ्या दिवशीं उजडत काळ्या कड्याखालीं फाटी तोडीत होतीस. येवढ्या लवकर रानात तूं कशाला गेली होतीस?"

" मीं दुप्पट मोठा भारा आणला त्या दिवशीं. माझा पुरावा घ्या. तुमच्या फारिस्टाच्या लोकांनाच विचारा. "

" लाडे, तूं मोठी चतुर आहेस; पण आणखी काहीं दिवस जाऊं देत; मी तुला पकडीन. माझी नजर अजून शाबुत आहे. " लाडीकडे तीव्र नजरेनें पाहत सुभानराव बोलले.

लाडीचा चेहरा खर्रकन उतरला. पण आपल्या मनाला सावरून ती बोलली :

" मी तुमच्या गुन्ह्यात सापडले तर तुम्ही मला पकडाल. माझ्या खाजगी गोष्टीची चौकशी तुम्ही का करता ? "

" मग तू कबूल करतेस कीं, तू पोटशी आहेस म्हणून ? " विजयानें सुभानराव लाडीकडे पाहू लागले.

लाडी अधोवदन होऊन गप्प बसली.

" पोरी, उगीच लपंडाव खेळू नकोस. सांग पाहूं हो कीं नाहीं ? "

" हो. " लाडीनें नजर वर न करता उत्तर दिलें.

" मनोहरपासून ? " सुभानराव फासेपारध्यासारखा उत्तराची वाट पाहू लागला.

" जगात तेच तेव्हढे पुरुष आहेत ? "

सुभानरावचा जबडा पडला.

" मग कोण ? " सुभानरावनें हताश होऊन विचारलें.

" तुकाराम. "

सुभानराव प्रथम त्या उत्तरानें आश्चर्यचकित झाला; पण त्याला पुन्हां एक कल्पना सुचली.

" मनोहरला हाच संशय आला म्हणून त्यानें रागानें तुकारामचा खून केला. "

लाडीनें आपल्या लकेरीची तान मारली, त्यामुळें सुभानराव दचकला.

" बायकांच्या गोष्टी तुमच्यासारख्या वृद्धाला कळत नाहींत, मग मनोहरला कशा कळणार ? या गोष्टीला दिवस किती झाले, आणि मीं स्वतः होऊन सांगितल्याशिवाय त्याना ही गोष्ट कशी कळली असती ? शिवाय त्यामुळें तुमचा तर्क चुकतो तें निराळेंच. "

सुभानरावनें त्या विषकन्येसमोर हार खाल्ली.

---

## प्रकरण ३७ वें

# द्वंद्व

तुकारामच्या खुनाच्या खटल्यात सुभानरावांनीं लाडीची जबानी घेतल्यावर रानसईत तिच्याबद्दल कुतूहल उत्पन्न झाले. तिनें पोलिसला काय सांगितलें हे जाणण्याची प्रत्येकाला जिज्ञासा उत्पन्न झाली. तिच्या शब्दांवर मनोहरचे प्राण अवलंबून राहणार म्हणून तिला महत्त्व आले. तिनें खंद्या सुभानरावला दाद दिली नाहीं, म्हणून लोक तिचें कौतुक करू लागले. मनोरमेला तर लाडीला आपण केंव्हां भेटतो व सगळ्या गूढाचा खुलासा विचारतों असे झालें. एक दिवस तिने लाडीला शेतावर एकांतात गाठलें.

" लाडे, तुझ्या मनात तरी काय आहे?" मनोरमेनें लाडीला विचारले.

" म्हणजे, माझ्या मनात काय असायच ? "

" तिकडच जीवित तुझ्या शब्दावर आहे. तू त्यांना वाचवणार कीं नाहींस ? तूं काय जबानी दिलीस ? "

" मी कोण त्याची ? तुमच्यासारखं त्याच माझ नात आहे ? आणि माझा शब्द तुम्ही खरा मानणार ? त्यावर विश्वास ठेवणार ? बोलूनचालून मी कुलटा ! मला नीति नाही. मी घसरलेली ! "

" लाडे, एक दिवस मी रागात तुला तसं बोलले, पण तू ते विसरून जा. मला खरं खर साग. त्या दिवशीं ते रानसईला आले होते ? "

" तुम्हाला सागून काय उपयोग ? लाडी तुमच्यासारखी नीतिमान् होऊन खर बोलली कीं सर्व काम फसेल. "

" म्हणजे ? ते आले होते ? "

" नाहीं. "

" लाडे, तू सुभानरावला फसवूं शकलीस, पण मी स्त्री आहें. तूं मला फसवू शकणार नाहींस. तुला दिवस गेले आहेत. "

लाडी हंसली.

" वहिनीबाई, आतां तर ती गोष्ट जगजाहीर झाली आहे. गांवाच्या आधीं सुभानरावने ते ओळखलें व त्या मुद्यावर त्यानें माझी जबानी पण घेतली. "

" याचा अर्थ ते इथं आले होते ! " मनोरमेने अधीरपणानें विचारलें.

लाडी डोंगरामागे असलेल्या डोंगराच्या ओळींकडे पाहत हसूं लागली. तिनें मनोरमेला उत्तर दिले नाहीं.

" अशा वेळीं तुला हसू तरी कसं येतं ? मला माहीत आहे तूं कां इंसतेस ती. "

" का ? "

" स्त्रीचरित्र. स्त्रीचरित्रामुळे तुला गर्व झाला आहे. "

" नाहीं मत्सर, असूया. स्त्रीचा मत्सर पाहून मला हसू आलं. "

" मी तुझा मत्सर करते ? अगदीं खोट आहे. माझ्या मनातसुद्धा नाहीं. "

" तो मत्सर गुप्त आहे. तुम्हाला कळतसुद्धा नाहीं. मला तुमच्या पती-कडून गर्भसभव झाला आहे या गोष्टीमुळे अशा प्रसंगातदेखील तुम्हांला खेद कसा होतो ?'

" नाहीं, बिलकुल नाहीं." मनोरमा इनकार करू लागली.

लाडी तिच्याकडे पाहत हसत राहिली.

" सुभानरावजवळ तू कबूल झालीस ? " विचार करून मनोरमेनें विचारले.

" हो !" लाडीने बेछुटपणाने उत्तर दिले.

" कुणामुळं राहिला म्हणून सांगितलस ? "

" तुकाराम. " कठोर हृदय करून लाडीने उत्तर केले.

मनोरमा दगडासारखी निश्चल होऊन लाडीकडे निर्भर्त्सनेनें पाहूं लागली.

" वहिनीबाई, तुम्हांला आश्चर्यस वाटल ? बोलूनचालून मी कुलटा ! माझा राग का करता ? तुमच्यासारखं आमचं प्रेम असू शकेल काय ? आपल्या नवऱ्याला एका कुलटेनं फसवलेलंदेखील तुम्हाला चालत नाहीं. इतकं तुमचं प्रेम गाढ आहे. "

मनोरमा क्रुद्ध झाली.

" ही गोष्ट त्याच्या लक्षांत आली म्हणून त्यानीं तुकारामचा खून केला." विगलित स्वरानें मनोरमा बोलली. तिचा आत्मविश्वास नष्ट झाला.

" वहिनीबाई, सुभानरावनं देखील मला हाच प्रश्न केला. पण तुम्ही स्त्री आहात, तुम्ही कसा असा प्रश्न करता ?"

"लाडे, मी तुझ्या पायां पडतें, पण मला खरं साग. त्यांनीं मला टाकून दिलं, तुला जवळ केलं तरी चालेल. मी तुझी बटीक होईन. तूं सागशील तें करीन, परंतु मला खरी गोष्ट साग. त्याचे प्राण वांचतील अशी काहीं तरी गोष्ट साग. मी आणि माझ्या भावांनीं वकील देऊन त्यांच्या बचावाची तयारी केली आहे. वकील म्हणतात, ते स्वतः होऊन हजर राहिले म्हणजे त्याच्याकडून माहिती घेऊन काहीं तरी करता येईल. ते जर लवकर सापडले नाहींत तर त्याच्याबद्दल कोर्टाचं मत दूषित होईल. तेव्हां तू खरं साग, तुला ते खुनाच्या दिवशीं भेटले काय ?"

लाडीनें एकाग्र होऊन विचार केला. मनोरमा तिच्याजवळ उभी राहून तिला प्रश्न विचारीत आहे ही गोष्टदेखील ती विसरली.

"हो, ते त्या दिवशीं काळ्या कड्यावर आले होते." लाडीने एकएक शब्द उच्चारीत उत्तर दिलें.

"हल्लीं कुठ आहेत ते ?"

"बिहारमध्यें हजारीबागच्या कोळशाच्या खाणींवर."

"ते त्या दिवशीं रानसईत केव्हा आले ?"

"सध्याकाळीं."

"गेले केव्हा ?"

"पहाटे."

"तूं केव्हा भेटलीस ?"

"मध्यान्‌रातची."

"म्हणजे खुनाचा आळ त्याच्यावर येतो."

"कसा ?"

"त्यांचं तुकारामबरोबर तुझ्यावरून वाकडं. ते खुनाच्या दिवशीं कुणाला न कळत रात्रीचे रानांत येतात; तुझ्याशिवाय कुणाला न कळत पहाटे जातात; त्या रात्रीं तुकाराम नाहींसा होतो; मनुष्याचे रक्तानं माखलेला त्यांचा कोट रानात सापडतो; आणखी काय पुरावा पाहिजे ?"

"रात्रभर ते आणि मी जवळजवळ होतों."

"तुला ते भेटण्याचे आधीं खून झाला असेल !"

" वहिनीबाई, तुमचं माणूस तुम्ही ओळखीत नाहीं, मग त्याला मी काय करूं ? "

" लाडे, स्पष्ट बोल. माझा अंत पाहूं नकोस. "

" खून करून ते धवाबरोबर तुम्हांला आणि मला बोलावणं पाठवतील ?"

" मला त्यांनीं बोलावलं होतं ? "

" हो. तुम्हाला येतांना बरोबर घेऊन ये, असा त्यानीं धवाबरोबर मला निरोप पाठवला होता. "

" चांडाळणी, मग मला तूं कळवलं कसं नाहींस ? " मनोरमा पुन्हां क्रुद्ध झाली.

" स्त्रीची दुष्ट बुद्धि ! "

" त्यांचे अगात कोणता कोट होता त्यावेळीं ? "

" निळा. "

" त्याचेवर काहीं रक्त दिसल तुला ? "

" वहिनीबाई, वेड लागलय तुम्हाला, तुम्ही तुमच्या पतींचा संशय घेता तें. माग मीं तुम्हाला सांगितलं कीं, माझा मनहरण चोर नाही. तेव्हा माझा शब्द खरा ठरला. आतां पण मी तुम्हाला सागतें तुम्ही माझ्या शब्दावर विश्वास ठेवा, ते खुनी नाहींत. "

" लाडे, तुझ्या तोंडात साखर पडो ! पण हे किटाळ आहे म्हणून काळजी वाटते. "

" यात काहीं अर्थ नाहीं. हे किटाळ निघून जाईल, माझी खात्री आहे."

मनोरमेने डबडबलेल्या डोळ्यानीं लाडीच्या गळयात हात घातला व ती स्फुंदत म्हणाली :

" लाडे, मला तू क्षमा कर. मीं तुला अद्याप ओळखलं नाहीं. माझ्यापेक्षा तुझा स्वार्थत्याग जास्त आहे. त्याना वांचवण्याकरतां तू तुकारामाचं नांव घेत आहेस. स्त्रीजातीला सहन होणार नाहीं असा घाणेरडा आळ आपल्या अंगावर ओढून घेत आहेस. "

आतां मात्र लाडीला आपल्या मनोवृत्ति दाबता येईनात. ती ढसढसा रडूं लागली. मनोरमेनें तिला खूप रडूं दिलें. मग ती जेव्हा आपोआप शांत झाली तेव्हां मनोरमेनें तिला प्रश्न केला :

" लाडे, तू म्हणतेस ते निर्दोष आहेत हें तुला पक्क माहीत आहे, अर्थात् खुनी मनुष्य कोण आहे हे पण तुला ठाऊक आहे. तू त्याला वाचवीत आहेस. "

" नाहीं, नाहीं. मला माहीत नाहीं." लाडी भावनातिरेकाने ओरडली.

" खास तुला माहीत आहे. तू त्याचे नाव सागून टाक म्हणजे त्याचा गळा मोकळा होईल. "

लाडी शून्य नजरेने मनोरमेकडे पाहू लागली. ती सवेदनातीत होती.

" लाडे, न्यायाला मदत कर. खरं साग. त्यानीं हा खून केला नाहीं तर कोणीं केला ? लवकर साग. बोल. माझे प्राण कासावीस झाले आहेत. "

" वहिनीबाई, मला छळू नका. [illegible] मला जास्त त्रास होतो ! "

" नाहीं, लाडे, तुला कल्पना नाहीं. बोल, लवकर बोल. बोलत का नाहींस ? तुला माझ्या गळ्याची शपथ आहे. त्याच्या गळ्याची शपथ आहे. त्याना किती त्रास होईल तुला कल्पना आहे ! माझी गुणाची कशी, सांगून टाक पाहू. "

" वहिनीबाई, माझा अत पाहू नका, मला विचारू नका. मला आता तुमचे प्रश्न सहन होत नाहींत. "

लाडी मनोरमेच्या प्रश्नांच्या माऱ्याने व्याकूळ झाली. ती दयेकरिता मनोरमेकडे पाहूं लागली. मनोरमेला मनोहराशिवाय जगात दुसऱ्या कोणाची किंमत नव्हती. ती काय लाडीची पर्वा करणार !

" त्याच्याशिवाय तुला आणखी कोणी प्रियकर आहे ? " मनोरमेनें लाडीवर आघात केला.

लाडीचा चेहरा रागाने लाल झाला. तिच्या डोळ्यात तिची सर्व प्राणशक्ति एकवटून चकाकू लागली. तिने इतक्या जोराने ओंठ दाबला कीं, तो फुटून त्यातून रक्त निघालें. मनोरमेला वाटले ती आता तिच्यावर प्रहार करणार. पण लाडीनें राग आवरला. त्या वृत्तिक्षोभामुळें लाडी बेशुद्ध होऊन खालीं पडली.

# प्रकरण ३८ वें

## कोड्याचें उत्तर

आपल्या एकुलत्या एक मुलावर खुनासारख्या आरोपाची तोहमत येत आहे हे पाहून बाप्पाजींची कंबर खचली; राजसबाईनीं इथरूण धरलें. सुभानरावानीं जरी मनोहरचा कसून शोध चालवला होता तरी त्याना अद्याप त्याचा पत्ता मिळाला नव्हता मनोरमेला लाडीकडून मनोहरचा पत्ता मिळाल्याबरोबर तिने आपल्या भावाला हजारीबागला वकिलाचा सल्ला घेऊन गुपचिप पाठवलें. मनोहरने आपण रानसईला खुनाचे दिवशीं आलो होतो हे स्वतः होऊन कबूल करावयाचें नाहीं असे वकिलानीं ठरवलें. लाडी कधींहि फुटणार नाहीं अशी मनोरमेनें वकिलाना खात्री दिली. मनोहरविरुद्ध धवाचाच पुरावा जरा बिकट होता. मनोहर कार्तिकाच्या महिन्यात रानसईला आला एवढेच धवा सागत होता. नक्की वार किंवा दिवस त्याला आठवत नव्हता. त्यामुळे त्याच्या पुराव्याला विशेष महत्त्व राहिले नव्हते. म्हणजे आता मनोहरविरुद्ध पुरावा राहिला फक्त कोटाचा. त्या पुराव्याची पण गमतीदार रीतीने वासलात लागली व सुभानराव पुन्हा बुचकळ्यात पडले.

मनोहर वकिलाच्या सल्ल्याप्रमाणे तालुक्यात हजर झाला व सुभानरावांनीं त्याला अटक केली. त्यानीं जेव्हा त्याची जबानी घेतली तेव्हा 'आपण रानसईला पावसळ्यात एकदा आलो होतो, नक्की वार आठवत नाहीं, त्याचप्रमाणे आपण हिंदुस्थानात सारखे हिंडत असल्यामुळे कोणत्या दिवशीं कुठे होतो हें पण सागता येत नाहीं' असे सागितले. सुभानरावानीं त्याला निळा कोट दाखवला तेव्हा 'मी गौरीच्या दिवशीं हा कोट अकुशाला बक्षीस दिला, त्याला धवा साक्षीदार आहे. हा कोट अंकुशाला दिल्यानंतर मीं असाच दुसरा कोट पुण्यात त्याच शिंप्याकडून बनवून घेतला. तो कोट मी हजर करीन.' असा जबाब दिला व दुसरा निळा कोट पण हजर केला. धवाच्या जबानीनें मनोहरच्या जबानीस दुजोरा दिला. पुण्याच्या शिंप्यानें दोन्ही कोट ओळखले व आपण मनोहरला एक गौरीच्या आधीं व एक नंतर शिवून दिल्याचें कबूल केलें.

सर्जचे दोन निळे कोट मनोहरजवळ होते असें शाबीत झालें व कोटाचा पुरावा ढासळूं लागला. मनोरमेची आशा पालवली. पुराव्यांतील रक्तानें माखलेला निळा कोट मनोहरचा खरा पण तो त्यानें खुनाच्या आधीं अंकुशाला बक्षीस दिला होता. तेव्हां एक तर अंकुशा तरी खुनी आहे किंवा त्याला बक्षीस दिलेला कोट अंगांत घालून दुसऱ्या कोणीं तरी तुकारामचा खून केला असला पाहिजे. परतु अकुशा खुनाचे दिवशीं व वेळीं पोलिसाच्या अटकेत होता. तेव्हां आता हा खून केला कुणीं? म्हाताऱ्या सुभानरावची कामगिरी वाढू लागली. त्यानीं अकुशाचा कोटाबाबत जबाब घेतला. अंकुशानें साफ कानावर हात ठेवले. खुनाचे आधीं भिवरी चारच दिवस तुरुगात अंकुशाला भेटली होती. सुभानरावानीं तिचा पण जबाब घेतला. कातोडी पद्धतीप्रमाणें तिने साफ उडवाउडवीचीं उत्तरे दिलीं आणि सुभानरावची आतापर्यंतची खटपट वाया गेली. खुनाचा खटला फसतो आहे म्हणून सुभानराव चिंतातुर झाले.

इतक्यात सुभानरावला बातमी मिळाली कीं, हजारीबागला जाण्याचे आधीं मनोहर वऱ्हाडात बुलढाण्याला इग्रजी शाळेत मास्तर म्हणून नोकरीला राहिला होता. तेथे चौकशी करता मनोहरनें खुनाच्या आधीं आठच दिवस रजेकरिता शाळेला अर्ज केला होता, असे आढळून आले. 'मला रानसईला घरच्या मडळींना भेटावयास जावयाचे आहे.' असे त्याने रजेकरिता कारण दिलें होते. खुनाच्या आधीं बरोबर तीन दिवस त्याने बुलढाणे सोडले होते. मनोहर रानसईला आला होता ही गोष्ट पुराव्याचे दुवे सुभानरावला पटापट मिळून निर्विवाद शाबीत होऊं लागली. मनोहरभोवतीं पुन्हा ढग जमू लागले. लाडी घाबरली व आतापर्यंत शात ठेवलेला तिचा चेहरा पार उतरून गेला. ती रोज कातोडवाडींत खेऱ्या मारू लागली व भिवरीची भेट घेऊ लागली. एकदोन वेळा तिचे व भिवरीचे भांडण झालेले लोकानीं पाहिले. ही गोष्ट जेव्हा सुभानरावला कळली तेव्हा सुभानरावांनीं दोघींच्या हालचालींवर गुप्त हेराची पाळत ठेवली. कारण त्याला वाटलें या दोघींच्याजवळ कांहींतरी पाणी मुरत आहे. एके दिवशीं त्या दोघींचे काळया कड्यावर पुन्हा भाडण जुपले.

"मीं मस्त सागून पाहिल त्याला पण तो ऐकत नाय. तो म्हणतो

माज्या जिवापरीस काय नाय." भिवरी हेकट आवाजांत लाडीला सांगूं लागली.

"त्याला म्हणावं, तूं बाप्पाजींची क्रिया धर."

"तें पण मीं त्याला सांगितलं कीं तूं बैमान होऊं नकोस म्हणून. तू तीन दिवस उपाशी होतास तेव्हा वहिनीबाईनीं एका रातीं तुला पुढ्यांतलं ताट दिलं तें आठव, आणि तिला चुडेदान दे. तरी तो नायच म्हणतो."

"भिवरे, तूं त्याला नीट समजावून सांग कीं, तू आम्ही सागतो तसा कबुलीजबाब दे. 'मी ते काम रागाच्या भरात केलं' असं तू सांगितलस म्हणजे तुला फार झाल तर पाच-दहा वर्षांची सजा होईल. फार झालं तर जन्मठेप काळें पाणी होईल. दहा बारा वर्षांनीं तू सुट्टून येशील. पण मनोहरवर आरोप शाबीत झाला तर तो फांशीं जाईल."

"लाडूबाई, मीं माझी शिकस्त केली. तो म्हणतो मनोहर, वहिनीबाई आणि बाप्पाजी माझ कोन? मी काय त्याच लागतो. माझ्या परीस अधिक काय नाय."

"पण तू पुन्हां एकदा प्रयत्न करून पहा."

"मीं नुकतीच त्याची भेट घेतली. जेलर मला परवानगी देणार नाय"

"जाऊन पहा तर खरी."

याहि संभाषणाचा रिपोर्ट सुभानरावाकडे आला; परतु सुभानरावाना अर्थबोध होऊन खुनाचे कोडे सुटेना. तथापि या संभाषणावरून काही तरी छेडा लागणार अशी त्याची मनोमन खात्री झाली. त्यांनीं लाडी व भिवरी याच्यावरची गुप्त पोलिसाची पाळत आणखी दृढ केली. त्यानीं जेलरला गुप्तपणें कळवले कीं, "भिवरी अकुशाला भेटण्याकरिता जेलमध्ये आली तर तुम्ही हरकत घेऊ नका; तिला भेटीची परवानगी द्या. मी येत आहें."

ठरल्याप्रमाणे भिवरी तालुक्याच्या जेलमध्ये गेली. सुभानराव तिच्या पाठोपाठ होताच. जेलरने सुभानरावाच्या हिकमतीप्रमाणे अंकुशा-भिवरीची भेट करवली. सुभानराव आडून ऐकू लागले.

"अकुशा, वहिनीबाईनीं तुला शेत कबूल केलय. तू ते म्हणतील तसा जबाब दे. आपल्या पोराबाळाना जन्माची भाकर—जन्माची जहागिर व्हईल."

" तरतर, मी कबूल होऊन फांशी जाऊं! म्हजे तूं होशील मोकळी तानक्याबरोबर म्होतुर लावायला. तुला काय! तूं माझ्या मरणावर टपलीस. "

" तुला फाशीं व्हणार नाहीं. तू मरणार नाहीस. कार झाल तर होईल तुला पाचदहा वरसाची सजा. "

" मला सजा ! बरी होईल! मी काय कुणाचा गुन्हा केला? मी काय केल हाय येव्हढी सजा व्हायला? उगीच कुठ दोनचार मारवाड्याचीं नाकं कापलीं न् पांच-सात दरोडे घातलेन्. जास्त काय केलय मीं? चोऱ्या तर आपण जन्मापासून करतो. व्हईल मला सजा दोनतीन वर्षाची. मी वनचा राजा रानात कातोड्याचं राज सुरू करनार म्हून साहेब माझ्यावर लई खुष आहे. मला काय बघ म्हगतो तो. राबिन् राबिन् !"

" हां हा, राबिन् हुड. तुझा खटला चालला त्या दिवशी मीं ऐकलं. तुला तो राबिन् हुड म्हगतो." भिवरीने त्याला आठवण करून दिली.

" हा बराबर. राबिन् हुड! साहेबान मेमसाहेबाला जेलमध्ये आनली न् गजातून मला दाखवल कीं ' तो बघ जंगलचा राजा.' मेमसाहेबानं माझा फोटु बी घेतला आहे. साहेबाचा पटवाला मला म्हगतो, ' मारील साहेब तुला फार झाल तर दोन–चार वर्साची सजा! माफीचं दिवस मिळून तू येशील दोन-तीन वरसात सुटून. "

" तूं सुटून येशील? मग आपण संग सग रानसईच्या हिऱ्या रानातून हिंडू हातात हात घालून न् अगाला अग लावून. " भिवरी हर्षाने बोलली.

" भिवरे, मी सुटून आलो कीं रानात मी करीन शिकार भेकराचीन् चितळाची, नायतर सशाची, आन् मग चकमकीन पाचोळ्यात इस्तु करून तुला देईन त्याच उन्हउन्ह काळीज भाजून. " अंकुशा गजाला धरून देहभान विसरून बोलू लागला. त्याला वाटले आपण तुरुगात नसून रानसईलाच आहोंत.

" मग तू न् मी डव्ह उपसून काळ नदीला मासे मारूं. तूं सुटून तर ये, मी तुला आख्खी बेवड्याची बाटली देत जाईन रोज. " भिवरी अंकुशाचें स्वप्न पुरें करूं लागली.

" भिवरे, ही सराई, त्याच्या म्होरली सराई अन् त्याच्या म्होरल्या

सराईला मी सुटंन. मग आपण सराईच भात गोळा करू खलाटींत. मातर तू फितूर होऊं नकोस व्ह. ”

“ नाय व्हनार. ”

“ शेताला लाचावूं नकोस. ”

“ नाय लाचावणार. आपल्याला बाप्पाजीच शेत नको अन् पोत नको. बाप्पाजीला काय सुख आहे शेतापुन? गावची निमी शेती हाय एकल्याची, पन त्याला सुख नाय. ” कातोड्याचा बाणा भिवरींत जागा होऊ लागला.

“ आन् भिवरे, कातोड्याला करायच हाय काय शेत न् पोत? समदी खलाटी त्याचीच हाय. तिच्यात बार मास पिकते त्याची सराई. रान, नदी, समनाचं कोठार अन् खळ्यावरल्या उडव्या हेच आपल शेत. ”

“ आपल्याला काय करायाच दुसरं शेत. कुळव्यान बारा महिनं कष्ट करावेत न् कातोड्याची सराई पिकवावी. ”

“ भिवरे, माझ्या भेकरे, रानकोबडे, आता कशी बोललीस? कुळव्यानं सराई पिकवावी आणि कातोड्यान ती राजासारखी खावी. ”

अंकुशा व भिवरी हसू लागली. त्याना क्षणभर वाटले आपण रान-सईच्या डोंगरी खलाटींतच आहोंत. जेलच्या भेटीचा वेळ संपला तेव्हा भिवरी जावयास उठली.

“ भिवरे, मी सुटून येईपोतर तानक्याबरोबर म्होतुर लावू नकोस. ”

भिवरीच्या डोळ्यात अश्रू उभे राहिले. तिने आपल्या पोराला गजाच्या फटींतून अंकुशासमोर धरलें. अकुशाने पोराचा जोरानें गालगुच्चा घेतला.

“ कातोड्याच्या सोरा, रडलास तर मारीन बघ. ” अकुशा हसत बोलला. ते पोर केकाटल नाहीं. “ हा, खरा कातोडी हाय. ” अकुशाने प्रसन्न होऊन गजाच्या फटींतून पोराचा मुका घेतला.

“ अकुशा, मी याची आन खाते . . . ”

“ भिवरे, भिवरे, मला ठाव हाय समदं; तू तोंडान बोलूं नकोस. तूं जिवाला कष्ट करू नकोस. लाडीला मी इचारलंय म्हणून साग. ”

अकुशाने गळ्यात उठलेला आवढा गिळला. भिवरीचा कठ दाटला. कातोडी आणि कातोडीण याचें प्रेम पाहून आइून ऐकणारे सुभानराव-देखील सर्द झाले.

सुभानरावांनीं आड्न अकुशा-भिवरीचं सगळं संभाषण ऐकल तरी तुकारामाच्या खुनाचें कोडें त्याना सुटले नाहीं. अंकुशाने खरोखरीचा खून केला असून लाडी मनोहरला वाचवण्याकरितां अंकुशाला कबुलीजबाब देण्याची तसदी करीत आहे, किंवा मनोहरवरचा आळ आपल्यावर ओढ्न घेण्याकरतां अंकुशाला मनोरमा शेताची लालूच दाखवीत आहे याचा सुभानरावाना काहींच निर्णय लावतां येईना. 'खरा खून कोणीं केला' हा त्यांचा प्रश्न जेथें होता तेथेच राहिला. खुद्द अकुशानें कबुलीजबाब दिला असता कीं, 'मीं तुकारामचा खून केला आहे' तरी सुभानरावानीं त्याच्या शब्दावर विश्वास ठेवला नसता. त्यानीं अकुशाला वेडे ठरवलें असते. कारण पोलिसाच्या अटकेंतून, तुरुगाच्या बंदोबस्तातून, अकुशा खून करणार कसा? याच सशयानें सुभानरावानीं तुरुगातली अकुशाची कोठडी बारकाईनें तपासून पाहिली होती व गज हलवले होते, परतु अकुशाने कोठडी फोडल्याचे किंवा गज काढल्याचे त्यांना कुठेंच आढळून आलें नव्हते. सुमानरावची अक्कल गुग झाली. त्याना ते महान् कोडे सुटेना. त्यांनीं भिवरीवरील व लाडीवरील आपली पाळत चालू ठेवली.

तालुक्याहून अकुशाची तुरुगात भेट घेऊन भिवरी परत रानसईला आली तेव्हा लाडीनें तिची भेट घेतली. सुभानरावाचा मनुष्य आड्न ऐकू लागला.

"काय, होतो कबूल?" लाडीनें उत्कठेने विचारले.

"नाय होत. मला तर त्याचा मनाशीं राग आला आहे. तो म्हणतो, साहेब त्याच्यावर खूष आहे. तो त्याला शिक्षा माफ करणार हाय. याला शिक्षा माफ कोण करील?" भिवरी कातोडीपद्धतीने लाडीसमोर कपट-नाटकाचा रग आणू लागली. कारण अकुशाचे भाषणाने तिचा बक्षीस मिळणाऱ्या शेताबद्दलचा मोह नाहींसा झाला होता. जगात कोणाशीं बाधील रहावयाचे नाहीं, ही कातोड्याची स्वातत्र्यप्रिय वृत्ति तिच्यात प्रदीप्त झाली होती.

लाडीचा चेहरा उतरला. तिच्या तोडाला कोरड पडली.

"मग?" तिने व्याकूळ होऊन विचारले.

"तुमी शाप जबाब द्या कीं, त्या दिवशीं रात्रीं मीं त्याला रानांत पाहिलं. त्याच्या अंगांत मनुदादाचा कोट व्हता, आन् त्याचेवर रगताचे

डाग व्हते म्हणून." लाडीचा अंदाज बघण्याकारितां भिवरी मिस्किलपणानें बोलली व तिच्याकडे रोखून पाहू लागली.

लाडी विमनस्कतेनें हंसली.

"आतां माझा जबाब खरा कोण मानील ? मी मनोहरला वाचविण्या-करिता एकदा खोट बोलले. आता तें जुळलं नाहीं म्हणून मी दुसऱ्यावर आळ घेत आहे असं ठरेल."

लाडीच्या बोलण्याने भिवरी संतुष्ट झाली व लटक्या रागानें ती अकुशाला शिव्या देऊं लागली.

"माझा नवरा तसाच हाय, मेल्याचा मुर्दा कसा नाय पडत. मेला खाल्ल्या अन्नाला जागत नाय."

याहि सभाषणाचा रिपोर्ट सुभानरावकडे गेला. या सभाषणावरून त्याची खात्री झाली कीं, खुनात अंकुशाचें अग आहे, पण हे सिद्ध होणार कसें ? त्यांची मति कुंठित झाली. त्यांनीं पुन्हां लाडीचा व भिवरीचा जबाब घेतला. अकुशाला पण त्यानीं तुरुंगांत तपासलें. परतु त्या तिघांनीं पूर्ववत् आपल्या कानाबर हात ठेवले. आपण तुमचें संभाषण आडून ऐकलें असून आपणांस सर्व कांहीं कळले आहे असें सांगून सुभान-रावाना त्यांची वाट आडवता आली असती. पण मग त्यांनीं या विषयावर बोलण्याचें सोडून दिलें असतें व पुढेंमागें त्याच्या सभाषणातून खुनाचा एखाददुसरा दुवा मिळण्याचा जो सभव होता तोहि हातचा गेला असता. या फिकीरींत सुभानराव पडले. त्याना जरी खुनाची बातमी लागली तरी त्याचे खुनाचे कोडें सुटलें नाहीं. खुद्द अंकुशानें जर तुकारामचें कुठंतरी रानांत पुरून ठेवलेलं प्रेत रानातून काढून दिलें असते तरच त्यांचा प्रश्न सुटला असता व अकुशावर आरोप शाबीत झाला असता.

आरोपीला मारपीट करून कबुलीजबाबावर गुन्हे शाबीत करणारा फौजदार सुभानराव नव्हता. सुभानराव मोठा युक्तिबाज होता. तेव्हां आतां पुढें काय करावें याचा ते जोरानें विचार करूं लागले. तेव्हां त्यांना युक्ति सुचली. कैलास पर्वतावर बसून पार्वतीशीं विनोद करतांना जसे गगाधर हंसले असतील त्या थाटांत ते स्वत:शीं मोठ्यानें हंसले. ते तावडतोब तालु-क्याला गेले व प्रातासमोर अंकुशाच्या खटल्याचें काम चाललें होतें त्याना

अर्ज करून अंकुशाला तुकारामाच्या खुनाच्या खटल्याबाबत तपासाकरितां मागून घेतले. अंकुशाचा ताबा मिळाल्यावर सुभानरावांनी त्याला खोद-खोदून विचारण्यास सुरुवात केली.

झोंप न मिळाल्यामुळे अंकुशा त्रासून गेला. परंतु अद्याप तो टिकून होता. त्याने सुभानरावला कबुलीजबाब दिला नाहीं तथापि सुभानरावानीं त्याचा पिच्छा सोडला नाहीं. एके दिवशीं पहाटे सुभानरावानीं अकुशाला रात्रींतून आठव्या खेपेने जागे केले व तुरुगातून जबाबाकरितां आणले.

" अंकुशा, आम्हाला आतां पुरावा मिळाला आहे की तूं तुरुगांतून रानसराईला गेला होतास. रानात तुला एका इसमाने पाहिले." सुभानराव बोलण्याचे थाबून अकुशाचा चेहरा बारकाईने पाहू लागले. अकुशाचा चेहरा निर्विकार राहिला.

"अकुशा, तो इसम नव्हता. बाई होती." सुभानरावानीं राक्षसासारखी आरोळी मारली. "खर बोल," सुभानराव अंगात आल्याप्रमाणे आवाज घुमवीत व आवाजाला कंप देत ओरडू लागले. तरी अकुशा स्थिर राहिला.

" ती बाई म्हणते तुझ्या अगात त्यावेळीं निळा कोट होता. तो रक्तानं माखला होता. पाहा, खरं साग. इतका पत्ता काढला आम्ही. चल आता खरं सागून टाक, म्हणजे वाचवीन तुला. नाहीं तर सुभानरावाशीं गाठ आहे." त्याच आवाजात सुभानरावानीं त्याला पोलिशी मात्रेचे आणखी वळसे दिले.

परतु सुभानरावानीं ठासून भरलेला बार वायबार ठरला. कारण अकुशा शातपणाने उलट सुभानरावानाच प्रश्न करू लागला :

" फौजदारा, मी कशाला खून करू तुकारामाचा तुरुंगांतून जाऊन ? आन् मला कोन जाऊ देईल ? मी तर तुमच्या अटकेत. रातंदिन माझ्यावर तुमचा सगीन पहारा. मला जाऊ द्याल तुम्ही ? तुकारामान लाडीशीं जबरीनं म्होतुर लावला असता आन मी मोकळा असतों तर केला असता त्याचा खून रागाच्या भरात. पन तुम्हीच म्होतुर बद पाडलांत; आन् लाडी त्याच्याशीं बोलायला देखील राजी नाय. मग मला तुकारामाचा खून करण्याचं कारणच काय मुदली ? " अंकुशा अगदीं खुल्या खुल्या चेहऱ्यानें सुभानरावाशीं बोलत होता.

" हेच हेच कारण ! अंकुशा, आता मला छेडा सांपडला. " मेघांचा

गडगडाट व्हावा अशा तऱ्हेने सुभानराव हंसले. त्यानीं आता आपल्या तपासाच्या पद्धतीचा पवित्रा बदलला. “ तुझ्या मनाविरुद्ध तुकारामाचा आणि लाडीचा वाईट सबध जुळून आला ही गोष्ट तुला कळली म्हणून तूं तुकारामाचा खून केलास. खास खास. अगदीं एक अक्षर बोलू नकोस. बस्स. हेच कारण. माझी खात्री झाली. जास्त बोलायचं काम नाहीं. हां हा. हो हो. ” नाटकी आविर्भावाची गर्जना करून सुभानराव हसले.

“ खोटी गोष्ट. तुकारामबरोबर बोलायला देखील राजी नव्हती ती !” अकुशा चिडून बोलू लागला. सुभानरावाना हेच पाहिजे होते.

“ मग त्याच्यापासून ती गव्हार कशी राहिली ?” सुभानरावांनीं डोळे बारीक करून अकुशाला प्रश्न केला व आणखी चिडवले.

“ शाप, शाप खोटी गोष्ट. ” अकुशा आणखी चिडला.

“ खोटी गोष्ट ? लाडी खुद्द सांगते. आमच्याजवळ तिचा जबाब आहे. आणि तुला हे खोटं वाटत असेल तर तुला आडोशाला बसवून खुद्द लाडीच्या तोंडून तुला ऐकवितो ही गोष्ट.”

“ शाप खोट, शाप खोट.” अंकुशा रागाने स्वतःशींच बोलला.

“ फौजदारा, ही गोष्ट सोडून दे. लाडी पाक हाय. तुकारामाला ती खेटरान मारील. ती मनोहरापासून गव्हार राहिली आहे. मनोहरला वाच-विण्याकरिता ती खोटं बोलत आहे. अरेरे ! माझी लाडी ! गुनाची पोर ! कित्ती वनवास हाय तिच्या कपाळीं ? बेट्यानं तिला फसवल आन् आता नामर्दासारखा मागं का सरतो ? छातीठोकपणं त्यानं सागाव कीं, हें काम माझं हाय म्हणून. तो कबूल का नाय होत ?”

“ जिवाची आशा बाबा, अकुशा जिवाची आशा ! ती मर्दाला आणि नामर्दाला सारखीच असते. त्यान लाडीच पाप कबूल केल, तर तो रान-सईला आला होता अस ठरेल न् फाशीं जाईल. जीव सबसे प्यारा आहे. त्याला आपल्या जिवापेक्षा लाडीची अब्रू प्यारी नाहीं.”

“ फौजदारा, मर्द मरणाला भीत नाहीं. मी लाडीची बेइज्जत होऊ देणार नाहीं. ”

“ ती कशी ?” हर्ष व उत्कटता छपवून सुभानरावांनीं शांतपणाने विचारलें.

"फौजदारा, ऐक तर आतां. लाडी त्या हलकट तुकारामावर कंधी फिदा व्हईल ? नाय व्हनार. आतां तू समदी गोष्ट पाहिल्यापुन ऐक."

आपली युक्ति सफल होत आहे म्हणून सुभानरावांचा चेहरा प्रसन्न झाला. त्यांचे प्राण कानांत आले.

"फौजदारा, तुला ठाव हाय, मीं भैरवाच्या धोदार्णीत उडी मारली न् तुमी माझ्यावर बार काढलांत. मी राहिलो खडकाच्या कपारींत दबून आन् तुमाला दमवलंन्. तुमी गेलांत तवा मी काकडलों. मग मी वरच्या घबडींत गेलो. तिथं मनुदादा बसून राहिला व्हता. त्यानं गरम कोट माझ्या अंगांत घातला. तो मीं काळ्या कड्याच्या घबडींत लपवून ठेवला. खुनाच्या दिवशीं रात्रीं थंडीचा काकडा पडला व्हता. म्हून मीं तो कोट अंगात घातला न् मग फारिस्टाच्या चौकींत गेलो. तिथें तुकाराम झोंपला होता. त्याला मीं कुऱ्हाडीनं तोडला. त्याचा मुडदा पाठीवर घेऊन मी काळ्या कड्याखालीं गेलों. तिथं तो पुरून टाकला. कुऱ्हाडबी मूर्द्याबरोबर पुरली. त्या खड्ड्यावर मीं मोठी धोंड ठेवून दिली. मी ती जागा तुमांला दाखवून देईन व मुर्दा व कुऱ्हाड काढून देईन. त्या रातीला मनुदादा रानसईला काळ्या कड्यावर आला व्हता. त्याला भेटायाला लाडी काळ्या कडयावर चालली होती. ती मला रानांत मधरातची भेटली. तिनं रक्तान भरलेला मनोहरचा कोट माझ्या अंगावर पाहिला. तिला वाटलं मी मनुदादाचा खून केला न् ती काळ्या कड्यावर धांवत सुटली. तिला मागून कळल कीं, मीं तुकारामचा खून केला. तिनं तुमांला माझं नाव सागितल नाय."

"कां ?"

"तिचा दिल मोठा हाय. तिची अटकळ तुमाला नाय यायची. तिला इकडं आड अन् तिकडं इर झाली. तिला मला वाचवायच होतं न् मनुदादाला बी वांचवायाचं होतं."

"तुकारामानं तुला पकडून दिला म्हणून तूं त्याचा खून केलास ?"

"नाय. त्यांत तर त्यानं डोसकं चालवलं."

"मग तूं कां खून केलास त्याचा ?"

"फौजदारा, तू मला पकडलस न् माझी भिवरी एकटी पडली. तुकाराम व समना तिच्यावर सूड घेऊं लागले. समनाच्या सांगण्यावरून तुकारामनें भिवरीला रानात गांठून तिच्यावर बळजबरी केली. ही गोष्ट गांवांत कुणाला माहीत नाहीं. भिवरीन मला ती तुरुगात सांगितली. मीं जसं समनाचं नाक कापलं तसं समनान माझ कापल. समनाला वाटलं मी तुरुंगांत अडकलो. भिवरीनं मला तुरुगात भाकरी पोंचवली. तींत तिनं एक काचेचा तुकडा घातला. तो घेऊन मी खिडकीचे दोन गज मोकळे केले. त्या फटींतून मी निसटलो. इथून रानसई नऊ मैल हाय. पन डोंगरामधल्या आडवाटनं ती पांच मैलसुद्धा पडत नाय. मी रातोरात तुकारामचो खून करून संशय येऊं नये म्हून इथ येऊन बसलों. येताना मी हाडसाधी आन् गुलाबडीचा चीक घेऊन आलो आन् तो खिडकीच्या चौकटींत भरला आन् मग त्यात गज बसवले. थोडी कोळशाची कच वरती टाकली. आन् चीक कांचच्या तुकड्यानं बेमालुम घासून काढला. चीक वाळल्यावर गज घट्ट बसले. तुमीं हालवलेत तरी हालले नाहींत. कोळशाच्या कचीन चिकाचा लाकडासारखा रग झाला. त्यामुळं तुमाला काय बी वळखू आलं नाय. तुमी तुरुंग तपासून बघा हव तर. कोट, मी सुटून आल्यावर उपयोगी पडेल म्हून वेलींनीं बाधून घबडींत लपवून ठेवला."

"तू समनाचा खून का केला नाहींस ?"

"मला वेळ मिळाला नाहीं. ही गडबड मोडली असती म्हजं मीं त्याचं बी काम काढल असतं."

याप्रमाणें अंकुशानें कबुलीजबाब दिल्यावर पुढें रानसईला जाऊन पचांसमोर त्याने तुकारामाचा मुर्दा व जिनें खून केला ती कुऱ्हाड सुभानरावाना काढून दिली.

---

# प्रकरण ३९ वे

# अपरिहार्य

अंकुशा व मनोहर तुरुंगात होते तेव्हा रानसईत काय हकीकत घडली ? अंकुशा व मनोहर तुरुंगांत आहेत या गोष्टीचा रानसईच्या गावकऱ्यांनीं फायदा घेतला व चौऱ्यांशी बोरेठीची त्यांनीं पंचायत भरवली. पंचायतींत त्यानीं लाडीला पूर्णपणें वाळींत टाकलें. तिच्याशीं भाषण करण्यास देखील पंचानीं बदी केली. " तूं आपल्या लेकीला घराबाहेर काढली नाहींस तर आम्ही तुझी पण तीच गत करूं. तुझ्या दुसऱ्या मुलाबाळाना कुठं सोयरीक मिळूं देणार नाहीं. " असा त्यानीं दीपाजीला दम दिला. तेव्हा दीपाजीनें लाडीला घराबाहेर काढले.

निराश्रित लाडी बापुजीबुवासमोरील आब्याखालीं बसली. तिला चालवत नव्हते. कारण तिचे दिवस भरत आले होते. भिवरीनें तिला कातोडवाडींत नेले. तेथे गावकऱ्याच्या चिथावणीवरून कातोड्यानीं गिल्ला केला. तेव्हा ती भिवरीच्या न कळत तेथून निघाली व काळ्या कड्यावरच्या घबडींत जाऊन बसली. तिचे डोळे आसवांनीं भरले. त्यातून ती पाहू लागली. तिच्या रानसईच्या खलाटींत तिच्या ओळखीची दुनिया शेतीचे काम करीत होती.

बाप्पाजींचे लाडीबद्दलचे मन साफ निवळले होते. लाडीच्या हृदयात माणुसकी भरून राहिली आहे, तिचें प्रेम धर्मनिषिद्ध असले तरी पवित्र आणि अगाध आहे, त्याला तुलना नाहीं, ही गोष्ट त्यानीं ओळखली. मनोहरला वाचविण्याकरिता तिने आपली अब्रू विकली आहे हे त्याना समजले त्या दिवशीं ते कोणालाहि दिसू न देता ढसढसा रडले. लाडी निरपराध आहे; ज्या गोष्टी घडल्या त्या निसर्गनिर्मित अतएव अपरिहार्य आहेत, हे तत्त्व त्याना पटले. परतु त्याच्या स्वभावानुसार त्यानीं आपली चूक कबूल केली नाहीं, त्यानीं लाडीची क्षमा मागितली नाहीं किंवा बाह्यात्कारीं अनुताप झाल्याचे एकहि चिन्ह त्यानीं दाखवले नाहीं. परतु जेव्हा लाडी असहाय स्थितीत काळ्या कड्यावर उपाशीं बसून राहिली आहे असे त्याना कळले तेव्हा ते आपला सोटगा घेऊन काळ्या कड्यावर आले.

" लाडे, इथ बसूं नकोस. घरीं चल. " बाप्पाजी लाडीला बोलले.

" कोणाच्या ? " क्षीण आवाजांत लाडीनें विचारलें.

" माझ्या. "

लाडीला आश्चर्याचा धक्का बसला. करुणापूर्ण नजरेनें ती बाप्पाजींकडे पाहूं लागली. तरी ती जागची हालली नाहीं.

" माझ्यामुळं तुम्हाला त्रास होईल. "

" होऊं दे. तो तुझा प्रश्न नाहीं; माझा आहे. चल ऊठ. माझ्याबरोबर चल. " बाप्पाजी त्या गुहेंत गरजले.

लाडी मंत्रमुग्ध बालकाप्रमाणें काहींएक न बोलतां उठली व त्याच्या पाठोपाठ रानसईत आली. बाप्पाजींच्या मागोमाग लाडीला येताना पाहून रानसईचे लोक थक्क झाले. लाडी जेव्हा सरळ बाप्पाजींच्या घरांत शिरली, तेव्हा तर त्याचें आश्चर्य परमावधीला गेलें.

बोरेठीच्या पचाना भयंकर मिर्च्या लागल्या. त्याना आता अंकुशाची डर नव्हती. समनाने पंचाना खिजविण्याचा पुढाकार घेतला. पुन्हा पंचायत भरली व त्यानीं बाप्पाजींना पण वाळींत टाकले. ' नाकान कादे सोलणारे बाप्पाजी लेकाच्या दुर्गुणावर पाघरूण घालीत आहेत, वाईट कर्माला उत्तेजन देत आहेत ' असा लोकानीं बाप्पाजींच्या वागणुकीचा अर्थ केला.

*　　*　　*　　*

बाप्पाजींनीं पंचाच्या निर्णयाला काडीचे महत्त्व दिले नाहीं. खुद्द राजसबाईनी लाडीची सुटका केली. मनोरमेने पोराला नहाण घातले. मुलगा मनोहरसारखाच सुदर होता. बाप्पाजींनीं सुनेला साजेल असे लाडीचे बाळतपण केले. बाप्पाजी डगमगले नाहींत. लोक राजपाटीच्या लावणीला गेले नाहींत. तेव्हा बाप्पाजींनीं धवाला डोंगरात निरोप पाठवला. तो आपले सात मुलगे घेऊन खालीं आला. बाप्पाजींनीं दिलेले भातशेत, बैलाची जोडी, तो विसरला नव्हता. कातोडयाचा पण जमाव उठला. ' बाप्पाजींचे बाबत आपण गावकऱ्याचं काहीं ऐकणार नाहीं ' असे त्यानीं गावकऱ्याना निक्षून सागितले. बाप्पाजींचे लावणीचे काम सुरू झाले. परतु अर्ध्या लावणींत वळघणीची मासळी शेतात चढूं लागली. मासे पाहिल्याबरोबर कातोडी धीर धरीनात. लावणी अर्धंगी टाकून ते मासे पकडण्याकरिता धावले. बाप्पाजीचे काम अडून राहिले आहे, हा विचारसुद्धा त्याचे

डोक्यात नव्हता. कुदळीच्या नाचणीवरीची मेहनत करून थकलेले ठाकूर लावणीचें काम नेटानें करूं लागले. एकट्या अंधूनें राजपाटीचा चिखल केला. सयाजीने बाप्पाजींना मदत देऊं केली, परंतु आपणामुळे त्याला त्रास होईल म्हणून बाप्पाजींनीं ती नाकारली. पुढें श्रावणअखेर मागासलेली लावणी एकदाची पुरी झाली. गावकऱ्यांच्या भाताचे चोथे फुगून कबरेच्या वर वाढले व वाऱ्यात हिरव्या लहरी उठवून डुलूं लागले, तेव्हा राजपाटींत कुंचे दिसत होते.

एका अधूच्या घराशिवाय बाप्पाजींच्या येथें कोणी येत जात नव्हतें. हल्लीं बहिष्कारामुळें घरातील सर्व कामे घरातील मडळींना करावीं लागत होतीं. बहिष्कारामुळें घराला लागणारें सामानसुद्धां परगावाहून बाप्पाजींना आणावें लागत होतें. ह्या सर्व प्रकारांनीं लाडी उद्विग्न झाली. 'मनोहरच्या अधःपाताला आपणच कारण झालो. आपल्या पापाचे प्रायश्चित्त देवासारख्या पवित्र बाप्पाजी आणि राजसबाई व मनोरमा यांना घ्याव लागत आहे,' हे पाहून ती खिन्न झाली. 'करारी बाप्पाजी, निव्वळ माणुसकी, सहानुभूति, दया दाखवण्याकरिता ही आपत्ति आपल्यावर ओढून घेत आहेत, खुद्द ममोरमा देखील मनोयज्ञ करीत आहे,' ही कल्पना तिला असह्य झाली. परतु तिने तें बाहेर बोलून दाखवलें नाहीं.

मनोरमेनें मुलाचे नाव 'पकज' ठेवले होतें. मुलाचे डोळे लाडीसारखेच काळेभोर होते. एके दिवशीं मनोरमा पकजाचे डोळ्यांकडे टक लावून पाहत होती. लाडीने तिच्या मनातील भाव ओळखला. तिनें पंकजाला मनोरमेचे मांडीवर दिलें व ती म्हणाली :

"वहिनीबाई, हा तुमचा पहिला आणि होईल तो दुसरा. माझ्यामागें तुम्ही याची आई."

मनोरमा लाडीच्या तारवटलेल्या डोळ्याकडे पाहतच राहिली.

"लाडे, तुला मरायला काय झाल आहे?"

"वहिनीबाई, हा देह सुंदर आहे पण पापी आहे. एक दिवस तो नाहींसा होणारच. आता याच जतन किती दिवस करूं? त्याच दिवशीं काळ्या कड्यावर मी याचा शेवट करणार होतें. वहिनीबाई, माझ्या अब्रूचे धिंडवडे झाले. ही विटंबना मी किती सहन करूं?"

" तुझ्या मनांत तरी काय आहे ? " मनोरमेनें घाबरून विचारलें.

लाडी हसली.

" वहिनीबाई, पंकज म्हणजे काय ? " लाडीने बोलणे फिरवलें. तिला पंकजाचा अर्थ कळला नाहीं. कारण तिचे शिक्षण बेतार्चेच होतें.

" पंक म्हणजे चिखल, पंकज म्हणजे चिखलांत जन्मलेलं. "

"हं." लाडी गंभीर झाली. पंकजाकडे पाहत तिनें एक निःश्वास सोडला.

" चिखलात काय जन्मतं ? कमल. पकज म्हणजे कमल. " आपली चूक मनोरमेच्या लक्षांत आली. लाडीला बरें वाटावे म्हणून ती पंकजाचा अर्थ घाईने लाडीला सांगू लागली. परतु लाडी जास्तच खिन्न झाली.

" पकज खरोखर कमलाप्रमाणे सुदर आहे. " लाडीचें मन हुरळतें करण्याकारिता मनोरमा पकजाची स्तुति करू लागली.

" सुदर आहे खरा—पण—पण—" लाडीचे डोळे पाण्यानें भरले.

" वहिनीबाई. योग्य नाव ठेवलय तुम्ही माझ्या बाळाच. " ओंठावर आलेल्या हुदक्याचे हसण्यांत रूपांतर करीत लाडीने गहिवर आंवरला.

लाडी का खंती करते हें उमगण्यास मनोरमेला वेळ लागला नाहीं.

रानसईत या घडामोडी झाल्या त्याच सुमारास अंकुशानें कबुलीजबाब दिला, त्यामुळें सुभानरावानीं मनोहरला सोडून दिलें.

मनोहर फासावरून सुटून आला तरी बाप्पाजींनीं त्याच्याशीं भाषण केलें नाहीं. त्यामुळें लाडी आणखी खिन्न झाली.

" अकुशाचं काय झाल ? " लाडीने मनोहरला विचारलें.

" त्याचा खटला सात–आठ दिवसात सेशनला जाईल. "

" त्याला फाशी होईल ? "

" काय सागावं "

लाडी चिंतातुर झाली.

आठ दिवसांत अंकुशाचें लांबलेलें खटलें सेशनकामिट झालें. मनोहरनें अंकुशाच्या बचावाकरितां वकील दिला. परंतु अकुशाने व त्याच्या साथीदारानीं गुन्हे पटापट कबूल केले, त्यामुळे खटल्याचीं कामें वाढलीं नाहींत. सेशन-जज्जांनीं कातोड्यांना निरनिराळ्या शिक्षा सुनावल्या. तुका-

रामच्या खुनाबाबत अंकुशाला फाशीची शिक्षा झाली. अंकुशानें अपील केलें नाहीं. श्रावणअखेर अकुशाची फाशी अमलांत आली. भिवरी त्याची शेवटची भेट घेण्याकरता फाशीच्या जागीं गेली होती. ती फाशी झाल्यावर रडतओरडत रानसईत आली. तिला जवळजवळ वेड लागले होते. तिचा शोक ऐकून लाडीचे काळीज फाटलें.

' अकुशा यःकश्चित् कातोडी, पण त्याचे दिल केवढें मोठें होते ! आपणामुळे तो पोलिसाना सापडला. आपणाकरिता त्याने कबुलीजबाब दिला. त्याला फाशी जाताना काय वाटले असेल? आपली आठवण करीत करीत त्याचे गुदमरलेले प्राण—कासावीस झालेला जीव—त्याची कुडी सोडून गेला असेल, असल्या तऱ्हेचे विचार लाडीच्या डोक्यात थैमान करू लागले. त्यात पंकजाचा हीन जन्म व तिची बेअब्रू तिला वेदना देऊ लागली. तारुण्यातील उन्मादकारक प्रणयाऐवजीं प्रौढ मातेचे विचार तिच्या हृदयात कालवा- कालव करू लागले. तिला आता दुःख सहन करवेना. तिची सहनशक्ति बिथरली व कावरेबावरे डोळे करून ती उन्मादात तास न् तास विचार करू लागली.

भाद्रपदाच्या पहिल्या दिवशीं आकाशात पावसाचें अगदीं चिन्ह नव्हतें. उलट त्या दिवशीं सकाळीं पाऊस उडवणारे धुके दरींतून निळ्या डोंगराना वाफारा देत होतें. परतु त्याच दिवशीं संध्याकाळीं एक मोठा पांढरा ढग दक्षिणेच्या बाजूनें सारग खिडींतून हळूहळू लोटत लोटत आला व डोंगराच्या अगाने काळ्या कड्यापर्यंत पसरला. थोड्याच वेळात त्याने काळ्या कड्याला दुपेटा बाधला व काळदरीच्या रानभागावर व डोंगरकड्यारीवर अंधेरी केली. काळ्या कड्यापासून वर भिमाशंकर व खालीं महाबळेश्वरपर्यंत एकाच काळ्या ढगाचे एक काळे छत तयार झाले. विजा, ढग, पाऊस, वारा, यानीं सह्याद्रीवर युद्ध पुकारले. टपोऱ्या थेंबाच्या पावसाची एक मोठी सर सुरू झाली. पावसाचे थेंब इतके मोठे होते कीं, पागोळ्यात पाऊस माईना. बाप्पाजींचें कौलारू छप्पर सगळीकडे टापटाप आवाज करून गळूं लागलें. गळत्याखालीं भाडीं ठेवलीं तीं दर तासाला भरून वाहू लागलीं. तीं सारखीं रिकामीं करावीं लागत. बाहेर अंधारांत धो धो पाऊस पडत होता. लाडी पकजाला कुशींत घेऊन निजली.

विजांचा कडकडाट, मेघाचा गडगडाट, कोसळणाऱ्या कडेकपारांचे भयंकर आवाज, वाऱ्याचें गोगावणे, वाऱ्यानें मोडणारीं झाडें व फाद्या याचा कर्कश आवाज यांनीं काळ दरी घुमूं लागली. वीज पडली किंवा दगड गडगडला किंवा कडा कोसळला कीं, त्याच्या आवाजाचे पडसाद काळ दरींतून व आसपासच्या खोऱ्यातून कितीतरी वेळ कंप काढीत राहत. विजेचा चमकारा लवला कीं, अंधारातल्या ढगाला सह्याद्रि व सह्याद्रीला ढग दिसे. ढगाने सह्याद्रीकडे पाहून हुकारले की, तोंडीस तोड म्हणून सह्याद्रि पण त्या हुकाराचे प्रतिध्वनि कड्यावरून व घळींतून घुमवी व युद्धाचे आव्हान स्वीकारी. प्रबळ शत्रूप्रमाणें कोणीहि पड खाण्यास तयार होईना.

इकडे काळ्या कड्यावर ‘ भैरव ’ बेफाम झाला. या प्रलयातून त्याने धोऽऽकरून दम न घेता एकच भीमगर्जना सुरू केली. त्या दरींतील डोंगराडोंगरावरचे धवधबे आपापल्या शक्तीप्रमाणें आरोळ्या मारून ‘भैरवा, आम्ही सर्वजण तुझ्याच पक्षाला आहोत. तूच आमचा पुढारी हो ’ म्हणून कंठशोष करीत भैरवाची निवडणूक लढवूं लागले.

रानसईच्या जागत बसलेल्या लोकाना ‘ जगबुड ’ अंधारात चालली आहे कीं पावसात चालली आहे, हे कळत नव्हते—इतका अंधार गुडूप पडला होता. पावसाच्या रागदरींत लोकाना जरा कुठे डुलका लागला कीं, कुठे तरी वीज पडे किंवा कडा कोसळे. मग त्या आवाजाने लोक खडबडून जागे होत व ‘कडा कोसळला, कीं वीज पडली’ याची आपापसात चर्चा करूं लागत. इतक्यात विजेने कड्ड्ड् असा आवाज करीत पृथ्वीच्या पोटापर्यंत जमीन फाडीत जावें किंवा कड्याने कोसळून डोंगर हादरून टाकावेत. वीज पडली कीं, लोकांना कडा पडल्याचा भ्रम उत्पन्न व्हावा व कडा कोसळला कीं वीज पडली म्हणून वाटावे! वीज पडली किंवा कडा कोसळला कीं, लाही भेदरलेल्या पंकजाला कुशींत घेऊन आपल्या अंगाची ऊब देई.

पहाटे खालच्या आळीचीं गुरें हंबरूं लागली तेव्हां बाप्पाजींनीं कंदिलाची वात मोठी केली. त्यांनीं ओळखलें कीं, काळ नदीचें पाणी गावात शिरूं लागलें आहे. बाप्पाजींनीं अंधूला हाक मारली. तो जागाच होता. त्याला घेऊन बाप्पाजी घराबाहेर पडणार तों खालच्या आळींचे रहिवाशी डोक्यावर सामान घेऊन बाप्पाजींच्या वाड्यावर आश्रयास आले.

अर्धा गांव पुराच्या पाण्यानें वेढला होता. त्यांतून माणसें व सामान सुरक्षित काढणाऱ्या लोकांचा ओरडा चालू होता. त्यांत गुरांचें हंबरणें, कुत्र्यांचें रडणें व कोंबड्यांचा कलकलाट मिसळला. जिकडे तिकडे कंदील नाचूं लागले व त्यांचे कडोसे पुराच्या पाण्यांत पडून पूर भेसूर दिसूं लागला. कुणाच्या घरांतून पाणी पिऊन फुगलेले साप शिरले. पुरापेक्षा त्यानींच जास्त गोंधळ माजवला. वास्तविक पुरानें साप इतके भेदरले होते कीं, त्यांना हाताने ओढून काढलें तरी ते कांहीं करीत नव्हते.

एका इसमाच्या घरात ' आर ' नावाच्या अजगराच्या जातीचा साप शिरला. लोकानीं त्याचेवर कुऱ्हाडी कोयत्याचे वार केले. पण ' आरा'ला न लागता ते निसटले ! इतके त्याने आपले अंग फुगवून ताठ केलें. 'आर' झोपडींतून निसटून बाहेर पाण्याच्या बाजूला जाऊ लागला. हातात कदे घेतलेले पाच सात गडी त्याच्यावर वार करू लागले, त्याला ओढू लागले, पण तो रस्त्यानें वाहणाऱ्या पाण्याच्या धारेला लागला. कदिलाचे लुळकूट त्याला मारीत त्याच्यामागे जाऊ लागले. काहीं लोक त्याला हाताने पकडून ओढू लागले. पण प्रवाहाचा फायदा मिळालेला आर त्या सगळ्याना ओढून काळ नदीकडे घेऊन जाऊ लागला. तो पुराच्या पाण्यात शिरला तरी लोकानी त्याला सोडले नाहीं. परतु एकदोन लोकानीं जेव्हा गटगळया खाल्ल्या तेव्हा मागले लोक ओरडले; तेव्हा लोकानीं ' आराला ' सोडून दिलें. मोठ्या मुष्किलीनें त्या इसमाना लोकानीं बाहेर काढले.

बाप्पाजींबरोबर मनोहर देखील घराच्या बाहेर पडला. पावसाळ्यात काळ नदीला तर होती, पण तरीची होडी पुराबरोबर वाहून गेली होती. तेव्हा मनोहरनें माजघरातील चौपाळा बाहेर काढला व त्याला भोयाचे भोपळे बाधले. मग एक लाब बाबू घेऊन त्यानें चौपाळ्याचा तराफा केला. त्याचे अनुकरण करून लोकानीं फळयाचे, बाजेचे आणखी तराफे बनविले. मनोहर माणसे व सामान वाचविण्याची शिकस्त करू लागला. बाप्पाजी त्याला मदत करू लागले. महापुराच्या धांदलींत आपली प्रतिज्ञा विसरून ते प्रथमच मनोहरशीं बोलले. जें काहीं घडलें त्यात मनोहरचा व लाडीचा अपराध नव्हता; तर त्याच्या मुळाशीं निसर्गनिर्मित माणुसकीच होती, असा जरी त्यांना मागेच प्रत्यय आला होता तरी

त्यांच्या मानी स्वभावास पराजय कबूल करणें ठाऊक नव्हतें. आज ' महापुरा 'च्या प्रळयांत त्यांचा अभिमान वाहून गेला.

बाप्पाजींचें घर उंचवस्थावर होतें तरी त्यांच्या पडवीच्या पायरीला पाणी लागलें. मनोहर व इतर गांवकरी, माणसांचे व सामानांचे तराफे आणून पडवींत रिकामे करीत होते. बाप्पाजींचा वाडा मुलांमाणसांनीं गजबजला. जणूं निसर्गाने पैजेचा विडा उचलून बाप्पाजींवर बहिष्कार पुकारणाऱ्या बहिष्कारवाद्यांना त्याच्याच घरात आणून कोंडले. बाप्पाजींनीं आपलीं सगळीं पाघरुणे व कपडे भिजलेल्या लोकाना बदलण्यास दिली. राजसंबाई, मनोरमा व राही यानीं शेकशेकोटी व चहाची तयारी केली. लाडीनें यांत भाग घेतला नाहीं. तिने जमलेल्या लोकाना तोंड दाखवलें नाहीं. चहाचीं मोठमोठीं पातेलीं उतरलीं. लोक बाप्पाजींना दुवा देत चहा पिऊ लागले. बाप्पाजींवर बहिष्कार टाकणारे लोक भयंकर खजील झाले !

समनाचें दुकान खालच्या आळीला होते. मनोहरला समनाची आठवण झाली. त्याने चारपाच कदील आणखी बरोबर घेतले व हिय्या करून तराफा समनाच्या दुकानाला लावला. समना घरीं एकटाच होता. शेटाणी मुलखात गेली होती. पुराचे पाणी समनाच्या घरात शिरले होतें. समनाचे जोतें खूप उंच होतें. अद्याप माजघरात पाणी शिरले नव्हते. तो माजघरातील मोठ्या हडप्यावर बसून राहिला होता. त्या हडप्यात त्याच्या वह्या, रोकड व दागदागिना भरला होता लोकानीं समनाला ओढून काढण्याचा प्रयत्न केला, पण समना हडप्याच्या कड्या धरून गच्च बसला व मोठमोठ्याने ओरडूं लागला. तो बाहेर निघेना व पाणी वाढू लागलें, तेव्हा मनोहरनें त्याचा नाद सोडला व तो परत फिरला.

सकाळीं उजाडले तरी समजलें नाहीं, इतका पाऊस धूम धार पडत होता. आधल्या रात्रीं जी एकच सर सुरू झाली तीच अद्याप चालू होती. त्या सततधारेनें पुराचें पाणी सारखें वाढत होतें. काळ नदीचा तुंबारा इतका फुगला कीं, प्रचंड वृक्षाचे शेंडे देखील पाण्यात बुडून दिसेनासे झाले. प्रत्येक ओढा पाण्यानें फुगला. पाण्याला जावयाला वाट मिळेना. सबंध खलाटी तुडुंब तळ्यासारखी दिसूं लागली. मग त्यांत शेतें आणि भात कुठून दिसणार ! काळा कडा दाट धुक्यात पूर्णपणें अदृश्य झाला. त्या

धुक्यांत त्याचे आणि ‘ भैरव ’ धबधब्याचें काय खलबत चाललें होतें, काळा कडा भैरवाला काय सल्ला देत होता, याचा कुणाला पत्ता नव्हता. धुक्यातून ‘ भैरवा ’ ची गर्जना मात्र ऐकूं येत होती.

आधल्या रात्रीं कसेबसे जीव वाचवलेले शेतकरी, आपल्या जीवकी प्यार अशा शेताची काय दुर्दशा झाली आहे तें पाहून येण्यास इरलीं घेऊन निघाले. त्यापैकीं निम्मे उतार न मिळाल्यामुळे घाबरून परत आले. जे धीट पोहणार होते ते शेतावर शिकस्तीने गेले. शेताला पडलेल्या खाडी व बुडालेले भात पाहून त्याच्या डोळ्यात आसवें उभीं राहिली. पण तोंडावर झडणाऱ्या पावसाच्या फटकाऱ्याने तीं कुठे गेलीं त्याचा पत्ता लागला नाहीं. निसर्गानें त्याना रडूं देखील दिलें नाही. सृष्टीच्या कोपासमोर ते काय करणार ? अस्मानीचा जोर सुलतानीच्या अनंतपट आहे.

पहाटे नाहींसा झालेला अंधू रडत ओरडत राजपाटीवरून पावसाला वाकडें इरले धरून वाकत वाकत घरीं आला. तो कबरभर पाण्यात उभा राहून अगणातून ओरडूं लागला. पावसाच्या आवाजांत तो काय बोलतो तें कळेना. काकडल्यामुळे त्याचा उच्चार नीट ऐकू येत नव्हता. बाप्पाजींनीं त्याला आत येण्यास खूण केली. तो आत आल्यावर त्यानें मोठ्याने गळा काढला.

“ अरे, अंध्या काय झालं काय तुला ओरडायाला ? ” बाप्पाजी पाऊस व भैरव याच्यापेक्षा मोठ्यानें ओरडले.

“ बाप्पाजी श्याप श्याप मेलो ! राजपाटी रेवशानं पार गाडली. भाताचा शेडा दिसत नाय. ”

“ अरे पण रडतोस कशाला ? पुढल्या वर्षीं जास्त पिकेल. देवाच्या दयेने आपण जगलों वाचलो पुढल्या सराईला म्हणजे मिळवलं. ”

“ बाप्पाजी, मी राजपाटीच्या बाधावर उभा राहिलो न् माझीं आसवं औरात पडलीं. तुम्ही चला म्हणजे तुमचं काळीज फाटेल. ”

बाप्पाजी, मनोहर व गावातील इतर लोक कसेबसे राजपाटीवर गेले. अद्याप पावसाची पहिली सर चालू होती. राजपाटीच्या वरच्या बाजूचा डोंगर ढासळला होता त्याचा रेवसा व खरपा राजपाटींत दगडासारखा येऊन बसला होता. मनोहरला राजपाटी मोठ्या टेनिस कोर्टासारखी दिसली.

या शेतात भात लावले होतें असे शपथेवर सांगितले असतें तरी कोणीं खरें मानलें नसते. बाप्पाजींनीं सभोवारच्या शेतावर नजर टाकली, राजपाटीच्या ओढ्याची ताल तपासली, ताल सुरक्षित होती. मग बाप्पाजी स्वतःशींच हंसले.

" सयाजी, तुझा काय तर्क चालतो? राजपाटी पार गेली?"

" पार भात गाडलं गेलं, आता कसलं ते जीव धरत! आता सराई खलास!" सयाजीने भविष्य केलं. ते ऐकून बाप्पाजींशिवाय सर्वांच्या तोंडचें पाणी पळालें. परंतु बाप्पाजी स्थिर राहिले. त्यानीं त्याच्याचसारख्या धीर गंभीर अशा काळ्या कड्याकडे पाहिलें. पण तो धुक्यात गुरफटला होता. बाप्पाजींनी स्मित केले. " देवाची दया झाली तर भात अजून वाचेल."

मग सर्व मंडळी गावात परत आली, तेव्हा काडकाड करून एक मोठा आवाज झाला. त्या वेळीं वीज चमकली नव्हती, अर्थात् कुठे वीज पडली नव्हती. आवाज डोंगरातून आला नाहीं. तेव्हा डोंगर कोसळला नव्हता. मग आवाज कसला झाला?

" समनाचं घर कोसळलं " बाप्पाजी ओरडले.

मनोहरनें तराफा सोडला व तो काहीं पठ्याना बरोबर घेऊन समनाचे घराकडे गेला. आता पुराचे पाणी भयंकर चढले होते. पाण्याच्या जोराने समनाच्या घराच्या भिंती कोसळल्या होत्या. पुराच्या खालीं रेटणाऱ्या पाण्याचा व तुंबाऱ्याच्यावर चढणाऱ्या पाण्याचा एक प्रचंड भोंवरा तयार झाला होता. लोकांनीं जबरदस्तीने मनोहरचा तराफा परत फिरवला. इतक्यांत समनाचा हडपा पाण्याच्या जोराने घराबाहेर वाहत निघाला. हतबुद्ध समना हडप्यावर बसला होता. पुरातला एक नाग हडप्यावर चढून समनाच्या समोर वेटोळें घालून बसला होता. त्याने फडी काढून समनाकडे टक लावली होती. समनाचा हडपा आता पुराच्या वाहणीस लागला. हडपा, त्यावरचा समना व नाग पुराबरोबर वाहत जाऊन कांहीं वेळानें काळ नदीच्या पात्रात दिसेनासे झाले. कोणालाहि समनाला वाचवता आलें नाहीं. अफाट पुरामुळें सगळ्याचा निरुपाय झाला होता.

सबंध दिवसभर पावसाची सर चालू होतीच. दुसरे दिवशीं सकाळीं ती एकसारखी छत्तीस तास कोसळणारी वृष्टि थांबली. सयाजी-बाप्पाजींनीं

आपल्या हयातींत असला पाऊस पाहिला नव्हता. गांवातील लोक पुराचें पाणी ओसरेपर्यंत बाप्पाजींच्या इथेंच जेवणखाण करून राहिले.

सकाळीं पाऊस थोडासा थाबला व धुकें नाहींसें झालें, तेव्हां काळा कडा व इतर डोंगर याचे दर्शन झालें. धुक्याचा पडदा निघाल्यानंतर डोंगरावर पावसाचे काय परिणाम झाले तें दिसूं लागलें. भैरव नेहमींपेक्षां दुपटीनें फुगला होता. दोन दोन तीन तीन मैल लाबीच्या डोगराच्या धशी कोसळून डोंगराचा ताबडा भूगर्भ उघडा पडला होता. ते डोगर, नरसिंहाने हिरण्यकशिपूचा कोथळा फोडल्याप्रमाणें रक्तबबाळ दिसले. रक्ताऐवजीं त्यातून ताबडया पाण्याचे प्रवाह निघाले होते. कोसळलेल्या डोंगराच्या ढिगाऱ्याखालीं सागाचीं जगलेच्या जगले गडप झाली. ठिकठिकाणीं प्रचड वृक्ष मुळातील माती वाहून गेल्यामुळे आडवे झाले होते. कैक डोगर गर्भात पाणी मुरून फुगले व त्याच्या बाजवा उकलून खालीं कोसळतात कीं काय अशी तळच्या गावाना भीति पडली. कैक तास बिळातून पाणी राहिल्यामुळें पुष्कळ साप बिळातल्या बिळात मरून गेले.

पाणी उघडले तो दिवस गौरी आणण्याचा होता. मागील सालीं गावानें गौरी आणल्या पण लाडी रिकामी आली. यदा पुराच्या व पावसाच्या भीतीनें कोणी मुली रानात गौर आणण्यास गेल्या नाहींत. म्हणून लाडीमुद्दाम मनोरमेला बजावून व पकजाला तिच्याजवळ देऊन रानात गेली. मनोरमेने तिला मना केलें, पण तिने ऐकलें नाहीं.

“लाडे, तू तर विधवा आहेस मग गौर कशी आणणार?” मनोरमेने तिला विचारलें. लाडी नुसती हसली व टोपली घेऊन चालूं लागली.

ती नीट काळा कडा चढून वर आली. गेल्या सराईपासूनच्या आठवणींनीं तिच्या डोक्यांत काहूर उठवले. ती एका विचाराने बेभान झाली. त्या विचाराच्या तंद्रीत तिनें कचोऱ्याचीं फुले गोळा केलीं, तेरड्याच्या फुलाची गौर बाधली. नंतर ती गेले सालप्रमाणे सोगटीप्रमाणे दिसणाऱ्या त्या पुष्पखचित हिरव्या टेपाडाच्या धोंडीवर जाऊन बसली. तिनें फुलांची टोपली पायांजवळ ठेवली व ती शून्य नजरेनें रानसईच्या खलाटीकडे पाहू लागली. सध्याकाळचें सुंदर ऊन्ह, सुदर सुंदर हिरव्या खलाटीवर, सुदर सुंदर हिरव्या रानावर, सुंदर सुंदर हिरव्या

डोंगरावर पडले होतें. याच सुदर खलाटींत सुंदर सराई पिकणार होती. समोरच्या पठारावर सोनेरी उन्हांत सोनटक्यांच्या फुलाचा सोनेरी गालिचा भरला होता. 'भैरव' व इतर धबधबे ओढ्याचे खळखळाटात लय लावून रागदारी काढीत होते. लाडीनें ते सृष्टिसौंदर्य डोळ्यात सांठवून घेतलें. तिला वाटले, किती किती सुदर दिसतो रानसराईचा देखावा! एक दिवस आपण मरणार. आपण मेलो तरी हा देखावा असाच सुंदर राहणार; निर-निराळ्या ऋतूंच्या वैभवानें खुलत जाणार. मग त्यात सुदर सराई पिकणार. आपण मेलो तरी दुसरे लोक आपल्या मागे जिवत राहतील ते, हे सुंदर देखावे पाहून प्रसन्न होतील. सराईचा आनंद लुटतील. त्या वेळीं आपण कुठे असू? मेल्यावर पुन्हा असले देखावे आपल्याला दिसतील काय? नाहीं. मग आपण मरूंच नाही.' शून्य नेत्रा लाडी त्या देखाव्याकडे पाहत राहिली.

मुकुटनें तिला पैलतीरावरून हाका मारल्या, त्या तिला ऐकूं आल्या नाहींत. मग आपल्या एका हातात मिलिटरीचे बूट घेऊन व दुसऱ्या हातावर रेनकोट टाकून ऐटदार साफा बाधलेला मुकुट ओढ्याची धार उतरून तिच्याकडे येऊ लागला. त्याच्या भरदार छातीवर पराक्रमाचे बिल्ले व फिती हालत होत्या.

"लाडे!" ओढ्याच्या प्रवाहांत उभें राहून मुकुटनें हाक मारली.

लाडी दचकली. तिनें क्षणभर मुकुटला ओळखले नाहीं. मग ती खिन्नतापूर्वक हंसली.

"लाडे, लाडे, मी आलो आहे." मुकुट ओरडला.

"मुकुट!" बुडणाऱ्या गलबतांतील लोकांना बदराचा दिवा दिसल्यावर ते ओरडतील त्याप्रमाणें लाडी ओरडली, "पण मुकुट तू उशीरां-उशीरा आलास. काळ्या कड्यावरून तू मनोहरला लोटलें नसतेंस तर आज... आज......"

"आज तेंच होईल. माझ्याबरोबर चल, पाऊस भरून आला आहे."

"नको. मुकुट नको. या तीरावर तूं येऊं नकोस."

मुकुट ओढा उतरूं लागला. लाडीनें फुलांची टोपली उचलली व ती भैरवाकडे धांवली. भैरवाच्या धोदाणीच्या कड्यावर ती उभी राहिली. तिनें काहीं वेळ मुकुटकडे वळून पाहिलें. मग ती शून्य नजरेनें रानसईची

खलाटी पाहूं लागली. मुकुट जवळ आल्याबरोबर तिनें फुलाच्या टोपलीसह ' भैरवां'त उडी मारली !! पुण्यपुष्पाजलीप्रमाणें धबधब्यातून ती खालीं पडली. मुकुटला क्षणभर गंगावतरणाचा भास झाला. त्याने खालच्या कोर्डीत व ओढ्याचे काठाने लाडीचा तपास केला. पण लाडी त्याला सापडली नाहीं. दुःख करीत तो रानसईत आला व त्यानें सर्वांना ती दु:खद हकीकत सांगितली.

दुसरे दिवशीं सकाळीं लाडीचें प्रेत व तिचीं फुलें काळनदीच्या भोंवऱ्यात अडकलेलीं दिसलीं. लाडी पाण्यातून काढलेल्या ताज्या गुलाबाप्रमाणें टवटवीत होती. शेवटपर्यंत ती आकाशांतून निखळून पडलेल्या ताऱ्याप्रमाणें सुंदर दिसली. मृत्यूने तिचे फक्त प्राण हरण केले होते. सौंदर्याला त्यानें हात लावला नव्हता.

तिला अग्निसंस्कार केला तेव्हा बाप्पाजी म्हणाले, " अपरिहार्य ! अपरिहार्य ! !" जमलेल्या खेडवळ लोकाना त्याचा अर्थ कळला नाही. खुद्द मनोहरला देखील कळला नाहीं. दुंदुभिनाम संवत्सरात जन्मलेल्या बाप्पाजींनी निदान सत्तर पावसाळे पाहिले होते व कमींत कमी साठ सराया पिकवल्या होत्या. त्याचे ज्ञान अनुभवातून जन्मले होते. तेव्हा त्याच्या ' अपरिहार्या'चा अर्थ सामान्य लोकाना कसा कळेल !

काय या ' अपरिहार्या'चा अर्थ ? सामाजिक बंधने, कायदा, नीति, निसर्गाचे नियम, देव, दैव याच्या विरुद्ध वागल्यामुळें अंतिम परिणामाचा जो प्रत्यय येतो त्याचें नाव ' अपरिहार्य' आहे काय ? किंवा हे पूर्वसंचितार्चे फळ आहे ? नाहीं. यापैकीं एकाचाहि ' अपरिहार्या'शीं संबंध नाहीं. पुष्कळ वेळा वाईटाप्रमाणे बरेहि ' अपरिहार्य ' असू शकते. अनंतात अनंत घटना एका महाशक्तीच्या लीलेने घडत असतात. ती लीलाकारिणी शक्ति निमिषात शेकडो विश्वे नाहींशी करते तशी निर्माण पण करीत असते. त्या शक्तीशीं झुंजून सुख, आनंद मिळविण्याकरिता एवढेसे मानवी हृदय धडपडत असते. त्याचा जय झाला काय किंवा पराजय झाला काय, याचे त्या शक्तीला शुभाशुभ कोठून असणार ! ती हिमहृदया निर्विकार असते. तिच्या लीलेचे बरेवाईट प्रत्यय याचे नाव ' अपरिहार्य '. त्याला कारण किंवा हेतु नाहीं.

———

# उपसंहार



मुकुट लढाईवरून परत आला होता. सराईपर्यंत त्याची रजा होती. आता तो पूर्वीचा अल्लड मुकुट राहिला नव्हता. त्याने नवे जग व इतिहासांत किंवा पुराणांत घडले नाहीं अशा युद्धाचा अनुभव घेतला होता, त्यामुळें तो धीरगंभीर झाला होता.

अश्विनाच्या महिन्यांत पिवळी सराई दरसालप्रमाणें खलाटींत वाऱ्याने सळसळूं लागली. त्या सराईच्या आनदाने होले, रान-पारवे काळ दरींत घुमू लागले; फुलपाखरे बागडू लागलीं; कुरडूचीं फुले व गवती तुरे निळ्या आकाशाखालीं झुलू लागले. दर सराईप्रमाणे भातें, गवते खाल्ल्याचे, बाध फोडल्याचे ओरडे सुरू झाले. रात्रीं भात राखणाराच्या ' चोर चोर'च्या व मळणकऱ्याच्या ' देवा भात दे ' आरोळ्या सुरू झाल्या.

महापुराने इतर शेतकऱ्याचे टोपसाल गेले होते. परतु बाप्पाजींची सराई चांगली पिकली. राजपाटी तर पिवळ्या रजन भातामुळे बेगडासारखी चमकत होती. कारण बाप्पाजींचा अदाज खरा ठरला होता. महापुराच्या शेवटच्या औराने राजपाटींतील रेवसा उचलला व ती मोकळी झाली. उलट तिच्यांत नव्या मळईची साय बसून भरममाट पीक आलें. परतु बाप्पाजींना पिकाचा आनद वाटला नाही. त्यानीं राजपाटी पकजाच्या नावावर करून दिली तेव्हा ते खुलले. दुःखी दीपाजीला पण त्याने समाधान वाटले.

मनोहर व मुकुट त्या काळ्या कडयाकडे पाठ करून राजपाटीच्या बाधावर सराईच्या पिकाकडे पाहत बसत.

“ मीच अपराधी आहे.” मुकुटने म्हणावे.

“ नाहीं, मीच, माझ्यामुळ हे घडलं. ” मनोहरने हेका धरावा.

मग मुकुट बोलणें फिरवून अबिसिनियाच्या लढाईच्या गोष्टी काढी. गज्या, बज्या व इतर शेतकरी त्या गोष्टी ऐकण्यास तेथें जमत.

" मुकुट, आपल्यासारखे डोंगर हायती तिकडं ? " बज्याने विचारावें.

" अन्, रान ? " गज्याचा प्रश्न येई.

" आपल्यापेक्षा मोठाल डोंगर आन् रान आहेत तिकडे. पण आपल्या सराईची गंमत लई न्यारी. लढाईवर सराईची सय होऊन मला रडूं कोसळे आन् रानसईला केव्हा जातो अस होई. " मुकुट त्याना सांगे.

समाप्त